# वा ग्य ज्ञ

कृष्णाजी पांडुरंग कुळकर्णी

प्रस्तावना

आचार्य प्र. के. अत्रे



प्रकाशन क्रमांक ७८

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबअी ४

मूल्य साडेतीन रुपये

# संकल्प

प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुळकर्णी हे महाराष्ट्रांतले एक महान् व्युत्पन्न पंडित आहेत. व्युत्पत्तीचे आणि भाषाशास्त्राचे ते एक प्रचंड संशोधक आहेत. मराठी साहित्यांतील त्यांचें स्थान आणि अधिकार फार मोठा आहे. त्यांचा सारा जन्म



अध्ययनांत, अध्यापनांत, आणि ग्रंथ-लेखनांत गेलेला आहे. 'भाषाशास्त्र आणि मराठी भाषा,' 'मराठी भाषा: उद्गम आणि विकास' आणि 'व्युत्पत्ति-कोश' ह्या त्यांच्या मौलिक ग्रंथांनीं मराठी भाषेच्या शास्त्रीय अभ्यासाचा एक भव्य राजमार्ग बांधून दिलेला आहे. त्या खेरीज भाषा, इतिहास आणि साहित्य ह्या विषयावर संशोध-नात्मक आणि विचारप्रवर्तक स्वरूपाचें त्यांचे लेखनही विपुल आहे. पण तें स्फुट आणि प्रासंगिक असल्यानें मासि-कांतील, लेखांच्या प्रस्तावनांच्या किंवा स्वतंत्र पुस्तिकांच्या रूपानें इतस्ततः विखुरलेलें आहे. 'समीक्षक' मासिकामध्यें 'धन्वंतरी' ह्या नांवानीं लिहिलेल्या त्यांच्या कित्येक साहित्यविषयक टीकालेखामीं पुष्कळ विद्वानांचें लक्ष त्या काळीं वेधलें होतें. पण प्रा. कुळकर्णी ह्यांचा हा विविध लेखनसंसार एकत्रित स्वरूपांत उपलब्ध नसल्यानें त्यानीं केलेल्यां मराठी भाषेच्या आणि साहित्याच्या दीर्घकालीन सेवेची सर्वसामान्य सुशिक्षित महाराष्ट्रीयांना साकल्यानें ओळख होणें कठीण होतें. अमळनेरच्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे यंदा ते अध्यक्ष झाल्यानंतर ह्या अड-चणीची जाणीव विशेष तीव्रतेनें झाली. म्हणून साहित्य, भाषा आणि इतिहास ह्या विषयामधील त्यांचा 'समग्र वाग्यज्ञ' चार खंडांत प्रसिद्ध करण्याची योजना आंखण्यांत येऊन, त्यांतला हा पहिला खंड अमळनेर साहित्य संमेलनाच्या सुमुहूर्तावर आज प्रसिद्ध होत आहे.

ह्या संग्रहामधल्या कोणत्याही पानावरून सहज दृष्टिक्षेप करणाऱ्यांच्या प्रथम ही गोष्ट लक्षांत येईल कीं हा खरोखरच 'वाग्यज्ञ' आहे. रिकामटेकड्या वाचकांच्या माहितीसाठीं पेटवलेली ही कांहीं गप्पांची 'धुनी' नव्हे. कीं, सहज त्यांतली इकडची 'तिकडची' चार पानें चाळावींत अन् आशय ध्यानांत आल्याचें समाधान मानावें. ज्ञानाच्या पावित्र्याचा आणि गांभीर्याचा प्रत्यय पदोपदीं या लेखांमध्यें येईल. प्रत्येक विधानामागें तपश्चर्येचें आणि अधिकाराचें फार मोठें सामर्थ्य आहे. अशी वाचकांना जाणीव होईल. त्यांना उठून आणि नीट मांडी घालूनच बसावें लागेल. आजच्या लेखकामध्यें ज्ञानी आणि व्यासंगीं लेखक फारच थोडे आढळतात. आणि ज्ञानापेक्षां स्वमतांवर आणि युक्तिवादावरच भर देणारें लेखक पुष्कळ. म्हणून वाचकांशी अनुनय करून त्यांचीं मतें काबीज करण्याकडे त्यांचा रोख विशेष असतों. ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं वाचकांना कांहीं शिस्त राहिलेली नाहीं. ल्हर लागली तर ऐकावें. मर्जीस आलें तर मानावें. बुद्धीला कष्ट देण्याची त्यांना इच्छा होत नाहीं. अन् जरूरही पडत नाहीं. ज्ञान आणि शास्त्रें हीं कोणाचा अनुनय करीत नाहींत. शिष्यत्वाची दीक्षा घेऊन जिज्ञासेनें आणि श्रद्धेनें त्यांना शरण गेलें तरच तीं प्रसन्न होतात. कुलकर्ण्यांचें सारें आयुष्य अध्यापनांत गेलें. त्यांचा व्यवसायच मुळीं प्राध्यापकाचा होता. म्हणून त्यांचा पिंड आचार्याचा झालेला आहे. शिकविण्याच्या वृत्तीनें आणि बुद्धीनें ते सारें बोलतात आणि लिहितात. कोणताही विषय हातीं घेतला तरी तो अर्धवट सांगत नाहींत. किंवा अपुरा ठेवीत नाहींत. मुळापासून शेंड्यापर्यंत त्याची कुळकथा सांगतात. त्याच्या पारंब्यांचा विस्तार कोठपर्यंत पसरला आहे त्याचा इत्थंभूत इतिहास देतात. प्रत्येक अंगोपांगांचें विश्लेषण करावयाचें आणि त्या सर्वांचें संश्लेषण करून नवीन सिद्धांत बांधावयाचा किंवा जुन्या सिद्धांतावर नवीन प्रकाश टाकावयाचा हें त्यांच्या निरूपणाचें वैशिष्ट्य अगदीं ठरून गेलें आहे. म्हणून इच्छा असो वा नसो शिष्याची वृत्ति धारण केल्यावांचून वाचकांना त्यांच्या लेखनाचा आस्वाद घेतां येणार नाहीं. ह्या संग्रहांतील कोणताही लेख वाचतांना आपण महाविद्यालयांतील त्यांच्या मराठीच्या एकाद्या तासालाच बसलों आहोंत असें वाटतें.

'ज्ञानेश्वरीं'त भौतिक आणि आत्मिक स्वरूपाचीं चिरंतन मूल्यें आहेत म्हणून तें अक्षर वाङ्मय आहे, एवढेंच सांगून ते थांबत नाहींत. तर त्या ज्ञानेश्वरांनीं वापरलेल्या उपमा दृष्टांतावरून सातशे वर्षांपूर्वीच्या त्या 'सुवर्णयुगां'तील सामाजिक

परिस्थिती कशी होती, त्या वेळीं रणवाद्यें कोणतीं होती, स्त्रिया दागिने आणि वस्त्रें कोणतीं वापरीत, शहरांत आणि खेड्यांत घरें कशीं बांधीत येथपासून तो त्या वेळचे लग्नसमारंभ कसे होते आणि लोकांच्या खाण्याचे पदार्थ काय काय होतें येथपर्यंत त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाचें ते दर्शन घडवितात. महाराष्ट्राचे आद्य पत्रपंडित बाळशास्त्री जांभेकर ह्यांच्या चरित्राचा आणि कर्तृत्वाचा केवळ तपशील ते सांगत नाहींत. तर एकोणीसाव्या शतकाच्या प्रारंभीं झालेल्या राज्यक्रांतीनें देशांत विचारक्रांति कशी घडून आली आणि त्यामुळें वाङ्मयकारणांत प्रतिभावंतांचें नि बुद्धिमतांचें महाराष्ट्रीयत्व कसें नाहीसें झालें. हें त्या तेजोविहीन काळाचें हृदयद्रावक चित्र ते डोळ्यापुढें उभे करतात. त्या खेरीज अव्वल इंग्रजी काळांमध्यें आंग्ल संस्कृति आत्मसात् करून एतद्देशीय संस्कृति टिकविण्याची ह्या वेळच्या दिङ्मूढ शास्त्रींपंडितांनीं जी केविलवाणी धडपड केली, तिच्या स्वरूपाचें आपल्याला आकलन होऊं शकत नाहीं.

पुरातत्वशास्त्रामध्यें डॉ. रामकृष्ण भांडारकरांनीं केलेल्या संशोधनाचें स्वरूप आणि महत्व समजावून सांगतांना पाश्चात्य देशांतल्या सर्व पुरातत्वशास्त्राच्या अभ्यासाचा आणि संशोधनाचा इतिहास ते आपल्यापुढें ठेवतात. एवढेंच नव्हें तर भारतांतील प्राचीन आणि अर्वाचीन भाषा, संस्कृति आणि इतिहास ह्या विषयांचे कोणकोणत्या पाश्चात्य पंडितांनीं काय काय संशोधन केलें ह्याचें यथांबुज वर्णन करून डॉ. भांडारकरांनीं निर्माण केलेल्या संशोधनाच्या परंपरा आज महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्राबाहेर निरनिराळ्या विषयामध्यें आज कोण चालवीत आहे ह्याची इत्थंभूत नांवनिशी त्यांनीं देऊन ठेवलेली आहे. इतिहासाचार्य विसुभाऊ राजवाडे हे तर प्रा. कुलकर्णी ह्यांचे गुरूच. मराठ्यांचा इतिहास, मराठी भाषा आणि समाजशास्त्र ह्या विषयांचें ह्या महापुरुषानें आजन्म संशोधन करून त्यांच्या अभ्यासाचा साधनांचा एक प्रचंड पर्वतच महाराष्ट्रांत कसा उभा केला ह्याचें रसभरित वर्णन तर मोठ्या भक्तिभावानें त्यांनीं केले आहे. पण पंचाग्निसाधन करून जन्मभर प्रखर तपश्चर्या करण्याचें राजवाड्यांना कारण काय? त्या मागची त्यांची प्रेरणा कोणती? तें आपल्या गुरूच्या अमर कर्तृत्वाचें रहस्य उलगडून दाखवितांना त्यांनीं सांगितलें आहें. शस्त्रांच्या सहाय्यानें इंग्रजाविरुद्ध सामना देणें कठीण. तेव्हां, विद्येच्या आणि संस्कृतीच्या क्षेत्रांत इंग्रजांना चितपट करून त्यांना ह्या देशांतून हाकून द्यावयाचें ही आकांक्षा राजवाड्यांनीं आपल्या मनांत बाळगली. इंग्रजांना पराभूत करण्याच्या जिद्दीनें

राजवाड्यांनीं महाराष्ट्रांत इतिहासाच्या अभ्यासाची युयुत्सु आघाडी उघडली हें समजल्यानंतर त्या महापुरुषाकडे बघण्याची आपली दृष्टीच समूळ बदलून जाते.

लोकमान्य टिळकांच्या राजकीय कर्तृत्वाचा इतिहास सर्वानांच माहित आहे. आजपर्यंत अनेक लेखकांनीं त्याजवर निरनिराळा प्रकाश टाकलेला आहे. पण वेदविद्या आणि वेदांतविद्या ह्या दोन क्षेत्रांतल्या त्यांच्या अपूर्व संशोधनांचें स्वरूप समजावून सांगण्याचा क्वचितच कुणी प्रयत्न केला असेल. ज्योतिष शास्त्राच्या आधारावर केवळ ओरायन काळ किंवा वेदकाळ टिळकांनीं निश्चित केला आणि वेब्बर अन् मॅक्समुल्लर ह्या पाश्चात्य पंडितांना 'लंबे' केलें. एवढेंच नव्हे तर खिस्त जन्मापूर्वीच्या सहा हजार वर्षांची त्यानी कालगणना केली. आणि भूगर्भ शास्त्राच्या आधारावर 'आर्यांचें मूळ वसतिस्थान' त्यानीं थेट उत्तर ध्रुवाजवळ नेऊन ठेविलें! टिळकांच्या बुद्धीच्या आणि प्रतिभेच्या ह्या लेकोत्तर चमत्काराचीं ओळख करून द्यावयाला प्रा. कुलकर्णी विसरत नाहींत हें त्यांचें वैशिष्ट्य आहे. ईश्वरकृष्णाच्या सांख्यकारिकेंतील एक गळालेली कारिका टिळकांनीं आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर पूर्ण करून सांख्यतत्वज्ञानांवरील अपुरा राहिलेला एक सर्वात जुना ग्रंथ पूर्ण केला. ह्या हृदयांत अभिमानाचें अनावर भरतें उत्पन्न करणाऱ्या गोष्टी प्रा. कुलकर्ण्यांवांचून दुसरा कोणीही सांगू शकणार नाहीं.

प्रा. कुळकर्णी ह्यांच्या प्रत्येक लेखांत त्या त्या व्यक्तींच्या किंवा विषयाच्या माहितीसंबंधीचे बारीक सारीक तपशील आणि संदर्भ अशा तर्कशुद्ध क्रमानें आणि सुसंगतीनें गुंफून मांडलेलें दिसतील कीं त्यामुळें वाचक भांबावून किंवा गोंधळून जात नाहीं. उलट त्या विषयांतील नवीन प्रमेयांचा किंवा त्या व्यक्तींच्या जीवन-रहस्याचा नवा साक्षात्कार झाल्याचा त्याला आल्हाद वाटतो. कोणत्याही विषयाचें ते तात्पुरतें निरूपण करीत नाहींत. तर त्या विषयासंबंधीची संपूर्ण आणि सांगोपांग कैफियतच ते तुमच्या हवालीं करतात. म्हणजे अमुक एक हकीगत मागें राहिली आणि तमुक एक मुद्दा वगळला गेला अशी रुखरुखच शिल्लक रहात नाहीं. उदाहरणार्थ, विक्रम कथेवरील त्यांचा निबंध वाचा. गेल्या अडीच हजार वर्षांतील संस्कृत, प्राकृत आणि प्राकृतोद्भव भाषांतील सर्व जानपदवाङ्मयाच्या इतिहासाचा चित्रपटच त्यानीं वाचकासमोर मांडून ठेवलेला आहे. हा प्रबंध म्हणजे प्रा. कुळकर्णी ह्यांच्या संशोधनीय प्रतिभेचा परमोच्च विलासच होय. युद्धांत लक्ष्मणाला मूर्च्छा आली असतांना, त्याला शुद्धीवर आणण्याकरतां औषधी वनस्पती घेऊन

यावयाला मारुतीला पाठविण्यांत आले. तेव्हां नुसती तीच वनस्पति न आणतां मारुतीनें द्रोणागिरीचा पर्वतच उचलून आणला. तसे प्रा. कुळकर्ण्यांचें आहे. कोणताही एकादा लेख लिहितांना त्या विषयाचा किंवा शास्त्राचा ' द्रोणागिरी 'च ते तुमच्यापुढें आणून उभा करितात. नवनवीन माहितींनी, उल्लेखांनीं आणि ह्यांची संदर्भांनीं दुथडी भरून चाललेल्या एकाद्या महानदीच्या पात्राप्रमाणें प्रा. कुळकर्णी लेखन पद्धति शांत, गंभीर आणि विशाल वाटते. त्यांत जिज्ञासू अभ्यासकांनीं यथेच्छ पोहावें किंवा नौकाविहार करावा. त्या मानानें महाराष्ट्रांतले आजकालचे कित्येक प्रबंधकार निष्कारण खळखळणारे अन् ' हातभर लांबींचे उथळ झरे ' वाटतात.

प्रत्येक बिषयाचा ऐतिहासिक आणि तौलनिक दृष्ट्या विचार करावयाचा हें प्रा. कुलकर्णी ह्यांच्या लेखनाचें वैशिष्ट्य आहे. त्यांच्या तौलनिक आणि विश्लेषणात्मक पद्धतीचे तेजस्वी नमुने जागोजाग ह्या संग्रहांत विखुरलेले आढळतील. आगरकरांच्या चरित्राचें सार त्यांनीं ह्याच पद्धतीनें काढलें आहे. चिपळूणकर, टिळक आणि आगरकर ह्यांची तुलना करतांना ते म्हणतात कीं, " विचारसरणी व आचारसरणी ह्यांतील जहालपणांत तिघेही सारखेच होतें. चिपळूणकर टिळकांनीं आपल्या जहाल वृत्तीच्या प्रसाराला राजकारण हें क्षेत्र मुक्रर केलें, तर आगरकर ह्यांनीं आपल्या जहाल वृत्तीच्या प्रसाराला सर्वांगीण सुधारणेचें क्षेत्र मुक्रर केलें. चिपळूणकर टिळकांनीं समाजस्वातंत्र्य व देशस्वातंत्र्य ह्यांचा विशेष पुरस्कार केला तर आगरकरांनीं त्याजबरोबर व्यक्तिस्वातंत्र्याचा विशेष पुरस्कार केला. " डॉ. माधवराव पटवर्धन ह्यांच्या गद्यपद्य लेखनांतील गुणांची तुलना करतांना ते लिहितात कीं, " गद्यांत प्रामुख्यानें विश्लेषण क्रिया करावी लागते. तर पद्यांत संश्लेषण क्रिया प्रामुख्यानें करावी लागते. तर्काची कसोटी लावून विषयांच्या निरनिराळ्या स्वरूपांचे कर्कश विच्छेदन करण्याची आवश्यकता गद्यांत विशेष असते, तर ह्याच्या उलट रसग्रहणाची कसोटी लावून मोठ्या हलुवार हातांनी विषयाची विखुरलेलीं स्वरूपें एकत्रित करून त्याचें रम्य असें संकलन करण्याची आवश्यकता पद्यांत विशेष असतें. गद्य लेखन बुद्धी विकसित करून चौकसपणा व चोखंदळपणा उत्पन्न करते, तर पद्यलेखन हृदयाला हांक देऊन उच्च भावना जागृत करते. " साने गुरुजी भावनिक उपदेशवादी किंवां उपदेशात्मक भावनावादी आहेत, हें सांगतांना अर्वाचीन ललित वाङ्मयकारांचें त्यांनीं जें वर्गीकरण केलें आहे, तें अत्यंत मार्मिक आणि मनोरंजक आहे. " प्रा. फडके हे रंजनवादी ललितलेखक तर खांडेकर हे जीवनवादी ललित-

लेखक अत्रे. हे रंजनवादी वास्तवलेखक, तर वरेरकर हे प्रमेयवादी वास्तवलेखक. माडखोलकर हे शृंगारवादी वास्तवलेखक तर पु. य. देशपांडे हे साम्यवादी ललितलेखक. वामनराव जोशी हे हेतुवादी ललितलेखक, तर केळकर व केतकर हे वास्तववादी ललिलेखक." प्रत्येक वस्तूचे, कल्पनेचे आणि विचाराचे सूक्ष्म तंतू आणि पापुद्रे अगदीं हल्क्या हातानें सोलून दाखवावयाचें ह्या आधुनिक विज्ञानांतील विच्छेदनाच्या पद्धतीचा उपयोग साहित्यामध्यें करणारे प्रा. कुलकर्णी हे एकच टीकाकार आम्हांला तरी दिसतात.

एवढें असूनही कोणत्याही शास्त्रीय अन् गंभीर विषयाचें प्रतिपादन किंवा विवेचन जास्तीत जास्त आकर्षक आणि मनोरंजक करण्याचें प्रा. कुळकर्णी ह्यांचें कौशल्य अपूर्व आहे. अध्यापनशास्त्राच्या अज्ञानामुळें महाराष्ट्रांतल्या पुष्कळशा विद्वानांची विद्वत्ता त्यांच्या ग्रंथांतच बसून रहाते. सामान्य वाचकांच्या बुद्धीपर्यंत तीं पोहोचूं शकत नाहीं. मानसशास्त्राच्या नि शिक्षणशास्त्राच्या अध्ययनामुळें प्रा. कुळकर्णी ह्यांच्या विद्वत्ताप्रचुर आणि संशोधनात्मक लेखनांत एक नवीनच तेज आणि सामर्थ्य उत्पन्न झालेलें आढळून येतें. जणु कांहीं 'पंचतंत्रा'चा विष्णु-शर्माच त्यांनीं आपला आदर्श केलेला दिसतो. प्रतिभाशाली ललितलेखकाचे सर्व गुण, वैशिष्ट्यें आणि लकबी त्यांच्या भाषाशैलींत आढळून येतील. शास्त्रीय विषयाच्या विवेचनांतही ते विनोदाचा आणि उपरोधाचा मोठ्या चातुर्यानें उपयोग करतात. प्रति-भाशाली कलावंतांना भावनोत्कटत्याचे किंवा उन्मादावस्थेचें जे झटके येतात त्याचें वर्णन त्यांनी किती अचूक अन् मार्मिक केलें आहे पहा : "कोणी म्हणे झाडाच्या फांदीच्या टोकावर बसून बुंध्याची बाजू कुऱ्हाडीनें तोडतो. कोणी म्हणे कुत्र्यानें पळ-विलेल्या गव्हाच्या पोळ्या त्याच्या पोटास टोंचतील म्हणून त्याच्या मागें तुपाची वाटी घेऊन धांवतो. कोणी पांखरें आपणास भ्यालीं व उडालीं म्हणून तीं खांद्यावर येऊन स्वेच्छेनें खेळेपर्यंत तसाच उन्हांत बसून रहातो. कोणी आपल्या प्रियेच्या महालांतून लोंबकळत असलेल्या नागाला दोर समजून वर चढतो. कोणी रस्त्यांतले खांब मोजतो तर कोणी सिगरेट म्हणून जवळ बसलेल्या स्त्रीच्या हाताचें बोट तोंडांत घालून काडीनें शिलगावूं लागतो."

साने गुरुजींच्या वाङ्मयाची लोकप्रियता ही त्यांतील वाङ्मयगुणांमुळें त्याला प्राप्त झाली नसून त्यांची राजकीय कीर्ती हें तिचें खरें अधिष्ठान आहे असा वाद प्रा. फडके ह्यांनीं मागें सुरू केला होता. त्या युक्तिवादाचा समाचार घेतांना

आपला सात्विक संताप प्रा. कुलकर्णी ह्यांनीं किती हळुवारपणें व्यक्त केला आहे बघा. "मी देशसेवा करतो आहे. मी कारावास भोगला आहे म्हणून माझें ललित वाङ्मय अद्वितीय आहे" असा दावा साने गुरुजींनीं कधीं केला आहे कां? त्यानीं केलेला स्वार्थत्याग, त्यांनीं भोगलेला तुरुंगवास, त्यांना पडलेले कष्ट ह्या गोष्टींचा नकळत उपयोग त्यांच्या वाङ्मयप्रसाराला होत असेल. परंतु त्यांत त्यांचा इलाज काय? त्यांनीं त्यास काय करावें? त्याग, सत्य, यातना, शुचित्व, परहित साधन वगैरे सामाजिक गुणांची प्रतिष्ठा समाज अद्याप मानतो, ह्यांत त्यांचा काय दोष? इतर लेखकांच्या वाङ्मयप्रसाराला नाही का कळत न कळत इतर गोष्टींचा उपयोग होतो? कुणाला त्यांच्या प्रोफेसरीचा, कुणाला त्यांच्या संपादकत्वाचा तर कुणाला त्यांच्या संपत्तीचा वाङ्मयप्रसारासाठीं उपयोग होतोच कीं नाहीं? कांहीं ललित साहित्यिक व कवि तर आपल्या भोवतीं ढोलकें बडविणाऱ्या चाहत्यांचा कंपू गोळा करतात, त्याचें काय? तेव्हां लोकसेवा, तुरुंगवास ह्या दुय्यम गोष्टी वाङ्मयसमीक्षणांत कोणी आणूं नयेत" प्रा. कुळकर्णी ह्यांच्या भाषेंतली ऐट, आवेश अन् बाळबोध सोपेपणा तर कित्येकदा दृष्ट लागण्यासारखा आहे. राजवाडे आणि पोतदार ह्यांची त्यांनीं रेखाटलेलीं वैशिष्ट्यपूर्ण शब्दचित्रें एकाद्या नाणावलेल्या ललित लेखकाला तरी इतक्या आकर्षक तऱ्हेनें रंगवतां आली असती कीं नाहीं ह्याची शंका आहे. तेव्हां अनेक साहित्य गुणांनी नटलेली अशी प्रा. कुळकर्णी ह्यांची एक स्वतंत्र भाषाशैली आहे हें मान्यच करावें लागेल.

अशा तऱ्हेनें अनेक शास्त्रांचा, सिद्धांताचा नि विषयांचा वाचकांना अभिनव साक्षात्कार घडविणारा प्रा. कुळकर्णी ह्यांचा हा 'वाग्यज्ञ' आहे. ज्ञानाच्या, विचारांच्या नि भाषेच्या शुद्ध प्रकाशाचें ओजस्वी आणि आल्हादकारक वलय ह्या 'वाग्यज्ञा'-भोंवतीं पडलेलें आहे. कोणाचेंही अंग किंवा हृदय भाजेल असा संताप किंवा दाहकता या 'वाग्यज्ञां'त नाहीं. कोणाच्या नाका-डोळ्यांतून पाणी आणील असा धूरही कुठें या 'वाग्यज्ञां'तून धुमसलेला आढळणार नाहीं. किंवा समाजपुरुषाला खूष करण्यासाठीं आजूबाजूच्या कोणाही अजागळ 'अजापुत्रां' ना या 'वाग्यज्ञा' समोर बळी दिलेलें नाहीं. वाङ्मयीन यज्ञाचें सात्विक, पवित्र आणि प्रसन्न वातावरणच येथें सर्वत्र नांदत असलेलें दिसेल. ह्या 'वाग्यज्ञा'नें महाराष्ट्रांतील ज्ञानोपासकांना नवीन ओजाचा, दृष्टीचा, आणि सामर्थ्याचा लाभ होवो ही प्रार्थना !

मुंबई,
१२ ऑक्टोबर १९४२

**प्रल्हाद केशव अत्रे**

# १. काव्यानंदाची उपपत्ति

आधुनिक वाङ्मयाचा ज्या वेळेस आपण उल्लेख करितों, त्या वेळेस त्यांतील विचारप्रणाली आणि लेखनशैली, म्हणजे वाङ्मयाचें आंतर व बाह्य असें द्विविध स्वरूप, आपल्या दृष्टीपुढें आहे हें उघड आहे; आणि ह्या दोन्ही स्वरूपांत आधुनिक काळांत विलक्षण बदल झाल्याचें आपणांस दिसत आहे. अर्वाचीन मराठी वाङ्मयाला आरंभ जरी चिपळूणकरांच्या निबंधमालेपासून झाला असला, तरी त्याच्या आधुनिक स्वरूपाला आरंभ १९२० सालापासून झाला आहे. विचार व शैली ह्या दोन्ही बाबतींत १९२० सालपूर्वीचें मराठी वाङ्मय आणि नंतरचें मराठी वाङ्मय ह्यांत स्पष्ट असा फरक पडलेला दिसून येतो. पहिल्या वाङ्मयांत एक वळण, तर दुसऱ्यांत अगदीं भिन्न असें वळण दिसतें. पूर्वींच्यांत विचारांची एक दिशा, तर पुढच्यांत अगदीं भिन्न दिशा असलेली आपणांस दिसेल. रानडे-चिपळूणकर ह्यांनीं आंग्लविद्याविभूषित लोकांना स्वत्वाविषयीं जाणीव करून देऊन त्यांचा स्वाभिमान जागृत केला. टिळक-आगरकर ह्यांनीं तेंच काम समाजाच्या खालच्या थरापर्यंत आणून सोडिलें. राजवाडे ह्यांनीं विद्वान् लोकांच्या वरच्या थरां-तील लोकांची वैचारिक क्रांति केली. केळकर ह्यांनीं महाराष्ट्रांतील बहुजनसमाजां-तील बुद्धीला प्रमाण धरून व्यवहार आंखणाऱ्या लोकांच्या विचारांना चालना दिली. परांजपे, खाडिलकर, 'केशवसुत', तांबे ह्यांनीं भावनायुक्त लोकांना जागृत केलें. वरेरकर ह्यांनीं बुद्धिजीवी आणि श्रमजीवी अशा दोन्ही प्रकारच्या कामगार लोकांना हालविलें. फडके-खांडेकर-अत्रे हे कॉलेजमधील नव्यातरण्या रक्ताला उसळी आणीत आहेत. आपटे-पटवर्धन हे व्यासंगी विद्वानांना मार्ग दाखवीत आहेत. 'यशवंत', 'गिरीश', प्रभृति मंडळी मराठी काव्यांतील स्वरमाधुर्य व नादमाधुर्य लोकांच्या प्रतीतीस आणून देत आहेत. आधुनिक वाङ्मयाच्या निर्मितीस अशा रीतीनें पूर्वींचे आणि हल्लींचे वाङ्मयस्रष्टे आपआपल्या परीनें हातभार लावीत असल्याचा बाह्य देखावा दिसत असला, तरी त्यांच्या स्वरूपांत जी क्रांति झालेली दिसत आहे तिचीं कारणें दुसरींच आहेत; व तींहि युद्धोत्तर कालानंतर विशेष प्रभावी आणि प्रबल रीतीनें दृष्टीस पडतात.

ह्या कारणांपैकीं मुख्य कारण म्हटलें म्हणजे पाश्चात्य वाङ्मयाशीं आपला आलेला

संबंध हें होय. सन १९१४ ते १९२० ह्या दरम्यानच्या काळांत युरोपांत महायुद्ध होऊन सर्व राष्ट्रें खिळखिळीं झालीं. प्रत्यक्ष युद्धाच्या काळांत जितका त्रास झाला नाहीं त्याच्या किती तरी पट अधिक त्रास युद्धानंतरच्या काळांत झाला. जीवन-कलहासाठीं धडपड विलक्षण जोरानें सुरू झाली. युद्धानें खच्ची झालेली हिंमत पुनः प्राप्त करून घेण्याकरितां सर्व राष्ट्रांत प्रयत्न सुरू झाले. प्रत्येक राष्ट्रांत युद्धा-पूर्वीचे दिवस आणि नंतरचे दिवस ह्यांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर दिसूं लागलें. समाजांतील विचारसरणी, समाजाची राहणी, शिक्षण, व्यवहार, पोशाख, धर्मनीती-संबंधाच्या कल्पना, आर्थिक परिस्थितीवर अवलंबून असणारे सेव्य-सेवकांचे, मालक-मजुरांचे, जमीनदार-कुळांचे संबंध इत्यादि बाबतींत विलक्षण क्रांति घडून आली. पूर्वीचे सर्व विचार पालटून गेले. अठराव्या शतकाच्या अखेरीस फ्रान्स देशांतील राज्यक्रांतीनें ज्याप्रमाणें सारें युरोपखंड पार बदलून टाकिलें, त्याप्रमाणें महायुद्धानें सर्व युरोपखंड फीनिक्स पक्ष्याप्रमाणें आपल्या रक्षेंतून पुनः ताजेंतवानें होऊन उठलें. साहजिकच युरोपखंडांतील ह्या स्थित्यंतराचीं प्रतिबिंबें त्या त्या देशाच्या वाङ्मयांत पडूं लागलीं; आणि पश्चिमेकडील वाऱ्याबरोबर वाङ्मयविचारांचे प्रवाह आपल्या देशांत आले. त्या त्या देशांतील स्थित्यंतरांचे केवळ वाङ्मयीन देखावेच आपल्या इकडे आले एवढेंच नाहीं, तर ते सिनेमा-रेडियोमार्फत चलच्चित्रपटावर आपणांस प्रत्यक्ष दिसूं व ऐकूं येऊं लागले. पश्चिमेकडील या वाऱ्याबरोबर आपल्या-कडेहि तशा प्रकारचे वारे उत्पन्न झाल्याचीं चिह्नें दिसूं लागलीं. ह्या देशाच्या रोमरंध्रांत भिनलेली पुराणप्रियता हळूहळू नाहींशी होऊं लागली. आर्यवाङ्मयाची आदर्शवत्ता किंवा अलौकिकता हा जो अद्वितीय गुण तो कमी होऊन त्याच्याऐवजीं वास्तवता हा गुण येऊं लागला. व्यष्टीच्या व समष्टीच्या आध्यात्मिक उन्नतीकडे असलेला वाङ्मयाचा रोख मानवी जीवनाकडे वळला. आधिभौतिक अभ्युदयाकडे वाङ्मय खेंचलें जाऊं लागलें. वाङ्मय वर्गकलहामुळेंच उत्पन्न होतें; वाङ्मयानें एका विशिष्ट प्रकारचेंच समाजजीवन चित्रित केलें पाहिजे; समाजाच्या आर्थिक उन्नतीसाठीं वाङ्मयनिर्मिति झाली पाहिजे; अशा प्रकारचे पश्चिमेकडील उष्टे विचार व अपसिद्धान्तहि उचलण्यापर्यंत मजल जाऊं लागली. जीवनकलहांत आयुष्याचा सर्व वेळ जाऊं लागल्यामुळें, फुरसत न सांपडल्याचा उघड उघड दिसणारा परिणाम आपणांस वाङ्मयाच्या कांहीं प्रकारांच्या लांबीरुंदीवर झाल्याचा आढळतो. पूर्वीचीं महाकाव्यें, मोठीं नाटकें, मोठ्या कादंबऱ्या, मोठे निबंध जाऊन त्यांच्या-

ऐवजीं छोटीं छोटीं भावगीतें, एकांकी-एकप्रवेशी नाटकें, लघु-कादंबऱ्या, लघुकथा, लघुनिबंध हीं आलीं. हें एक लहानसें, पण स्पष्ट दिसणारें बाह्य स्वरूपासंबंधींचें उदाहरण झालें.

वाङ्मयांतील हा फरक केवळ त्याच्या लांबीरुंदीसंबंधींचा व बाह्य स्वरूपाचा नाहीं. वाङ्मयाच्या अंतरंगांतसुद्धां हा फरक झालेला दिसतो. धर्म-अधर्म, नीति-अनीति, कर्तव्य-अकर्तव्य, नव-पुराण ह्यासंबंधींच्या कल्पनांत झालेली क्रांति वाङ्मयाच्या गाभ्यांत देखील उमटूं लागली आहे. कलेच्या विलासांतील जें प्रधान अंग स्वभाववर्णन त्यामध्यें फरक पडूं लागला आहे. ह्या अंतःक्रांतीचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे मानसशास्त्रांतील आधुनिक नवीन नवीन शोध हें होय. मनोविश्लेषणशास्त्रानें वाङ्मयांतील स्वभाववर्णनांत विलक्षण सूक्ष्मता आल्याचीं उदाहरणें अलीकडील कादंबऱ्या व लघुकथा ह्यांमध्यें सांपडण्यासारखीं आहेत. गुंतागुंतीचा मनोव्यापार, अनुभवसंचय, संवित्संचय, वासना व भावना ह्यांचा समुच्चय ह्यांनीं तयार होणारे निरनिराळे मनोगंड, त्या गंडांचा जीवनव्यवहारांत पदोपदीं दिसून येणारा परिणाम, भिन्नजातीय वृत्तींचें प्रकटीकरण आणि नियमन, त्या वृत्तींच्या आणि विशेषतः लैङ्गिक समाधानाच्या वृत्तीच्या नियमनामुळें व्यक्तीच्या जीवनव्यवहारांत जागृति, सुषुप्ति, तुर्या व उन्मनी ह्या चारहि अवस्थांत उत्पन्न होणारे उत्पात हे सर्व प्रकार स्वभाववर्णनांत दिसूं लागले आहेत. आधुनिक मराठी कलावाङ्मयाचा हा एक स्पष्ट असा विशेष होऊन बसल्याचें कांहीं ठळक उदाहरणांवरून दिसून येतें.

मनोविश्लेषणाशास्त्राप्रमाणें जीवशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि शास्त्रांतील संशोधनामुळेंहि वाङ्मयाच्या आंतील विचारांत फरक पडला आहे. जीवनशास्त्रांतील शोधांमुळें लैङ्गिक ज्ञानांत व समजुतींत आणि त्यांवर आधारलेल्या नीतिकल्पनांत क्रांति झाली आहे. अर्थशास्त्रांतील नवीन विचारसरणीमुळेंच स्त्री-पुरुष, श्रीमंत-गरीब, धनी-नोकर, जमीनदार-शेतकरी, मालक-मजूर, या घटकांमधील पूर्वीच्या आणि आजच्या दोन्ही संबंधांत जमीन-अस्मानाचें अंतर पडत चाललें आहे; आणि हें सर्व कलाकृतींच्या साहाय्यानें पुरस्कारण्यांत येत आहे. नव-पुराण, श्लील-अश्लील, कला जीवन, कला-नीति वगैरे जे वाद सध्या साहित्यिक मंडळींत चालू असलेले दिसतात, ते सर्व ह्या आंत धुमसत असलेल्या विचारक्रांतीचीं बाहेर दिसणारीं चिन्हें नव्हेत काय? ह्याला योग्य मार्ग दाखविण्याची जबाबदारी सुविचारी आणि कर्तृत्ववान् अशा वाङ्मयसेवकांवर आहे. जुन्या कुप्यांतील बुरसलेलीं आसवें किंवा

अरिष्टें ह्या रोगांवर औषधें म्हणून दिलीं तर काय सांगावें त्यांचा काय उपयोग होईल तो ? कदाचित् गुणहि येईल. कदाचित् तीं अरिष्टें नवीं अरिष्टें उत्पन्न करतील व तीं आसवें डोळ्यांतून आसवें पाडतील ! अचूक निदान करणें हेंच अत्यंत अगत्याचें आहे.

आधुनिक काळांत हीं विचारद्वंद्वें चाललीं आहेत खरीं. आजवर अशीं द्वंद्वें झालीं नाहींत असें नाहीं. समाजांतील निरनिराळ्या घटकांत कित्येक द्वंद्वें आजवर झालीं व त्यांचे पडसाद तत्कालीन वाङ्मयांत उठलेले दिसतात. ज्ञानेश्वराच्या काळांत आश्रमसंस्थावादी व तद्विरोधी यांच्यामध्यें द्वंद्व झालें; आणि त्याची छाया वाङ्मयांत पडली. एकनाथाच्या काळीं धार्मिक छळ व धर्मपरिवर्तन ह्यांचे पुरस्कारक आणि विरोधक यांच्यामध्यें वाद झाला; आणि तो त्या काळांतील वाङ्मयांत उठलेला दिसतो. रामदासाच्या वेळीं धर्मपरिवर्तन, राज्यपरिवर्तन ह्यामुळें झालेल्या कलहाचे पडसाद त्या काळांतील वाङ्मयांत ऐकावयास सांपडतात. पेशवाईचा काळ हा आक्रमणाचा असल्यामुळें द्वंद्वें करण्यास, कलहाकडे लक्ष देण्यास व त्याचे पडसाड उठविण्यास किंवा उठलेले ऐकण्यास लोकांना फावलें नाहीं. मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत, महीपति ह्या सर्वांनीं आत्मप्रकटीकरणासाठीं, आत्मसंवेदनासाठींच वाङ्मय निर्माण केलें. त्या व्यक्तींच्या जीवनांत किंवा विचारांत झालेल्या द्वंद्वांचा परिणाम त्यांच्या वाङ्मयावर झाला असेल. तेंच द्वंद्व उत्तरपेशवाईच्या अखेरीस पुनः डोकावतें आणि त्याची प्रतीति शाहिरी वाङ्मयांत दिसून येते. स्वतःच्या कर्तबगारीनें कमाई करणारे परिश्रमशील लोक आणि दुसऱ्याच्या कष्टानें प्राप्त झालेल्या सुखाच्या उपभोगानें रंगलेले लोक ह्यांच्यामधील झगडा शाहिरी वाङ्मयांत दिसतो. अव्वल इंग्रजींतील डोळे दिपविणारी पहिली अमदानी संपल्यानंतरच्या काळांतहि स्वत्वापहरणाविषयीं लोकांचीं मनें जागृत झालीं व लोकांच्या विचारांत द्वंद्वें सुरू झालीं; आणि त्यांचे पडसाद अद्यापि कानांवर येतच आहेत.

अशीं हीं विचाराचीं द्वंद्वें आहेत. हे आर्थिक परिस्थितीच्या पायावर उभारलेले वर्गकलह नव्हेत. आजपर्यंचा मराठी वाङ्मयाचा इतिहास असे वर्गकलह झाल्याचें सांगत नाहीं. संपत्तिजीवी आणि श्रमजीवी यांच्यामध्यें झालेलीं द्वंद्वें महाराष्ट्र-समाजांत नाहींत; व त्यामुळें निर्माण झालेलें वाङ्मयहि मराठी वाङ्मयांत नाहीं. द्वंद्वें जीं झालीं, कलह जे झाले, ते संस्कृतीच्या निरनिराळ्या थरांवर उभ्या असलेल्या घटकांमध्यें झाले नाहींत. भांडणच जर असेल, तर तें सांस्कृतिक भांडण

आहे, धार्मिक भांडण आहे; आर्थिक नव्हे. त्यांतल्या त्यांत वाङ्मयाच्या मुळाशीं जर कोणतें द्वंद्व असेल तर तें विचारद्वंद्व आहे; व त्यांतहि पुनः परंपरेचे पुरस्कारक व विरोधक, अभिनवमताचे पुरस्कारक व विरोधक ह्या दोहोंमधील जो वाद आहे, तो वाङ्मय-निर्मितीच्या मुळाशीं विशेष आहे. हा वाद कायमचा व फार दिवसांचा आहे. वसिष्ठ-विश्वामित्र इत्यादिकांच्या संवादांत, ब्राह्मण-ग्रंथांतील याज्ञिक-सरमा ह्यांच्या संवादांत, हाच वाद दृष्टीस पडतो. लग्नसंस्थेची मुहूर्तमेढ रोवणारा श्वेतकेतु-उद्दालक आणि त्याची आई यांच्या संवादांत हाच वाद गर्भित आहे. महाभारताचीं व्यास वैशंपायन-सौत्यादींनीं जीं संस्करणें केलीं किंवा गुप्त राजांच्या अमदानींत अठरा पुराणांचीं जीं संस्करणें झालीं, तीं ह्या पारंपर्याच्या वादामुळेंच. अगदींच एकजात नवीन मत स्वीकारण्यास मन तयार होत नाहीं. जुन्याला उजळा देऊन नव्या काळाला योग्य दिसेल असें करण्याची जी मनाची प्रवृत्ति तिचीं हीं उदाहरणें होत. एक सिद्धान्त मागें पडून ज्या वेळेस दुसरा सिद्धान्त त्याची जागा घेतो, एका तत्त्वज्ञानापासून ज्या वेळेस दुसरें तत्त्वज्ञान निघतें, एक धर्म ज्या वेळेस दुसऱ्या धर्मास जन्म देतो, त्या वेळेस हें जुन्यानव्याचें संघर्षण होतें. हाच प्रकार वाङ्मयांत दिसल्यास नवल नाहीं.

शाकुंतलाच्या कर्त्याला ह्या पारंपर्याविरुद्ध झगडावें लागलें. दगडाला अश्रुसिंचन करावयास लावणाऱ्या भवभूतीनें परंपरावादी लोकांशीं झगडा केला व यशाची आशा नसतांच भविष्यकाळावर त्याला भिस्त ठेवावी लागली. शूद्रकाचा चारुदत्त वैतागानें असाच भविष्यावर विसंबतो. मराठी कवींच्या प्रांतांत आपण अवतरलों म्हणजे तर ही पारंपर्यविरोधी वृत्ति चांगली ठळकपणानें नजरेस येते. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास हाच झगडा करीत असतांना दिसतात. पारंपर्याचें जोखड कोण सुखानें सहन करणार व निमूट-पणानें त्याखालीं आपली मान धरणार? पारंपर्याविरुद्ध कोणी 'शिंग' फुंकतो तर कोणी 'तुतारी' वाजवितो, कोणी दसऱ्याचें 'सीमोल्लंघन' करितो तर 'नव्या मनूंतील नवा शिपाई' म्हणून मिरवितो, तर कोणी 'हा कोणी महात्मा आला' असें जाणवितो. पारंपर्याविरुद्ध नव्या मताची ही बंडखोरी आधुनिक मराठी वाङ्मयांतहि अमूप दिसून येते; व हाहि एक आधुनिक वाङ्मयाचा विशेष आहे. वाङ्मयक्रांति ही नेहमीं अशा वृत्तीमुळेंच होते. धर्म, नीति, समाजधारणा, कुटुंब-व्यवस्था वगैरे ज्या गोष्टी वंदनीय म्हणून मानिल्या जात व ज्यांच्या स्थैर्यासाठीं

जो तो आपली बुद्धि खर्चण्यास तयार असे, त्या गोष्टी चेष्टेचे विषय होऊन बसतात. धार्मिक व नैतिक विधींचीच फक्त थोतांड समजून चेष्टा केली जाते असें नव्हे, तर तसल्या मनाच्या वृत्तींचीहि चेष्टा केली जाते. धर्म, नीति, परंपरा, पुराणत्व, संचित ह्यांसंबंधींच्या विचारप्रतीकांचे भंजक आज आधुनिक वाङ्मयकारांत आपणांस दिसून येऊं लागले आहेत.

जुन्यानव्यांच्या ह्या वादाबरोबर आणखीहि एका वादाचा आपणांस विचार केला पाहिजे. तो वाद वरील वादापेक्षां अधिक मूलग्राही व अधिक महत्त्वाचा आहे. हा वाद, अलौकिकता किंवा आदर्शवत्ता आणि वास्तवता हीं जीं वाङ्मयाचीं किंवा कलाविलासाचीं मुख्य अधिष्ठानें त्यांच्यासंबंधींचा होय. हीं दोन अधिष्ठानें अधिक स्पष्ट केल्याखेरीज जुन्या व नव्या वाङ्मयामध्यें कसा भेद पडत चालला आहे, हें नीट समजणार नाहीं.

प्रतिभावंताची प्रतिभा हें एक प्रतिकृति काढण्याचें किंवा छबी उतरण्याचें यंत्र आहे; आणि तें सदासर्वदा उघडें ठेवून दिलें आहे. मानवी जीवनांत किंवा समाज-जीवनांत जीं निरनिराळीं दृश्यें हालतात तीं अगदीं त्यांच्याबरहुकूम ह्या यंत्रांत उमटलीं जातात व वाङ्मयांत सांठविलीं जातात. वाङ्मय हा समाजजीवनाचा अथवा मानवी जीवनाचा आदर्श ह्या छबीयंत्रामुळेंच होतो. मानवी जीवनाची प्रत्येक हालचाल, त्या त्या काळच्या वाङ्मयांत प्रतिबिंबित केली जाते. हें प्रतिबिंब घेतांना बऱ्यावाइटांची निवड केली जाते हें खरें आहे. ज्या दृश्यांत त्या काळच्या जीवनाचे विशेष अधिक आढळतील, जें प्रतिबिंब ज्यास्तींत ज्यास्त लोकांच्या जीवनाशीं तत्काल समरूप होईल, तेवढेंच दृश्य ह्या छबीयंत्रांत दाखविलें जातें. अशा रीतीनें उठविलेलीं प्रतिबिंबें चिरंतन काळांत व चिरंतन जीवनांत स्थान पावतात व सर्व लोक त्यांच्याकडे आदर्शभूत प्रतिबिंब म्हणून पाहातात. छबी उतरतांना ज्याप्रमाणें एखादा कलावंत आपलें दृश्य नीटनीटकें मांडतो, त्याची योग्य पार्श्वभूमि योजतो, प्रत्येक घटकाची बैठक, रुबाब, उठाव योग्य प्रमाणांत दिसावा म्हणून प्रयत्न करितो, व पुढें दृश्य उतरल्यानंतरहि त्यांतील वैगुण्य झांकून टाकतो—इतकेंच नव्हे, तर आपल्या कौशल्याच्या कुंचल्यानें कुरूपतेला सुरूपता आणितो, त्याचप्रमाणें मानवी जीवनांतील दृश्यें वाङ्मयांत उतरविणारा प्रतिभावान् कलावंत हा अशा रीतीनें एक छबीयंत्राचा मालक आहे. छबीयंत्रांत मूळ उमटलेलें 'वास्तव' स्वरूपाचें दृश्य, कालांतरानें आदर्शभूत बनतें. आपल्याकडील जुनें वाङ्मय तर अशा आदर्शभूत प्रतिबिंबांनीं

पूर्ण भरलेलें आहे. मानवी जीवन कसें आहे किंवा अमुक एका काळीं कसें होतें, हें आपणांस वाङ्मयावरून कळत नाहीं; व तें नीट कळावें हा वाङ्मयाचा उद्देशहि नाहीं. मानवी जीवन कसें **असावें**, त्याचा आदर्श अथवा ध्येय कोणतें हें दाखविण्याचा उद्देश असतो.

आपल्याइकडील पौरस्त्य वाङ्मयांत ही आदर्शवत्ता अधिकच आहे व ती बऱ्याच उदाहरणांत अलौकिक होऊन बसली आहे. वाङ्मयांत मानवी जीवन दाखवावयाचें तर तें साधेंसुधें कां दाखवा ? ज्याच्याकडे सर्वांचें लक्ष वेधेल असेंच जीवन कां दाखवूं नये ? अशी विचारसरणी ह्या आदर्शवत्तेच्या पाठीमागें असते. ज्यांच्या सुख-दुःखाचा कळवळा समाजांतील लहानापासून थोरापर्यंत पोंचतो, ज्यांच्या योगक्षेमावर सर्वांचा योगक्षेम अवलंबून आहे, अशा व्यक्तींचें जीवन जर दाखविलें तर तें अधिक परिणामी होईल, ह्या हेतूनें वाङ्मयाचें जीवनप्रदर्शनाचें काम त्या व्यक्ती-भोंवतीं फिरूं लागतें. राजांचीं किंवा राजपुरुषांचींच जीवनें जीं वाङ्मयांत प्रामुख्यानें सांपडतात, त्याचें कारण हें होय. होमरनें दुसरा कोणता साधा मनुष्य न घेतां ॲकिलीस हा राजा वर्णनविषय केला. साध्या स्त्रीचें अपहरण न दाखवितां पेनि-लोपचें अपहरण दाखविलें. महाभारतामध्यें द्यूतांत हरल्या गेलेल्या पत्नीची विटंबन प्रत्यक्ष धर्मराजाच्या द्वारें सर्व आर्यांना व्यासानें दाखविली. हरण केलेली स्वतःची स्त्री परगृहीं राहण्याचा जनप्रवाद सीता-रामचंद्रांच्या द्वारें वाल्मीकीनें सर्वांस ऐकावयास लाविला. राज्यतृष्णा आणि त्यापासून होणारे जीवनविषयक उत्पात साध्या माणसाच्या तृष्णेच्या धडपडींत न दाखवितां मॅक्बेथच्या धडपडींत दाखविण्यानें प्रेक्षकांच्या मनावर अधिक परिणाम होतो. लोभमोहादि षड्विकृतींचीं फळें सामान्य माणसाकडून चाखविण्यांत कांहीं विशेष साधत नाहीं. तींच फळें ॲडम आणि ईव्ह यांच्याकडून चाखविण्यांत व मानवी स्खलनशीलता त्या आद्य मानवांच्या पदरीं बांधण्यांतच कलेचें खरें सौरस्य आहे. हें जीवनप्रकटीकरण केवळ राजापर्यंतच थांबतें असें नाहीं, तर राजांचा जो राजा, सर्व विभूतींतील विभूति असा ईश्वर घेऊन, त्याला मानवाचा अवतार देऊन, त्याला मानवाचें जीवन चिकटवून, त्याच्या जीवनांतील गुंतागुंत, त्याचीं सुखदुःखें, त्या विविध प्रसंगांत तो कसा तगला, हें आदर्शभूत जीवन कलावंतांनीं आपापल्या काव्यांत दाखविलें आहे.

राजा काय, राजपुरुष काय, किंवा देव काय, दिव्य पुरुष काय, ह्या सर्वांचें जीवन

जरी आदर्शभूत असलें, तरी प्रत्यक्ष व्यवहारांतील सामान्य जीवनापेक्षां पुष्कळ दूरावलेलें, पुष्कळ भिन्न, पुष्कळ विसंगत असें असणार; म्हणूनच वाङ्मय आणि सर्वसाधारण मानवी जीवन ह्या दोहींमध्यें अंतर पडत जातें. जीवनाचें प्रकटीकरण हें जें वाङ्मयाचें मूळचें ध्येय, तें बदलून आदर्शभूत जीवनाचें प्रकटीकरण हें त्याऐवजीं कसें येतें, तें ह्यावरून स्पष्ट होईल. ध्येय बदलल्यामुळें वाङ्मय हें सामान्य मानवी जीवनापासून हळुहळूं दूरावत जाऊन त्या दोहींमध्यें कायमची फारकत होते. एकीकडे अशी ही फारकत होत असतांना, दुसरीकडे तो वाङ्मयिक आपआपल्या परीनें वाङ्मय हें जीवनरूपच आहे, असें दाखविण्याचा प्रयत्न करीत असतो. हेतु एक आणि कृति भलती, अशा उलटसुलट प्रकारांमुळें वाङ्मयांत मानवी जीवनाचें सत्यत्व न येतां सत्याचा आभास येतो.

वाङ्मयांत प्रत्यक्ष सत्याचा भास न होतां केवळ आभास होत असतांना, किंवा वस्तुस्थितीशीं त्याची फारकत झाली असतांना, मग त्यांत गोडी कां लागावी? त्याकडे लोकांच्या मनाची धाव कां जावी? खरी स्थिति, खरें जीवन जर वाङ्मयांत आढळत नाहीं, तर पुनःपुनः तेंच पाहण्याची इच्छा मनुष्यास कां व्हावी? हें असें जें मन धावतें त्याला कारण आहे. त्यामध्यें जरी सत्याचा आभास असला तरी त्यांत सौंदर्य असतें, म्हणूनच वाचकांचें मन धावतें. जीवनामध्यें आढळणाऱ्या प्रत्येक गोष्टींतील सुंदर बाब तेवढी घेऊन, ती निराळी काढून, ती ह्या आदर्शभूत जीवनाच्या प्रकटीकरणांत सामील केलेली असते; म्हणून तें वाङ्मय पुनःपुनः वाचावेंसें वाटतें. प्रत्येक गोष्टींतील सौंदर्य एकवटल्यामुळें त्याला गोडी येते आणि त्याकडे मन धाव घेतें.

कलाविलास किंवा वाङ्मयविलास ह्यामध्यें ज्या प्रमाणांत हा सत्याचा आभास सनातन सत्याकडे, आणि ज्या प्रमाणांत प्रत्येक गोष्टींतील सौंदर्याचें एकीकरण सनातन सौंदर्याकडे झुकलें जातें, त्या प्रमाणावर त्या कलाविलासाचें किंवा वाङ्मय-विलासाचें चिरंतनत्व व महत्त्व हीं अवलंबून असतात.

आदर्शवत्ता व वास्तवता हीं दोन्ही कमीअधिक प्रमाणांत वाङ्मयाचीं अधिष्ठानें असतात हें जरी खरें असलें, तरी त्यांमध्यें उच्चनीचभाव हा लागतोच. प्राचीन मराठी वाङ्मयाचें आदर्शवत्ता हें मुख्य व वास्तवता हें गौण अधिष्ठान होतें. परंतु आधुनिक वाङ्मयांत मात्र ह्या दोन्ही अधिष्ठानांचा व्युत्क्रम झाला आहे. वास्तवता ही मुख्य होऊन आदर्शवत्ता ही तिची दासी बनली आहे. इतकेंच नव्हे, तर

कांहीं कांहीं कलावंतांनीं आदर्शवत्तेस, अलौकिकतेस, ध्येयतेस अजीबात फाटा देऊन वास्तवतेस मुख्य केलें आहे व त्या दृष्टीनें वाङ्मयनिर्मिति होऊं लागली आहे. कलोपासक तरी त्या त्या काळच्या मानवी समाजाचे घटक असल्यामुळें, त्यांना आपल्या कलाकृतींत सत्याभास व सौंदर्याभास यांचें प्रकटीकरण त्या त्या काळाला योग्य दिसावें म्हणून शबल करावें लागतें. एकाच देशाचें, परंतु निरनिराळ्या काळांतील वाङ्मय निरनिराळ्या स्वरूपाचें दिसतें, तसेंच एकाच काळांतील परंतु निरनिराळ्या देशाचें वाङ्मय निरनिराळ्या स्वरूपाचें जें दिसतें त्याचें कारण हेंच होय. चिरंतन सत्य आणि सौंदर्य यांचा आभास त्या त्या काळच्या आणि त्या त्या देशाच्या कल्पनांनीं व ध्येयांनीं शबल होतो, म्हणूनच हा फरक दिसतो. आदर्शवत्तेस वास्तवतेच्या योगानें किंचित् शबल करणें ही गोष्ट वेगळी, आणि तिला अजीबात फाटा देऊन वास्तवतेचा एकजात पुरस्कार करणें ही गोष्ट वेगळी. एक दुसरीनें किंचित् शबल करण्यानें सौंदर्य अधिकच वाढेल व तें इष्टहि आहे. परंतु आधुनिक वाङ्मयांत वाङ्मयिकांची प्रवृत्ति वास्तवतेच्या अगदीं दुसऱ्या टोंकाला जाण्याची दिसून येते. वास्तवतेचें अगदीं दुसरें टोक पतकरणेंहि एक वेळ कबूल—कारण, त्यांतहि सौंदर्यप्राप्ति होईल—परंतु त्याच्याहि पलीकडे जाऊन वास्तवतेच्या प्रकटीकरणास समाजशास्त्राचें रूप देण्याचा जो प्रयत्न आधुनिक वाङ्मयिकांनीं आरंभिला आहे तो मात्र यशस्वी होणार नाहीं. तो तिकडे पाश्चात्य देशांतहि फसल्याची ग्वाही तिकडील विचारवंत देत आहेत; तर मग आपल्या इकडे अध्यात्मप्रवण, संस्थाप्रधान, आदर्शपूर्ण देशांत तर त्यास काडीइतकेंहि यश येण्याची खात्री नाहीं. वाङ्मयविलास किंवा कलाविलास हा प्रतिभेचा खेळ आहे, आंकड्यांचा नव्हे. हें भावनांचें शास्त्र आहे, मोजदादीचें नव्हे. ह्या वाङ्मयानंदाला कांहीं मापन का आहे ? का कांहीं प्रमाण आहे ? उपयुक्ततावाद्यांच्या मापानें हा आनंद काय व कसा मापावयाचा ? ह्या आनंदानें किती जणांचें किती सुख साधलें, व्यक्तिजीवन किंवा समाजजीवन ह्यानें किती सुधारलें, किती सुखवस्तु लोक ह्यानें कमी केले, ह्यानें भांडवलशाही किंवा जमीनदारी किती टक्के कमी झाली, असें कांहीं काढतां येईल काय ? व्यक्ति किंवा समाज यांच्या जीवनाचा व त्यांतील सौंदर्याचा आविष्कार करणें हें कलेचें योग्य क्षेत्र आहे. परंतु त्या जीवनांत आधुनिक अर्थशास्त्राच्या पद्धतीनें अधिक सुखाची भर घालणें किंवा पुष्कळांचें पुष्कळ हित साधणें हें योग्य नव्हे. ह्या समाजशास्त्रीय गोष्टी कलेच्या क्षेत्रांत कशा याव्या व त्यासाठीं प्रतिभावंतांनीं आपली प्रतिभा किंवा कलावंतांनीं

आपली कला कां वेंचावी ? कलेचें ध्येय आनंदप्राप्ति हें आहे. हा केवळ व्यक्तिगत आनंद असून त्यानें त्या व्यक्तीच्या, क्वचित् समाजाच्या आयुष्यांत विरंगुळा उत्पन्न होईल, जीवनाच्या धकाधकींत थोडेंसें रम्यत्व येईल. त्याच्या रक्ताचें पाणी करणारें जें आपद्ग्रस्त जीवन त्याचा त्याला विसर पडेल; आणि विसर पडून आनंद उपभोगून झाल्यानंतर पुनः ताज्या उत्साहानें पूर्वींच्याच त्या कष्टमय जीवनांत तो पाय ठेवील. कलेचें प्रकटीकरण हें केवळ मनोविनोदनासाठींच आहे. ह्या मनोविनोदनाचें क्षेत्र मात्र त्या कलावंताच्या कर्तबगारीवर अवलंबून राहील. ज्या प्रमाणांत तो सत्याचा आभास उत्पन्न करील व सौंदर्याचा आविष्कार करील त्या प्रमाणांत मनोविनोदनाचें क्षेत्र मोठें होईलच. शिवाय ज्या प्रमाणांत त्याच्या आपल्या स्वतःच्या अनुभवाचा इतरांच्या अनुभवांबरोबर महत्तम साधारण विभाज्य निघेल, त्या प्रमाणांत त्या कलावंताची हाक सार्वत्रिक व सार्वजनीन होईल. आणि ही अभिमानाची व आनंदाची गोष्ट आहे कीं, अशा सार्वत्रिक व सार्वजनीन हाका आधुनिक मराठी वाङ्मयांत आदर्शवत्तेच्या व विशेषतः वास्तवतेच्या अधिष्ठानावरून येऊं लागल्या आहेत, आणि भावी काल ह्याहिपेक्षां ऊर्जस्वल होईल अशी आशा उत्पन्न करूं लागल्या आहेत.

येथें ओघानें प्राप्त झालेल्या कलाकृतीच्या आनंदासंबंधीं किंचित् सूक्ष्म स्पष्टीकरण करतों.

भाषेच्या उत्पत्तीसंबंधीं निरनिराळे सिद्धान्त रूढ आहेत; त्यांत भाषा ही प्रेममूलक गायनापासून उत्पन्न झाली असा एक सिद्धान्त आहे. आदिमानवानें आपल्या प्राथमिक व्यवहाराच्या सिद्धीसाठीं जें साधन वापरलें तें साधन म्हणजे भाषा होय. हें साधन प्रथम प्रचारांत कसें आलें तें आपण पाहूं. प्रत्येक प्राण्याच्या आयुष्यांत उन्मादाची एक अवस्था आहे. त्या अवस्थेंत तो नाचतो, बागडतो, आपल्या निसर्गदत्त शरीरांतील जेवढा म्हणून सौंदर्याचा भाग त्याचें तो प्रदर्शन करितो. अतिमानव, मानव आणि अधोमानव अशा तिन्ही सृष्टींमध्यें आपणांस हा प्रकार आढळून येतो. पक्ष्यांत पुष्कळ पक्षी असे आहेत कीं, कोणास उन्मादावस्थेंत डोक्यावर तुरा येतो, कोणाच्या अंगावर निरनिराळे रंग उत्पन्न होतात, तर कोणाच्या कंठांत नादमाधुरी येते. पशूंत तर मृगाच्या उन्मादावस्थेंत नाभींतून कस्तुरी वहावयास लागते. अशी रम्य आणि रुचिर योजना करण्यांत निसर्गाचा एक उद्देश दिसतो. दृष्टिभेदक किंवा कर्णभेदक असा कांहीं विशेष उत्पन्न करावयाचा कीं,

त्यायोगें लैङ्गिक प्रतियोग्याला तो हृदयभेदक व्हावा आणि परस्परांचें आकर्षण व्हावें आणि ब्रह्मयाच्या सृष्टीचें सनातन कार्य चालू राहावें. हा निसर्गाचा कलाविलास आहे. एकदां आकर्षण झाल्यानंतर लैङ्गिक प्रतियोग्याच्या अनुनयासाठीं साधन म्हणून भाषा उत्पन्न झाली. अशा प्रकारचा भाषेच्या उद्गमाचा एक सिद्धान्त आहे; व तो नवमताच्या दृष्टीनेंच केवळ नव्हे, तर शास्त्राच्या दृष्टीनेंहि शास्त्रकारांनीं मान्य केला आहे.

आद्य प्रेमिकांच्या परस्पर अनुनयाचें आद्य साधन म्हणून जर भाषा उपयोगीं पडली तर चिरंतन प्रेमिकांच्या चिरंतन अनुनयाचें चिरंतन साधन म्हणून भाषेचा विलास किंवा वाङ्मय कां उपयोगीं पडूं नये ? वाङ्मय म्हणजे भाषेचा विलास आहे. त्यांतल्या त्यांत चिरंतन स्वरूपाचें ललित वाङ्मय तर भाषेचा आत्यंतिक विलास आहे. तेव्हां हा आत्यंतिक विलासहि आद्य मानवांच्या उन्मादावस्थेंत आपोआप उत्पन्न झाला असला पाहिजे. आदिकाव्य हें आद्य प्रेमिकांच्या अनुनयांतच उत्पन्न झालें असलें पाहिजे. पहिलें काव्य शोकांत उत्पन्न झालें असलें पाहिजे, ही कल्पनाच मुळीं पटत नाहीं. उन्मादावस्थेंत आपल्या कलाविलासांत असलेलें एक प्रेमिक क्रौंचमिथुन एक व्याध पाहातो काय, त्यांजवर तो आपल्या मृगयाकलेचा विलास दाखवितो काय, त्या मिथुनाचा वियोग होतो काय, एक ऋषि तो पाहतो काय, त्याला शोक होतो काय, आणि त्या शोकाचा श्लोक होतो काय ! आणि हा श्लोक म्हणे आद्य काव्य झालें ! मला तर या प्रसंगांत अव्वलपासून अखेरपर्यंत कृत्रिमता दिसते. केवळ शोक आणि श्लोक या दोन शब्दांतील शब्दचमत्कृति साधण्यासाठीं तर हा प्रसंग रचला नसेल ना, अशी शंका येते. मानवसमाजाचा आद्य प्रतिभाविलास हा शोकाधिष्ठित असेल, असें म्हणवत नाहीं. प्रेम किंवा चित्ताची उन्मादावस्था हीच त्याच्या मुळाशीं आहे. शोक हा प्रभावी रस आहे. वीर हा दुसरा एक रस आहे. हे सर्व स्थायीभाव नसून चलस्वरूपाचे भाव आहेत. सर्वांत कालत्रयींहि अविचल असा एकच भाव आहे, आणि तो अनुनयोत्पन्न शृंगार हा होय. म्हणूनच त्याला रसांचा राजा म्हणतात. कांहीं लोक म्हणतील, शृंगाराव्यतिरिक्त इतर भावना मनुष्याच्या व्यवहारांत नाहींत काय ? वात्सल्य, मातृप्रेम, भगिनीप्रेम, बंधुप्रेम, देशप्रेम, देवप्रेम वगैरे भावना मनुष्याच्या व जगाच्या व्यवहारांत आहेतच कीं नाहींत ? ह्यास उत्तर—होय, आहेत. परंतु हे सर्व चलस्वरूपाचे भाव असून, त्या एका प्रेमभावनेचे निरनिराळे पैलू आहेत. आधुनिक

मानसशास्त्रीय संशोधनानेंहि हीच गोष्ट सिद्ध केली आहे. लैङ्गिक समाधानाची जी एक जातीय वृत्ति जीवनाच्या ठिकाणीं आपणांस आढळून येते, तिचे वर सांगितलेले चलभाव हीं रूपांतरें होत. ह्या सर्व चलभावांच्या मुळाशीं एकच चिरंतन आणि अविचल भावना आहे; तीं म्हणजे लैङ्गिक समाधानाची जातीय वृत्ति.

प्रत्येक प्राणी आपल्या आयुष्यांत केव्हां तरी एकदां कां होईना, प्रेम करितो, एकदां केव्हां तरी त्या उन्मादावस्थेंत असतो, आणि तो त्या अवस्थेंत आला कीं गुणगुणतो; आणि गुणगुणला कीं त्याच्या हातून भाषा तर निर्माण होतेच, परंतु भाषाविलास किंवा वाङ्मय उत्पन्न होतें. एखाद्याला लैङ्गिक प्रतियोगी जर प्रत्यक्ष सृष्टींत भेटला नाहीं, तर एकलव्यानें ज्याप्रमाणें आपल्या गुरूची प्रतिमा कल्पनेनें पुढें उभी करून आपल्या कलेचा विलास केला, तद्वत् प्रतियोग्याची मूर्ति कल्पनेनें उभी करून आपल्या भाषेचा किंवा वाङ्मयाचा विलास व विकास तो करितो. अशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कल्पना करून, तिजवर आपली कला किंवा वाङ्मय अधिष्ठित करून, तिचा विलास करणें, ह्यालाच प्रतिभेचा किंवा दैवी शक्तीचा विलास म्हणतात. अशी ही विलास उभारण्याची शक्ति प्रत्येकाजवळ असते; परंतु ती एकजिनसी, एकस्वरूपी असणें शक्य नाहीं. सर्वांच्यामध्यें भावनांचें औत्कट्य किंवा अतिशयित्व सारखें असणें शक्य नाहीं. प्रत्येकाच्या प्रेमवृत्तीच्या घटनेंत कमीअधिकपणा असणारच; व त्यामुळें तीवर उभारलेला वाङ्मयविलासहि सरसनीरस असणार, हें उघड आहे. सर्वांचें आत्मप्रकटीकरण किंवा वाङ्मय हें सारख्या दर्जाचें नसतें ह्याचें कारण हेंच आहे. प्रेमवृत्ति ही सर्वांनाच असते; परंतु तिचें औत्कट्य सर्वांचें सारखें नाहीं. भावनांसंबंधींचें ईश्वराचें देणें हें सर्वांनाच आहे. परंतु त्यांचें प्रकटीकरण कांहींचें नवनवोन्मेषशाली असतें, तर कांहींचें मन्दोन्मेषशाली असतें. मन्दोन्मेष कां होईना, पण सर्वांना तो असतो हें खास. दोहोंमध्यें फरक कमीअधिकपणाचा आहे, जातिभिन्नत्वाचा नाहीं. दोघांच्या प्रमाणांत अंतर आहे, प्रकारांत नाहीं.

भावनांचें औत्कट्य किंवा आतिशयित्व हीच उन्मादावस्था होय; हिलाच मी उन्मनी अवस्था म्हणतों (येथें उन्मनी अवस्थेचा वेदान्तांतील अर्थ मला अभिप्रेत नाहीं). ही सर्वांच्या वांट्यास असली तरी सर्वांत सारखी वांटली गेली नाहीं. तिच्यांत तरतमभाव दिसून येतो. देवांचे जे लाडके त्यांनाच तिची विशेष देणगी असते. ती इतकी कीं, सामान्य व्यवहाराच्या दृष्टीनें ते इतरांपासून निराळे

दिसतात व निराळे वागतात. प्रेमी, वेडा व प्रतिभावंत हीं तिन्ही माणसें एका भ्रमिष्टाच्या कोटींत जीं घातलीं जातात तीं ह्यामुळेंच. वैद्यकीय दृष्ट्या ही अवस्था म्हणजे मानसिक व शारीरिक विकृतीच समजतात; व ही मोठमोठ्या लोकांच्या बाबतींत दिसून येते. त्यांचीं उदाहरणें मोठीं पाहण्यासारखीं आहेत. कोणी म्हणे झाडाच्या फांदीच्या टोकावर बसून बुंध्याची बाजू कुऱ्हाडीनें तोडूं लागला ! कोणी म्हणे कुत्र्यानें पळविलेल्या गव्हाच्या पोळया त्याच्या पोटास टोचतील म्हणून त्याच्या मागें तुपाची वाटी घेऊन धावला ! कोणी वाटमाऱ्यासारखे खून करीत होता, तर कोणी शिवलिंगावर पाय ठेवून रोज देवळांत झोपा काढीत असे ! कोणी गळ्यांत साप अडकवून वाघावर स्वार होत असे ! कोणी पांखरें आपणांस पाहून भ्यालीं व उडालीं म्हणून तीं खांद्यांवर घेऊन स्वेच्छेनें खेळेपर्यंत तसाच उन्हांत बसून राहिला ! कोणी आपल्या स्त्रीच्या महालांतून लोंबकळत असलेला नाग हा तिनें आपल्यासाठीं मुद्दाम सोडलेला दोर समजून त्याला धरून वर महालांत चढला ! कोणी नारळ देशावर विकत घेऊन कोंकणांत विकण्यास नेतो, कोणी गटाराच्या बाजूनें चालतो, तर कोणी गीतारहस्यासारख्या पूज्य ग्रंथांवर पादत्राणें ठेवण्यास सांगतो ! कोणी रस्त्यांतील खांब मोजतो, तर कोणी सिगारेट म्हणून जवळ बसलेल्या स्त्रीच्या हाताचें बोट तोंडांत घालून काडीनें शिलगावण्याच्या बेतांत येतो ! असे हे प्रतिभासंपन्नांचे लोकविलक्षण व्यवहार आहेत. वाङ्मयाचा विलास करणाऱ्या प्रतिभावंतांचेच फक्त असे लोकविलक्षण व्यवहार आहेत असें नाहीं, तर इतर प्रतिभावंतांच्या बाबतींतहि हीच तऱ्हा अवलोकनांत येते. न्यूटननें म्हणतात प्रतिभेच्या झटक्यांत असतांना आधणाच्या पाण्यांत अंडें टाकावयाच्याऐवजीं घड्याळच टाकलें ! नेपोलियन रशियांत गेला, त्यानें मॉस्को शहर जिंकलें आणि तेथें जात असतांना म्हणे राजवाड्याच्या खिडक्याच तो मोजीत बसला ! जॉन्सननें असेंच एका झटक्यांत कांहीं कारणावरून आपल्याजवळ खुर्चीवर बसलेल्या माणसास त्याच्या खुर्चीसकट फेकून दिलें ! आर्किमिडीज हा आंघोळीच्या महापात्रांतून नागवा-उघडा बाहेर येत असे असें म्हणतात ! राजवाडे ह्यांना असे झटके वारंवार येत व त्याचा परिणाम त्याच्या स्नेह्यांना सोसावा लागे, हें अगदीं ताजें उदाहरण आहे. राजारामशास्त्री भागवत हे इराण्याच्या दुकानांत बसून पावाचा तुकडा चघळत बाहेरून येणाऱ्याजाणाऱ्या शामभट-रामभटांना वाकुल्या दाखवीत असत. हे सर्व झटके आहेत. हे झटके येण्याचे काळहि ठरलेले आहेत. कोणाकोणास हे झटके

कृत्रिम उपायानें आणावे लागतात. डीक्विन्सी हा अफूच्या गोळ्या पुनःपुनः ठाशी म्हणजे त्यास हे झटके येत! कीट्स म्हणे मिऱ्याची पूड इतकी खाई कीं, त्याचे डोळे पांढरे होत! रूसोला उन्हांत बसल्यानंतर प्रतिभेचा झटका येई. मिल्टनचीहि गोष्ट तशीच. शेगडीजवळ तो बसला कीं त्याला नवनव्या कल्पना सुचत. शेलीस समुद्राच्या कांठास बसावें लागे. डिकन्स हा लांबलांब मजला मारी व नंतरच त्याला कल्पना सुचत. सिगारेट पेटवून तिच्या धुराकडे पाहात पाहात पुष्कळांना नवे विचार सुचल्याचीं उदाहरणें येथें आपणाभोंवतीं आहेत.

प्रेमाची भावना ही आद्य भावना, त्या भावनेचें औत्कट्य हें खऱ्या आद्यकाव्याचें किंवा कलात्मक वाङ्मयाचें मूळ, सत्याचा आभास व सौंदर्याचें आकर्षण व प्रकटीकरण हें त्याचें ध्येय, वास्तवता व आदर्शवत्ता हीं दोन त्याचीं अधिष्ठानें, प्रतिभावंताची भावनौत्कट्याची उन्माद वा उन्मनी अवस्था व त्या अवस्थेंत त्याच्या हातून होणारें लोकविरुद्ध वर्तन वगैरे गोष्टी आपण येथवर पाहिल्या. आतां त्यालाच निगडित अशी जी काव्यानंदाची क्रिया ती होतांना काय बनाव होत जातो तें आपण पाहूं.

वरील मांडणीवरून हीहि गोष्ट जातां जातां सिद्ध झाल्यासारखीच आहे कीं, काव्याचें किंवा भावनौत्कट्यापासून निर्माण झालेल्या वाङ्मयाचें स्वरूप हें 'गेय' होतें. काव्याची गेयता ही स्वाभाविकच आहे. प्रेमाच्या किंवा प्रेममूलक इतर भावनांच्या औत्कट्यावर आधारलेलें काव्य वा वाङ्मय आणि गेयता ह्यांचा संबंध, हा अव्यभिचारी स्वरूपाचा आहे. ह्या दोहोंमध्यें व्याप्ति आहे. कोणी झाला तरी जो गातो तो प्रेमाच्या आनंदानेंच. दुःखांत गाणें कसें सुचणार ? ही गेयता आंतर आणि बाह्य अशा दोन्ही स्वरूपांची असते. अस्सल व अव्वल दर्जाच्या वाङ्मयांत शब्दाचें नादमाधुर्य असतेंच; गुणगुणणें तर ऐकूं येतेंच; परंतु अनुभवांचें, अनुभावांचें गुणगुणणें इतकेंच नव्हे, तर आत्म्याचें गुणगुणणें ऐकूं येतें. अशा प्रकारच्या द्विविध गेयतेबद्दल संभ्रम होऊन कांहीं कांहीं ठिकाणीं भिन्न मतें ऐकूं येतात. खऱ्या वाङ्मयांत, मग तें गद्य असो वा पद्य असो, ही द्विविध गेयता—आंतर व बाह्य—असणारच; व हीच द्विविध गेयता दुसऱ्याच्या अंतःकरणाच्या तारांना स्पर्श करून त्यांच्यांतून तीच गेयता उत्पन्न करिते. अशी गेयता उत्पन्न झाली कीं वाङ्मयानंद किंवा काव्यानंद उत्पन्न होतो. कवि किंवा प्रतिभासंपन्न कलावंत हा थोडाफार परिसासारखा आहे. सौंदर्यदर्शन किंवा आत्मप्रकटीकरण ह्यापासून

आपणास झालेला आनंद दुसऱ्याच्या अंतःकरणाच्या तारा छेडून व त्यामध्यें उत्पन्न करून, तो त्याला आपल्यासारख्या समाधीच्या अवस्थेंत, त्या काळापुरता कां होईना, पण ठेवितो.

काव्यानंद हा ब्रह्मानंदासारखा आहे. ब्रह्मानंद हा उन्मनी अवस्थेंतच फक्त अनुभविला जातो. उन्मनी अवस्थेंत आपलें स्वतःबद्दलचें जाणपण विसरून गेलेलें असतें. तेथें स्वतःसंबंधींच्या कल्पनांच्या लहरी उठत नाहींत. मन हेंच चैतन्याच्या डोहांत निमग्न झालेलें असतें. तेथें ईश्वरस्वरूपावांचून दुसरें कांहींच आठवत नाहीं. ही जी परमात्मज्ञानांतील उन्मनी अवस्था ब्रह्मानंदाच्या प्रतीतीस कारणीभूत होते, तीच अवस्था आत्मसंवेदनांतील काव्यानंदाच्या प्रतीतीस कारणीभूत होते. येथेंहि स्वतःचा स्वतःला विसर पडतो. काव्यस्वरूपाखेरीज दुसरें कांहीं दिसत नाहीं. मन हें कलेनें उत्पन्न केलेल्या आनंदडोहांत सारखें डुंबत राहातें; सर्व इंद्रियांच्या वृत्ति आपापलें कार्य विसरून चित्ताच्या वृत्तींत लय पावतात व त्याच्या मार्फत कलानंदांत गढून जातात. काव्यानंदाच्या आस्वादाशिवाय दुसरें कार्यच शिल्लक राहात नाहीं. ह्याला मग तुम्ही सविकल्प समाधि म्हणा, किंवा सहानुभूतिपूर्वक ताटस्थ्य म्हणा, किंवा स्वायत्त तादात्म्य म्हणा, किंवा आत्मौपम्यबुद्धीनें परकायाप्रवेश म्हणा, हा आनंद चाखतांना स्वत्वविस्मरणाचा सुखाचा क्षण येतो खरा.

ही आनंदाची वृत्ति व हिच्याविषयीं होणारी क्रिया ह्यासंबंधीं वर उल्लेखिलेले सिद्धांत तितकेसे मला पटत नाहींत. ही क्रिया होते कशी ह्यासंबंधीं मला स्वतःला जी उपपत्ति वाटते ती येथें थोडक्यांत मांडतों.

सविकल्प समाधि ही समाधि खरी, परंतु तिच्यांत स्वत्वाची जाणीव नाहींशी होत नाहीं. वाङ्मयानंदाच्या समाधींत कांहीं थोडासा विकल्प राहतोच. सहानुभूति आणि ताटस्थ्य हे दोन्ही परस्परविरोधी शब्द आहेत. सहानुभूति म्हणजे दया, माया नव्हे. सहानुभूति म्हणजे एकसारखे एकजातीचे अनुभव होत. आणि एकजातीचे अनुभव आल्यावर ताटस्थ्य राहणार कसें ? सारख्या अनुभूतींच्या व्यक्ति एकरूप झाल्याच पाहिजेत. त्याशिवाय आनंदैक्य किंवा दुःखैक्य साधणार कसें ? स्वायत्तत्व व तादात्म्य हे दोन्ही शब्दहि परस्परविरोधीच आहेत. परक्याच्या स्वरूपांत शिरावयाचें तर पुनः स्वायत्तता कशी राहणार ? येथें परायत्तताच प्राप्त होणार. आत्मौपम्यबुद्धीनें परकायाप्रवेश आणि स्वायत्त तादात्म्य ह्या दोन्ही क्रिया जवळजवळ सारख्याच आहेत. आपल्या स्वतःच्या सारखेपणाच्या बुद्धीनें दुसऱ्याच्या

कार्येत प्रवेश करणें, ही क्रिया फार थोडक्यांनाच शक्य आहे. सर्व शंकराचार्य थोडेच आहेत ? तेव्हां वाङ्मयाच्या आनंदाची उपपत्ति ह्यांपैकीं कोणत्याहि सिद्धान्तानें नीट लागत नाहीं. मग ही आनंदाची क्रिया होते तरी काय ? ह्या क्रियेंत मानसिक चाल्ना होतात तरी काय ? दुष्यन्त आश्रमांत गेल्यावर त्याचें मन रमल्याबरोबर आपलेंहि मन रमतें. शकुंतलेनें प्रेमपत्रिका लिहिलेली पाहिल्याबरोबर आपण स्वतः लिहिलेल्या किंवा आपणाला आलेल्या प्रेमपत्रिकेची स्मृति जागृत होते. कण्वानें मुलीला सासरीं जातांना दिलेला प्रेमाचा निरोप ऐकिला कीं, आपणच आपल्या मुलीला सासरीं जातांना अश्रुपूर्ण नयनांनीं निरोप देत आहों, अशी अनुभूति जागृत होते. भरदरबारांत विश्रब्ध परिणीत वधूचा उघड उघड उपमर्द व अधिक्षेप झालेला पाहून आपल्याच परिचयाच्या निरपराध स्त्रीवर निष्कारण अन्याय झाल्याचा सात्त्विक संताप येतो. रजकानें स्वपत्नीसंबंधीं केलेला जनप्रवाद ऐकून रामाप्रमाणें आपल्याहि मनांत खळबळ होते. उलट, निरपराध आणि आसन्नप्रसव स्त्रीला रानांत टाकल्याबद्दल रामाचा रागहि पण आपणांस येतो. हे व इतर वाङ्मयवर्णित प्रसंग पाहातांना व वाचतांना ज्याप्रमाणें राम आपल्याच आयुष्यांतील दृश्यें पुनः चित्रपटांत पाहतो, त्याप्रमाणें आपणहि आपल्याच आयुष्यांतील दृश्यें रामचरित्राच्या किंवा त्या त्या व्यक्तीच्या आयुष्याच्या चित्रपटांत पाहतों. धैर्यधरानें केलेला पराक्रम आपणच करीत आहों, लक्ष्मीधराचा उल्लूपणा आपलाच किंवा आपल्या परिचयाच्या कोणातरी मनुष्याच्या उल्लूपणासारखा आहे, असें आपण ठरवितों. यमुनेची विटंबना करणारे शंकरमामंजी किंवा 'घराबाहेर' मधील निर्मलेचे हाल करणारे आबासाहेब आपल्या भोंवतालच्या समाजांत किती तरी निरपराध, असहाय स्त्रियांना सळो कीं पळो करून सोडीत असतील याची प्रतीति वाचकांपैकीं त्या त्या शंकरमामंजीला, त्या त्या आबासाहेबाला किंवा त्या त्या यमुनेला व निर्मलेला येत नसेल काय ? 'प्रेमसंन्यासां'तील द्रुमन किंवा 'उद्याच्या संसारां'तील करुणा हिच्यासारख्या स्त्रिया एखादा कमलाकर किंवा बॅरिस्टर विश्राम यासारख्या लुब्धकाच्या मानभावी भाषणाला बळी पडून कर्दमांत रुतलेल्या पाहून किती स्त्रियांना अनुकंपा वाटली असेल ? व तशीच गत जर आपली झाली, तर त्यांनीं अवलंबिलेला मार्ग हाच योग्य मार्ग व आपणहि त्याच मार्गाचा अवलंब करूं, असें कित्येक समान स्थितींतील स्त्रियांना वाटत नाहीं काय ? 'कळ्यांच्या निःश्वासां'तील कळ्या आपल्याच घरांत, आजूबाजूस, आवतींभोंवतीं असल्याची जाणीव 'कळ्यांचे निःश्वास' हें पुस्तक वाचून जागृत होते,

म्हणूनच तें आपण हातांत घेतों. सुधारकाग्रणी म्हणून नांवाजलेले पटवर्धनांचे रावबहादुर के. व्ही. ठोसर आपल्याच घरासमोरच्या दिवाणखान्याच्या घरांत राहात असलेले आपणांस दिसतात, म्हणून त्या आत्मीयतेनें आपण 'सुधारक' हें काव्य वाचतों. अभागी कमल किंवा गिरणींत काम करणारा व मुंबईच्या खुराड्यांत गटारांतील वैतरणीच्या कांठीं राहणारा मुरार वगैरे मंडळी आपल्याच खेडेगांवची म्हणून आपली त्यांच्याशीं चिरपरिचितता जागृत करितात. बंडूनाना, पांडुतात्या किंवा त्यांचे वाङ्मयीन वंशज तिंबुनाना व बाळक्या वगैरे ठकीच्या लग्नासाठीं निघालेली मंडळी तर उपवर मुलींच्या बापाची आत्मीयता विशेष उत्कटपणानें जागृत करितात. वसंतसेनेसारख्या गणिकेवर प्रेम करणारा चारुदत्त, मालतीच्या प्रेमासाठीं जारण-मारण-अभिचरणांत सामील होणारा माधव, डेस्डेमोनेचा ससेमिरा अयागो, दारुड्या नवऱ्याच्या काठ्या निमूट सहन करणारी सिंधू, विसरभोळा गोकुळ, साष्टांगनमस्कारी रावबहादुर, व्याख्यान ठरलें कीं खादीचा पोषाख करणारा 'सत्तेच्या गुलामां'तील वकील, किंवा पैठणीची मच्छरदाणी करणारा परीट इत्यादि मंडळींचा व्यवहार जो आपलाच व्यवहार वाटतो तो आपण त्यांच्या कायांत प्रवेश करतों म्हणून वाटतो, का स्वायत्त तादात्म्यानें वाटतो, का सविकल्प समाधीनें वाटतो? वाचकाला स्वतःच्या आयुष्यांत ज्या निरनिराळ्या अनुभूति येतात, त्या सर्व अनुभूति ह्या पात्रांच्या दर्शनानें जागृत होतात, म्हणूनच त्यांनीं केलेला व्यवहार त्याला आपलासा वाटतो. उल्केसारख्या कितीतरी मास्तरणी आपल्याभोंवतीं त्याच परिस्थितींत दिसतात, आपल्या परिचयाच्या कितीतरी अनसूया 'भंगलेल्या देवळां'त आपल्या कथा सांगत असलेल्या आपणांस दिसतात, म्हणूनच त्यांच्या हकीकती आपण आत्मीयतेनें वाचतों. मथूसारख्या कित्येक विधवाकुमारी आपल्याभोंवतीं नुसती कुंकवाचीच तेवढी उठाठेव करून न थांबतां आयुष्यांतील दुसऱ्या कितीतरी गुंतागुंतीच्या प्रश्नांची उठाठेव करतांना दिसतात, म्हणूनच आपण मथूची हकीकत तन्मय होऊन वाचतों. तरुणानेंच तेवढें प्रेम करावें, प्रेम करणें हा तरुणांचाच जन्मसिद्ध हक्क आहे, इतरांचा नाहीं, विधुरांचा तर नाहींच नाहीं, असें संजीवनीनें कां सांगावें? म्हाताऱ्या माणसांना किंवा विधुरांना प्रेम करण्याचा का हक्क नाहीं? का तीं माणसें नाहींत? का त्यांना विकार नाहींत, का भावना नाहींत? ह्या तरुण व वृद्ध अशा भिन्न विचारसरणींत तरुण वाचक संजीवनीच्या विचारसरणीशीं व वयस्क बिचारे वाचक रावसाहेबांच्या विचारसरणीशीं एकरूप व तन्मय होतात, म्हणूनच त्यांना त्या

कलाकृतींत गोडी लागते.

ह्या सर्व कलाकृतींत निरनिराळ्या पात्रांनीं उत्पन्न केलेल्या कलानंदांत जे आपण लीन होऊन जातों ते त्यांच्याशीं तादात्म्य पावून पुनः तटस्थ राहतों म्हणून नव्हे, किंवा आपला विकल्प कायम ठेवून त्यांच्याशीं समाधि लागते म्हणून नव्हे, किंवा आत्मौपम्यबुद्धीनें आपण त्या त्या पात्रांच्या कार्येंत प्रवेश करितों म्हणून नव्हे, तर आपल्या उभ्या आयुष्यांत निरनिराळ्या अनुभूति आपणांस येतात त्यांची जागृति ह्या निरनिराळ्या प्रसंगांनीं व पात्रांनीं केली जाते, म्हणूनच हा आनंद आपणांस मिळतो. अमुक एका नाटकांतील नायक मीच, तमुक एका कादंबरींतील नायिकाहि पण मीच, हा अमुक नाटकांतील खलपुरुष माझ्या आयुष्यांत मला छळणाऱ्या थेट प्रतिस्पर्ध्यासारखा, अमुक एका कथानकांतील प्रसंग हा माझ्या आयुष्यांतील अमुक प्रसंगासारखा, अशी जाणीव ह्या कलाविश्वांतील प्रत्येक व्यक्तीकडून आणि प्रसंगाकडून उत्पन्न केली जाते. "सोऽहम् सोऽहम्, सोऽयम् मे संनिकटवर्ती, सेयम् संवित् ममैव, सा पुनः अनुभूतिर्ममैव, अयम् ममैव विकारः" अशा प्रकारची प्रत्यभिज्ञा पदोपदीं जागृत होते; व प्रत्यभिज्ञा जागृत झाली कीं आनंद होतो. आपल्या आयुष्यांत आपण स्वतः जे कांहीं अनुभव अनुभवितों व दुसऱ्यांनीं अनुभविलेले पाहतों, ज्या कांहीं विकारांना आपण वश होतों व दुसरे वश झालेले पाहतों, त्या अनुभवांचा, संवित्तींचा संचय आपण आपल्या मेंदूंत करीत असतों. निरनिराळ्या अनुभवांच्या, संवित्तींच्या संचयाचीं केंद्रें किंवा गंड आपल्या मेंदूंत बनत असतात. आपल्या प्रतिभेच्या जोरावर एखादा कलावंत ज्यावेळीं आपल्या कलाकृतींत निरनिराळ्या पात्रांच्या किंवा प्रसंगांच्या द्वारें निरनिराळे अनुभव, अनुभाव, भावना व विकार उठवितो, त्या वेळीं त्यांच्या दर्शनानें किंवा वाचनानें आपल्या मेंदूंतील तज्जातीय केंद्रें अथवा गंड स्पर्शिले जाऊन जागृत केले जातात. ह्या रीतीनें प्रत्यभिज्ञा जागृत होते व कलानंद किंवा काव्यानंद अनुभविला जातो. ह्या अवस्थेंत स्वत्व व परत्व ह्या दोहोंची जाणीव राहाते. स्वकार्येंतच आपण राहतों. जशी मनुष्याची संस्कृति असेल तसें त्याचें हें अनुभूतीच्या केंद्रांचें उच्चनीचत्व असेल. जशी संस्कृति तशीं केंद्रें. ज्ञानानंद, कलानंद, काव्यानंद हे सर्व प्रत्यभिज्ञाजागृतीनें आपणांस होतात, हें वरील विवेचनावरून सिद्ध आहे.

हीं अनुभूतीचीं केंद्रें व प्रत्यभिज्ञेच्या जागृतीचें क्षेत्र वाढविण्याची जबाबदारी प्रतिभासंपन्न लेखकांवर पडते; आणि ह्या कामांत त्यांना राष्ट्रांतील संपन्न लोक,

संस्था व सरकार यांनीं साहाय्य केलें पाहिजे. प्रतिभासंपन्न लेखकांनीं मानवी जीवनांतील निरनिराळ्या प्रकारच्या व्यवहारांत पडून आपल्या अनुभूतीचीं केंद्रें वाढविलीं पाहिजेत, तीं आपल्या कलाकृतींत उतरविलीं पाहिजेत, आणि तद्द्वारा वाचकांची प्रत्यभिज्ञा जागृत करून त्यांना वाङ्मयाच्या आनंद चाखविला पाहिजे. आपल्याकडील प्रतिभासंपन्न लेखकांचें निरीक्षणक्षेत्र आकुंचित आहे, आपल्याकडील वाङ्मय कांहीं एका विशिष्ट समाजाचेंच आहे, आपल्याकडील काव्याची हाक सर्वत्र व सर्व जनांना पोंचतच नाहीं, इत्यादि जी हाकाटी आपणांस ऐकूं येते तिचा अर्थ इतकाच कीं, त्या लेखकांचीं आम्ही म्हणतों त्याप्रमाणें अनुभूतीचीं केंद्रें फार आकुंचित आहेत. हीं केंद्रें वाढविण्यासाठीं राष्ट्रांतील व्यवहार वाढला पाहिजे. पाश्चात्य देशांत जीवनासाठीं होणारा व्यवहार निरनिराळ्या प्रकारचा झाला असल्यामुळें तेथील लोकांच्या अनुभूतीचीं केंद्रें आपल्यापेक्षां किती तरी पटींनीं वाढलीं आहेत ! जीवनाच्या विविधतेचें प्रतिबिंब त्यांच्या वाङ्मयावर पडलेलें आहे. स्वभावदर्शन, भावनादर्शन, विकार, विचारप्रकटीकरण ह्यांचे कितीतरी निरनिराळे नमुने आपणांस त्यांच्या वाङ्मयांत दिसतात ! त्यांच्या जीवनांतील विविधतेनें त्यांच्या वाङ्मयांत विविधता आणिली आहे. आपल्याकडील आधुनिक वाङ्मय जर अशा रीतीनें विविध प्रकारचें करावयाचें असेल तर आपला जीवनव्यवहार वाढविला पाहिजे.

हीं अनुभवाचीं केंद्रें निरनिराळ्या काळीं निरनिराळीं उत्पन्न होतात. भावार्थदीपिकेपासून तों यथार्थदीपिकेपर्यंतच्या काळांत हे अनुभव आध्यात्मिक स्वरूपाचे असल्यामुळें त्या काळांतील सर्व वाङ्मय आध्यात्मिक उत्पन्न झालें. शिवकाल व पेशवेकाल ह्यांमधील नवीन उपलब्ध झालेलें वाङ्मय वाचलें म्हणजे दुसरेंच जीवन आपल्यासमोर येतें. स्वराज्यप्राप्तीसाठीं व आधिभौतिक ऐश्वर्यासाठीं केलेला व्यवहार शिवकालीन वाङ्मयावरून कळतो. पुढील पेशवाईच्या काळांतहि आक्रमणशील जीवन व त्याच्या सिद्धीसाठीं केलेले आटोकाट श्रम हे त्या काळांतील पत्रव्यवहारावरून समजतात. आधुनिक काळाकडे पाहिलें, तर एकंदर समाजजीवनांत निरनिराळ्या प्रकारचे व्यवहार सुरू झाले आहेत व त्यांचें दिग्दर्शन आधुनिक वाङ्मयामार्फत करण्यास आतां कोठें सुरुवात झाल आहे, असें मात्र दिसतें. आरंभ झाला आहे. १९२० सालापासून जीवनवैविध्य तर सारख्या द्रुत व प्लुत गतीनें आक्रमण करीत आहे. परंतु त्याचें वाङ्मयद्वारा प्रकटीकरण किंवा दर्शन मात्र जितक्या

त्वरित गतीनें व्हावयास पाहिजे तितक्या रीतीनें होत नाहीं. त्याला कारणें पुष्कळ आहेत. विश्वविद्यालयांत मराठीचा साधासुधा व मानाचा शिरकाव झाला खरा; परंतु त्याचा फलादेश तितकासा दृष्टींत भरण्यासारखा झाला नाहीं. गेल्या पंधरा वर्षांतील नव्या पदवीधर पिढीचें मराठी लिखाण वाचलें, तर तें जाडीनें अथवा लांबीनें अशा कोणत्याच दृष्टीनें डोळ्यांत भरत नाहीं. कांहीं चारदोन लेखक चांगलें लिहितात हें खरें, नाहीं असें नाहीं; परंतु मराठीचा विश्वविद्यालयांत शिरकाव झाल्यानें जी कांहीं अपेक्षा बांधली गेली होती ती पुरी झाली नाहीं, असें कष्टानें म्हणावें लागतें. गेल्या पंधरावीस वर्षांतील वाङ्मयनिर्मिति पाहिली, तर ती पंधरा वर्षांपूर्वीच्या वाङ्मयपिढींतील पदवीधर लेखकांनीं केलेली आपणांस दिसेल. यांतील कित्येक विश्वविद्यालयीन व्यवहारांशीं मुळींच संबंध न आलेले लोक आहेत. एवढेंच नव्हे, तर कित्येकांना विश्वविद्यालयीन उच्च शिक्षणाचा संस्कारहि झालेला नाहीं. तरीपण त्यांनीं आपापल्या परीनें आपल्या अनुभवाचें क्षेत्र वाढवून वाचकांच्या प्रत्यभिज्ञेचें क्षेत्र वाढविलें आहे. नाट्याच्या तंत्रामध्यें क्रांति करणारीं नाटकें एका शाळेच्या प्रमुखांनीं (अत्रे) किंवा एका माजी पोस्टमास्तरांनीं (वरेरकर) लिहिलीं आहेत. जिवंत पात्रें, जिवंत अशा प्रसंगांत वावरत असलेल्या लघुकथा लिहिण्याचें काम कोंकणांतील खेड्यांत बसून एक साधे शिक्षक (खांडेकर) करीत आहेत. राष्ट्रांतील तरुण पिढीच्या भावना उचंबळून टाकणाऱ्या व हृदयाला कारुण्याचा पीळ पाडणाऱ्या कविता लिहिण्याचें काम एक बारा तास राबणारे 'बंदीशाळें'तील कारकून (यशवंत) करीत आहेत. कलेच्या मूर्तीची मनोभावें सोपस्कर पूजा करून मराठीची दौलत अटकेपार नेण्याचें काम एक मानसशास्त्राचे अध्यापक (फडके) करीत आहेत. शास्त्र व ललित वाङ्मय यांच्या खनी खोदून, सोनें मिळो कीं माती मिळो, अशा दोन्ही स्थितींत एकच आनंद एक फार्सी-विशारद (पटवर्धन) मानीत आहेत. विदग्ध-ललित अशा वाङ्मयप्रासादाचीं सर्व दालनें मोठ्या कुशलतेनें आणि मोठ्या नेटानें व सताड उघडीं करून सर्व अभ्यासकांना मार्गदर्शी असें चहूप्रकारचें लिखाण एक संपादकसम्राट् (केळकर) करीत आहेत. इतिहास, समाज, व्याकरण ह्यांसारख्या रुक्ष आणि क्लिष्ट विषयांचा पिच्छा पुरविण्याचें काम एक जीवनासाठीं ग्रंथप्रकाशन करणारे संशोधक (आपटे) एक संस्कृत माजी न्यायाधीश (चापेकर) व एक माजी व्हॅक्सिनेटर (पावशे) करीत आहेत. भंगलेल्या देवळांतील चिजा राखविण्याचें कार्य महाराष्ट्रांतून दूर असलेले एक अज्ञात संपादक (माडखोलकर)

करीत आहेत. नारीहृदयाचें सूक्ष्म विश्लेषण एक अनामक स्त्री (विभावरी) करीत आहे. बुद्धीला पटणारी, भावनांना विळखा घालणारी, हृदयांना उचंबळविणारी अशा कलेची क्रांति य उन्नति एक हिंगण्यासारख्या तपोवनांत राहणारे अध्यापक (वामनराव जोशी) करीत आहेत. वायफळांचे मळे लावण्याचें किंवा एरंडाच्या गुऱ्हाळांतून रसनिष्पत्ति करण्याचें अघटित काम एक राजदप्तरदार (जोशी) चिमणराव करीत आहेत. आपल्या पूर्वजांच्या तीनशें वर्षांच्या इतिहासाचा प्रपंच, सारखे तीस वर्षे राबून काळाचे व दैवाचे तडाखे न जुमानतां, आपल्या आयुष्याचें कर्तव्य म्हणून राजपुत्राचे एक माजी शिक्षक (सरदेसाई) करीत आहेत. महाराष्ट्रसारस्वताचा रसाळ इतिहास, एक राजमातांचे पुराणिक (पांगारकर) लिहीत आहेत.

असा हा सर्व देखावा पाहिला म्हणजे, आधुनिक मराठीच्या सद्यःकालाबद्दल अभिमान वाटतोच, पण भावी कालाच्या ऊर्जस्वलतेबद्दलहि तो अपेक्षा वाढवितो. ही अपेक्षा तत्काल फलद्रूप होण्यासाठीं प्रतिभेच्या एका उज्ज्वल भरारीच्या क्षणांत माझ्या डोळ्यांपुढें असें नवलपुरचें नवलसंस्थेचें चित्र उभें राहतें कीं, केळकर, केतकर, वामनराव जोशी, फडके, खांडेकर, अत्रे, वरेरकर, चिंतोपंत जोशी, पु. य. देशपांडे, हे सर्व एका संस्थेंत मराठी वाङ्मयाच्या अभ्युदयासाठीं एकजुटीनें काम करीत आहेत. हे सर्व एकांडे शिलेदार खरेच; परंतु जिवंत मराठी वाङ्मयाची निर्मिति व अभिवृद्धि यांसाठीं ह्या सर्व शिलेदारांचीं घोडीं एका पागेंत आणून जबरदस्ती करून बांधण्यासारखी लोभनीय अशी दुसरी गोष्ट कोणती असेल? ह्या सर्वांचा योगक्षेम सरकार, संस्थानिक आणि विश्वविद्यालयासारख्या संस्था मोठ्या उदारपणानें चालवीत आहेत. पैशाची ददात नाहीं, दैवी प्रतिभेची ददात नाहीं. हें सुखमय स्वप्न खरें! परंतु हें वास्तवतेच्या अधिष्ठानावर लवकरच अधिष्ठित होण्याची चिन्हें दिसत आहेत.*

* ३० मे १९३६ रोजीं पांचव्या शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेलें भाषण

# २ विक्रम-कथा

भारतीय कथावाङ्मयांत राजा विक्रमादित्य, त्याचें अवंतीचें राज्य व त्याची राजधानी उज्जयिनी ह्यांचें महत्त्व विशेष आहे. गेल्या दीड हजार वर्षांतील कथा-वाङ्मय—संस्कृत, प्राकृत व मराठीसारख्या प्राकृतोद्भव भाषांतील—ह्या वरील तीन केंद्रांभोंवतीं सारखें फिरत असल्याचें दिसत आहे. काल्पनिक कथा कोणत्याहि वाङ्मयप्रकारांतील असो—ती काव्यांत गायिली असो, किंवा आख्यानवाङ्मयांत सांगितली असो किंवा नाटकांत दाखविली असो—तिचा नायक विक्रमादित्य राजा असावयाचा व कथेची सर्व घटना उज्जयिनीच्या आसपास व्हावयाची असें साधारण-पणें ठरलेलें असे. इतर वाङ्मयसंकेत जसे होतात तसे विक्रमराजा व उज्जयिनी ह्यांसंबंधीं वाङ्मयसंकेत बनले होते. कोशांबी, प्रतिष्ठान (पैठण), आटपाट, इत्यादि आणखी कांहीं नगरांचाहि उल्लेख आला तरी त्यांचा संबंध उज्जयिनीशीं लावल्या-खेरीज कथालेखकांना कथापूर्तीचें समाधान झालें असें वाटत नसे. सातवाहन, हाल, इत्यादि राजांचा उल्लेख जरी आला तरी त्यांचा कुठून का होईना पण विक्रम-राजाशीं संबंध जोडला जात असे. हा असा संबंध जोडण्यांत मग कालविसंगतीचा दोष कितीहि झाला तरी तो त्यांच्या ध्यानींमनींहि नसे. असें कांहींसें वेधकतेचें व लोभनीयतेचें वलय विक्रमराजा व उज्जयिनी यांच्याभोंवतीं पडलेलें होतें. पृथ्वीवरील स्वर्ग म्हटला कीं उज्जयिनी, सर्व आदर्श वस्तूंचें आगर म्हटलें कीं उज्जयिनी, सर्व घटनांचें योग्य स्थान म्हटलें कीं उज्जयिनी. तेथील लोक चांगले, तेथील व्यापार चांगला, तेथील घडामोडी चांगल्या, अशी लोकांची समजूत असे. राजा चांगला असला म्हणजे तो उज्जयिनीचा असायचा, सार्थवाह व्यापाराला जायचा तर तो उज्जयिनीसच जायचा, राजपुत्र देशांतरीं गेला तर तो शेवटीं उज्जयिनींत उतरावयाचा, प्रवासी दिङ्मोहानें वाट चुकला तरी धुंडाळत धुंडाळत तो उज्जयिनीच गांठायचा, विषयी किंवा षोकीन मनुष्याची वेश्येशीं गांठ उज्जयिनींतच पडायची, तो सुखावला जायचा तिथेंच व लुबाडला जायचा तिथेंच. इतकें आकर्षण ह्या उज्जयिनीसंबंधीं कथालेखकाच्या मनांत होतें. तीच गोष्ट किंवा त्याहिपेक्षां अधिक गोष्ट विक्रमराजाची. चांगलें निर्व्याज प्रेम करावें विक्रमानेंच, चांगला त्याग करावा विक्रमानेंच, चांगला उपकार करावा विक्रमानेंच, चांगलें दान करावें विक्रमानेंच, चांगलें संकटहि पण पडावें विक्रमावरच व सोसावेंहि पण त्यानेंच. अंगसौष्ठव, तारुण्य, सौजन्य,

औदार्य, शौर्य, निर्भयत्व, स्वार्थत्याग, परहितसाधन, निर्ममत्व, निरहंकार अशा एक ना दोन, सर्व भौतिक, दैविक व आत्मिक गुणांचें निधान म्हणजे राजा विक्रमादित्य असें समीकरण ठरून गेलें होतें. आदर्शवत्तेचें हें त्याच्या भोंवतालचें वलय सर्व कथालेखकांच्या प्रतिभेला आकर्षित करीत असे इतकेंच नव्हे तर स्फूर्ति देत असे. ह्या आदर्शवत्तेंत एक प्रकारचें अद्भुतरम्यत्व होतें. राजा विक्रमादित्याच्या सर्व कथांत अद्भुतत्व आहे व रम्यत्वहि आहे. त्याच्यासंबंधीं आदर, प्रेम, आपुलकी ह्या भावना नितांत स्वरूपाच्या आहेत. विक्रमकथांतील घटनांचा उलगडा नेहमींच्या व्यावहारिक कार्यकारणभावाच्या सिद्धांताप्रमाणें होत नाहीं. त्यांचा उलगडा अद्भुतत्वाच्या जोरावरच करावा लागतो.

असें हें आदर्शत्व व अद्भुतरम्यत्व विक्रमराजाच्या चरित्रांत किंवा चरित्रासंबंधीं निर्माण झालेल्या कथावाङ्मयांत आलें कसें? तें येण्यास कारणें काय झालीं? प्रत्यक्ष विक्रमराजाच्या वाङ्मयांत तर ह्या गोष्टी आढळून येतातच, व तशा त्या आढळून आल्यास नवल नाहीं; परंतु इतर ज्या कथांत विक्रमाचा अर्थाअर्थी संबंध नाहीं व ज्या कथा मूळच्या दुसऱ्या कोणा तरी राजासंबंधीं होत्या त्या कथांतील मूळचा जो कोणी राजा नायक असेल त्याला काढून त्याच्या जागीं विक्रमाचा निर्देश नायक म्हणून करण्याची प्रवृत्ति तरी कथालेखकांत कां व्हावी?

लोककथावाङ्मय किंवा दंतकथावाङ्मय हें समाजांत नेहमीं वावरत असतें. तें फार प्राचीन काळापासून एका पिढीपासून दुसऱ्या पिढीस लिखित वा अलिखित स्वरूपांत प्राप्त होत असतें. वातावरणांत जसे त्याचे नानाविध घटक अदृश्य रूपानें हवेवर तरंगत असतात तसें हें त्या त्या देशाचें वाङ्मय किंवा जानपदवाङ्मय त्या त्या देशाच्या वातावरणांत वावरत असतें. हें जानपदवाङ्मय म्हणजे त्या राष्ट्राची—त्या जानपदांची संस्कृतीच होय. त्यांत त्या त्या जानपदाचे आचारविचार, चालीरीती, धर्मनीति, श्रद्धा-समज, जीवन व त्याचें तत्त्वज्ञान, इतिहास व परंपरा ह्या सर्वांचा फार दिवसांचा संचय निविष्ट केला जातो. जानपदवाङ्मय हें त्या त्या जानपदाचा पारंपरिक व सांस्कृतिक इतिहासच होय. पुष्कळ वेळां हा पारंपरिक व सांस्कृतिक इतिहास तोंडीं असतो व तोंडीं स्वरूपांतच संक्रांत केला जातो. ह्याला जर एखादा व्यास भेटला कीं तो ह्या तोंडी स्वरूपांत वावरणाऱ्या वाङ्मयाला कह्यांत आणून त्याला लेखी स्वरूप देतो. हें लेखी रूप देतांना अर्थात् त्याला पुष्कळ गोष्टी कराव्या लागतात. मूळ जानपदकथा व दंतकथा ह्या पक्ष्यांप्रमाणें इतस्ततः भटकत फिरत असतात.

यांना परस्पर जोडणारा दुवा नसतो. एका कथेचा दुसऱ्या कथेशीं संबंध नसतो. ह्या सर्व इतस्ततः भटकणाऱ्या कथा गोळा करून त्यांना एकसूत्रत्व व एकपिंडत्व प्राप्त करून देण्याचें कठिण काम त्या व्यासाला करावें लागतें. एखादा चांगला व्यासच मूळ जानपदवाङ्मयाला अभिजात वाङ्मयाचें स्वरूप देऊं शकतो. जानपद-वाङ्मयाचा पूर्वींचा इतिहास पाहिला तर हीच गोष्ट प्रत्ययास येते. वेदांतील सुदास, तृत्सु, वसिष्ठ, विश्वामित्र ह्यांच्या कथा, ब्राह्मणग्रंथांतील सरमा, शुनःशेप ह्यांच्या, अश्वमेधांच्या व इतर असंख्य यज्ञीय कथा, उपनिषदांतील जनक, अश्वपति, उपकोसल, श्वेतकेतु, गार्गी, मैत्रेयी, वाचक्नवी ह्यांच्या कथा एके काळीं ऐतिहासिक म्हणून मानिल्या जात असत. परंतु कालपरत्वें त्यांना दंतकथांचें जानपदस्वरूप प्राप्त झालें व त्या नव्या स्वरूपांत त्या कथा अठरा पुराणांत निविष्ट केल्या गेल्या. हें झालें वैदिकवाङ्मयासंबंधीं. पुढें महाकाव्याच्या काळांतहि हीच गोष्ट घडून आली. मूळ कौरवकथा ही ऐतिहासिक. कौरवपांडव, माद्र, यादव हे सर्व खरेखुरे ऐतिहासिक पुरुष. त्यांच्या कथाहि मूळ खरा इतिहास व तसाच तो व्यासानें एकत्रित केला व गायिला. परंतु कौरवपांडवांच्याचसारखे उदात्त चरिताचे जे प्राचीन राजे होऊन गेले व ज्यांच्या कथा इतस्ततः लोकांच्या तोंडीं जानपदवाङ्मयाच्या स्वरूपांत भटकत होत्या व ज्यांना एकत्रित करण्यास कोणी व्यास भेटला नव्हता त्या सर्व कथा द्वैपायन व्यासानें एकत्रित केल्या व मूळ कौरवपांडवांच्या कथांमध्यें अडकवून टाकिल्या व अशा रीतीनें त्यानें आपला ‘जय’ ग्रंथ पुरा केला.

इतकें करूनहि कांहीं कथा राहिल्या. हा कथासंभार विस्तृत व अपार असल्या-मुळें एकट्या द्वैपायन व्यासाच्याहि आटोक्यांत येईना. अशा शिल्लक राहिलेल्या कथा जनमेजयानें एकत्रित करून त्या जय ग्रंथास जोडून आपला ‘भारत’ ग्रंथ पुरा केला. ह्या दोन संस्करणांनींहि कथासंभार आवरेना म्हणून सौतीला तिसऱ्यांदां संस्करण करावें लागलें. ह्या तीन संस्करणांनंतर ‘महाभारत’ ग्रंथ तयार झाला. जी गोष्ट महाभारताची तीच गोष्ट रामायणाची किंवा ईलियडची किंवा ईनिडची. एखाद्या राष्ट्राच्या किंवा जानपदाच्या सांस्कृतिक काव्याला जें महाकाव्यत्व व तत्परत्वें जें वंदनीयत्व प्राप्त होतें तें अशा प्रकारानेंच होय. सावित्री-सत्यवान, नल-दमयन्ती, दुष्यन्त-शकुन्तला, पुरूरवस्-उर्वशी ह्यांच्या गोष्टी फार प्राचीन काळापासून लोकांच्या सांगण्यांत व ऐकण्यांत होत्या; त्या पुढें मुख्य कथानकाशीं कशा तरी गुंतवून महाकाव्यांत अंतर्भूत केल्या गेल्या. ह्या कथांखेरीज आणखीहि कांहीं कथा—त्या त्या

प्रांतांत होऊन गेलेल्या स्थानिक वीरांच्या–प्रचलित असत. ह्या कथांचें स्वरूप सार्वजनिक नसून स्थानिक असे. ह्या स्थानिक जानपदकथांचाहि अंतर्भाव महाकाव्यांत केला जात असे. महाभारतांत जे पाठभेद किंवा कथाभेद सांपडतात त्याचें कारण हें होय. ही झाली एका प्रकारच्या जानपदवाङ्मयाची गोष्ट. हें जानपदवाङ्मय समाजांतील एका विशिष्ट थरावरील लोकांमध्यें प्रचलित होतें, व त्याचा उद्देशहि कांहीं विशिष्ट होता. समाजांतील सुसंस्कृत लोकांत ह्या कथा प्रचलित होत्या. प्राचीन कालांत होऊन गेलेल्या मोठमोठ्या व्यक्तींच्या कर्तबगारीचें गुणगान करून त्यांची स्मृति कायम ठेवणें हा त्यांचा उद्देश होता. हें जानपद-वाङ्मयच, परंतु त्यांतल्या त्यांत उच्च जानपदवाङ्मय, म्हणून ह्याचा निर्देश करणें हें अधिक योग्य होईल.

ह्या उच्च जानपदवाङ्मयाच्या बरोबरीनें मध्य व नीच (खालच्या थरांवरील) जानपदवाङ्मय लोकांमध्यें प्रचलित असतें. मध्यम जानपदवाङ्मय मध्यम थरांवरील लोकांत व नीच जानपदवाङ्मय नीच म्हणजे खालच्या थरांवरील लोकांत प्रचलित असतें. मध्य व नीच थरांवरील लोकांची भाषा, त्यांचे विचार, त्यांच्या भावना, त्यांच्या आशाआकांक्षा, त्यांच्या भोळ्या समजुती, त्यांच्या चालीरीती वगैरे गोष्टी त्या त्या (मध्य व नीच) जानपदवाङ्मयांत प्रतिबिंबित झालेल्या असतात. मध्यम जानपदवाङ्मयांत, उदाहरणार्थ, नीतितत्त्वाकडे विशेष रोख जो असतो त्याचें कारण. म्हटलें म्हणजे मध्यम थरांवरील लोकांत नीतितत्त्वाचा अधिक पुरस्कार असतो खालच्या थरांवरील लोकांत नीतितत्त्वाचा तितकासा बोज राखला जात नाहीं. त्यांचें जीवन अधिक शारीरिक कष्टाचें असल्यामुळें त्यांची नीतितत्त्वाची जाणीव तितकीशी सूक्ष्म राहूं शकत नाहीं. त्यांच्यांत नीतिमत्ता नसते असा ह्याचा अर्थ नाहीं. नीतिमत्ता असते, परंतु तिच्यांत एक प्रकारचा राकटपणा असतो—एक प्रकारचा कर्कशपणा असतो. ह्यांच्यांत प्रेम असतें, शृंगार असतो, पराक्रम असतो, शौर्य असतें. प्रेम व शौर्य ह्यासंबंधीं निष्ठा असते, प्रतिष्ठा असते. परंतु इतक्या सर्व गोष्टी असल्या तरी त्यांत राकटपणा असतो, त्यांत ओबडधोबडपणा असतो, त्यांत सैलपणा असतो. ह्या सर्वांचें प्रतिबिंब त्यांच्या जानपदवाङ्मयांत पडलेलें असतें.

अशा तऱ्हेनें जानपदवाङ्मयांत समाजांतील उच्च, मध्यम व नीच ह्या तीन थरांप्रमाणें तीन प्रकार पडतात. एक उच्च जानपदवाङ्मय; दुसरें, मध्यम जानपद-वाङ्मय; व तिसरें, नीच जानपदवाङ्मय. ह्या तीन प्रकारांपैकीं उच्च जानपद-

वाङ्मयप्रकाराचा उल्लेख आम्हीं वर केलाच आहे. बाकीचे दोन प्रकार राहिले. दुसरा म्हणजे मध्यम जानपदवाङ्मयप्रकारांत पंचतंत्र, हितोपदेश इत्यादि ग्रंथांत निविष्ट झालेलें जानपदवाङ्मय येईल. कथा पाहिल्या तर प्राण्यांच्या परंतु त्यांचा रोख मानवी जीवनांतील नीतिमत्तेसंबंधीं असलेला दिसतो. ते सर्व प्राणी खरे. तीं सर्व कुत्रीं-मांजरेंच. तीं सर्व कबूतरें-माकडेंच. ते सर्व खेकडे-बगळेच. परंतु त्यांची भाषा माणसांची, त्यांचें वर्तन माणसांचें. त्यांचीं संकटें माणसांचीं व त्या संकटहरणाचे उपायहि माणसांचे, तीं सर्व जनावरें असलीं तरी माणसांप्रमाणें बोलतात व व्यवहरतात. तेव्हां ह्या सर्वांचा रोख मानवी जीवनासंबंधीं असल्यास नवल नाहीं. इतकेंच नव्हे तर तसा तो असलाच पाहिजे. ह्या जानपदवाङ्मयाचा प्रसार मध्यम लोकांमध्येंच झाला. ह्या ग्रंथांचीं भाषांतरें निरनिराळ्या भाषांत झालीं व त्यांचा उपयोग मध्यमवर्गीय मानवी जीवन सुधारण्याकडे झाला. त्यानें रंजन केलें तें मध्यमवर्गीय लोकांचें व त्यानें उपदेशाचे धडे दिले तेहि मध्यमवर्गीय लोकांनाच.

तिसरा प्रकार नीच जानपदवाङ्मयाचा. हा वाङ्मयाचा प्रकार समाजांतील खालच्या थरांवरील लोकांत प्रचलित असतो. हें जानपदवाङ्मय खरेंच वाङ्मय असतें—म्हणजे तें तोंडी वाङ्मय असतें—लेखी नसतें. तें दंतकथास्वरूपांत असतें. ह्या वाङ्मयाच्या रचनेंतहि दोन उद्देश असतात. एक उद्देश लोकरंजनाचा व दुसरा लोकोपदेशाचा. खालच्या थरांवरील लोकांच्या एकंदर राहणीमध्यें जो ओबडधोबडपणा असतो तो ह्या त्यांच्या जानपदवाङ्मयांतहि उतरलेला असतो. ह्या कथांची मांडणी, विवेचन, त्यांतील तत्त्वज्ञान इत्यादि सर्व गोष्टी त्या मानानें राकट असतात. ह्यांतील पात्रेंहि मानवाहून निराळीं असतात. ह्यांतील अद्‌भुतपणा व चमत्कार हेहि ओबड-धोबड असतात. पहिल्या उच्च जानपदवाङ्मयांतील पात्रें देव किंवा देवसमयोनि, गंधर्व, किन्नर, विद्याधर, अप्सरा ह्या अर्धदेवयोनि, तर ह्या तिसऱ्या जानपदवाङ्मय-प्रकरणांतील पात्रें भूतयोनींतील, तालवेताल वगैरे असतात. पहिल्या प्रकारांत ब्रह्म, मोक्ष, स्वर्ग, इत्यादींची प्राप्ति, आत्मिक उन्नति ह्यासारखें सात्त्विक तत्त्वज्ञान, दुसऱ्या प्रकारांत राज्यप्राप्ति, ऐहिक सौख्य ह्यासारखें राजस तत्त्वज्ञान तर ह्या तिसऱ्या प्रकारांत जारणमारण, अभिचारण, वशीकरण, इत्यादींसारखें तामस तत्त्वज्ञान असतें. इतका ह्या तीन जानपदवाङ्मयप्रकारांत भेद असल्याचें आढळून येतें. वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी, शुकबहात्तरी वगैरे कथा ह्या तिसऱ्या प्रकारांतील होत. ह्यांतील

अद्‌भुतपणाहि त्या थरांवरील लोकांच्या बुद्धीला पेलेल असाच असतो. सिंहासनाला आधारभूत झालेल्या खांबांवरील पुतळ्यांना बोलतां येऊन त्यांनीं एकेक कथा सांगणें, कळसूत्री घोड्याला वाटेल तेव्हां व वाटेल तेथें जातां येणें, ऐन मोक्याच्या वेळीं एखादें पात्र नाहींसें होणें किंवा पुनः प्रकट होणें, पिंपळावरील ब्रह्मसमंध बोलणें, सरोवरांतील यक्षानें कूटप्रश्न विचारणें, एखादा मानवी प्राणी एकदम मरून पडणें किंवा मेलेला जिवंत होऊन उठणें, स्वतःचीं मुलें चराचरा चिरणें व पुनः तीं जिवंत होऊन दुडुदुडू धावत येणें, इत्यादि चमत्कारांनीं हें सर्व तिसऱ्या प्रकारचें जानपदवाङ्मय परिपूर्ण असतें. ह्या वाङ्मयांतील पात्रांची राहणी अधोमानव, ह्यांचा धर्म म्हणजे वृक्षपूजा-वनस्पतिपूजा, ह्यांचे बली म्हणजे नरबली, ह्यांचें तत्त्वज्ञान म्हणजे जारणमारण अशा स्वरूपाचें असल्यामुळें इतर लोक प्रकारांपेक्षा निराळा असा हा वाङ्मयप्रकार आम्हीं केला आहे.

ह्या तीन वाङ्मयप्रकारांशिवाय आणखी कांहीं जानपदवाङ्मय शिल्लक रहातें. ह्याचा आम्ही संकीर्ण म्हणून एक चौथा प्रकार करतों. ह्यांतील जानपदवाङ्मय समाजांतील सर्व थरांवरील लोकांत प्रचलित असतें. ह्यांतील पात्रें सामान्य मानवजातींतील, त्यांची राहणी सामान्य सर्वांसारखी, त्यांची विचारसरणीहि सर्वसाधारण, त्यांच्या भावना ह्याहि मानवी व्यवहारांतील चिरंतन, स्थायी स्वरूपाच्या, अशी त्यांची रचना असते. झोंपाळ्यावरच्या ओंव्या, दळणाकांडणाचीं गाणीं, माहेरवासिनी-सासरवासिनींच्या ओंव्या, आईमाईच्या ओंव्या, भावाबहिणींच्या ओंव्या, शेतकऱ्यांचीं गाणीं, मोटेवरील गाणीं, गाडीवानांचीं बैलावरील गाणीं, श्रावणीसोमवार-शुक्रवारच्या कथा, मंगळागौरीच्या कथा, भोंडल्याचीं गाणीं, हरतालिकेची कथा इत्यादि वाङ्मय ह्या चौथ्या प्रकारांत येईल. ह्यांत वर्णन केलेला विषय सर्व थरांवरील लोकांत आढळणारा असाच असतो. ह्यांतील पात्रें सामान्य सर्व माणसांसारखींच असतात. त्यांच्या भावना चिरंतन स्वरूपाच्या असतात. ह्यामुळें ह्या जानपदवाङ्मयाची हाक सर्व थरांवरील लोकांना जाऊन पोहोंचते व त्याचा प्रसार सर्व लोकांत होतो.

जानपदवाङ्मयाचे हे चार प्रकार झाले. हे त्याच्या आंतर स्वरूपावरून केले आहेत. ह्या सर्व जानपदवाङ्मयाच्या प्रकारांचा संबंध कोणा तरी जुन्या, फार प्राचीन कालीं होऊन गेलेल्या राजाशीं जोडण्यांत येई. तो राजा सार्वभौम असला पाहिजे, तो छत्रधारी असला पाहिजे, त्याच्या शौर्याची दिगंत कीर्ति असावयास पाहिजे,

तो मंडलेश्वर असला पाहिजे, तो सर्वगुणमंडित असला पाहिजे. त्याच्या कथांतील ऐतिहासिकत्व जाऊन त्याच्या जागीं दंतकथात्व आलें असलें पाहिजे. त्याची परंपरा चांगली पाहिजे. असा सर्वगुणमंडित राजा जर प्रत्यक्ष प्राचीन काळच्या इतिहासांत नच आढळला तर एखादे वेळेस कल्पनेनेंसुद्धां अशी एखादी विभूति उत्पन्न करीत व त्याला हें सर्व जानपदवाङ्मय चिकटवीत. असा हा राजा प्रत्येक थरावरील जानपदवाङ्मयांत निराळा असे किंवा कधीं एकच असे. निराळा जर असला तर मात्र त्या त्या थरावरील लोकांच्या समजुतीप्रमाणें कोठें देव अगर देवयोनि, तर कोठें मानव, तर कोठें भूतवेतालादि भूतयोनि, तर कोठें रानटी वन्य जातींतील असा असे. निराळा नसून एकच असला तर तो सार्वभौम, मंडलेश्वर, छत्रपति, शककर्ता असा असे. त्यानें दुष्टांचें निर्दालन व सुष्टांचें प्रतिपालन केलेलें पाहिजे. त्यानें पापाचें निर्मूलन व पुण्याचें आचरण केलें असलें पाहिजे. एकंदरींत काय तर त्याच्याजवळ सर्व गुणांचा, सर्व सत्प्रवृत्तींचा, सर्व सत्कृतींचा समुच्चय झालेला आढळला पाहिजे. अशीच उदात्ततेची व उदारतेची विभूति ह्या जानपदवाङ्मयाची केंद्रवर्ती व्यक्ति केली जात असे. तोच ह्या जानपदवाङ्मयाचा नायक म्हणून मानला जात असे. त्याच्याच भोंवतीं हें सर्व वाङ्मय गुरफटून ठेवलें जात असे.

विक्रमकथावाङ्मयांत हीच गोष्ट झालेली दिसते. वर जे जानपदवाङ्मयाचे चार प्रकार सांगितले ते सर्व विक्रमकथावाङ्मयांत एकत्रित झालेले दिसतात. सर्व थरांवरील जानपदवाङ्मय विक्रम राजाला चिकटविलें गेलेलें दिसतें. विक्रमकथा-वाङ्मयांत जें सात्त्विक, राजस, तामस व क्वचित् राक्षसप्रवृत्तींचें मिश्रण आढळतें त्याचें कारण हेंच आहे. त्या वाङ्मयांत देवयोनि, मानवयोनि व भूतयोनि ह्या तिहींचा जो संबंध येतो तो ह्यामुळेंच होय. त्यांत देवांचें उदात्तत्व जसें आहे तसें मानवांचें औदार्यहि आहे व त्याबरोबर अधोमानवांचें जारणमारणहि आहे. अशा ज्या सत्प्रवृत्ति-सत्कृतींबरोबर असत्प्रवृत्ति व असत्कृति मिसळलेल्या आढळतात त्याचें कारणहि सर्व थरांवरील जानपदवाङ्मय विक्रमकथावाङ्मयांत मिसळलें गेलें हेंच होय. त्यांत दैवी सद्गुणांचा समुच्चय, मानवी जीवनास त्याचा उपयोग व भुताखेतांचा-तालवेतालांचा वावर अशा ज्या तिन्ही अगदीं विरुद्ध प्रवृत्तींच्या गोष्टी आढळतात त्याचें कारणहि तेंच वर सांगितलेलें वाङ्मयमिश्रण होय.

विक्रमराजाच्या पूर्वींच्या काळांत जानपदवाङ्मयाच्या एकत्रीकरणाचा प्रयत्न महाभारत व रामायण ह्या महाकाव्यांत झालेला दिसतो. रामायणापेक्षां महाभारतांत

तो विशेष सापेक्षतेनें केलेला दिसतो. रामायणांत अगदीं नाहीं असें मात्र नाहीं. कबंध, जटायु, अहल्या ह्या कथा मागाहून चिकटविलेल्या दिसतात. ह्याचें चांगलें प्रत्यंतर म्हणजे रामाची कथा इजिस किंवा जावा-सुमात्रा किंवा बली ह्या ठिकाणीं गेल्यानंतर तिच्यांत त्या त्या ठिकाणच्या जानपदवाङ्मयाचें मिश्रण होऊन जें विकृत स्वरूप प्राप्त झालें तें होय. इतर वाङ्मयांतील रामाचें चरित्र व हिंदुस्थानांतील वाल्मीकीच्या रामायणांतील रामाचें चरित्र ह्या दोहोंत जो फरक पडलेला दिसतो त्याचें कारण हें होय. परंतु रामायणापेक्षां महाभारतांत तत्तत्कालीन व तत्तत्स्थानीय जानपदवाङ्मयाचा संपर्क व संबंध अधिक आलेला आहे. महाभारतांतर्गत जय ह्या मूळ ग्रंथाचा भारत ह्या ग्रंथांत वैशंपायनानें व भारत ह्या ग्रंथाचा महाभारत ह्या ग्रंथांत सौतीनें जो विस्तार केला त्याचें कारण हें जानपदवाङ्मयाचें मिश्रण होय. कौरवपांडवकथेला किंवा मूळ पांचालाच्या कथेला निरनिराळ्या काळांतील व निरनिराळ्या थरांवरील जानपदवाङ्मय जोडलें गेलें. हें जोडतांना मूळ कौरवपांडव-कथेशीं तें जानपदवाङ्मय कितपत सुसंगत अथवा विसंगत आहे ह्याकडेसुद्धां पाहिलें नाहीं. अशा किती तरी कथा महाभारतांत पदोपदीं आढळतात कीं त्यांचा मूळ कथेशीं व मूळ कथेंतील पात्रांशीं मेळ दाखविणें अशक्य होतें. कांहीं तरी क्षुद्र निमित्त काढून त्या कथा जोडल्या आहेत. त्यांतील कथा निराळी, पात्रें निराळीं, काळ निराळा, संस्कृति निराळी. अशा अगदीं भिन्न स्वरूपाच्या कथा मूळ कथेला जोडल्या आहेत. मारुतीच्या शेपटांची लांबी जशी चिंध्या बांधबांधून वाढविली तशी कांहींशी गत महाभारतांत झाली आहे. नलदमयन्ती, सावित्री-सत्यवान, हरिश्चंद्र-तारामती, बकासुर, मायासुर, सनत्सुजात, अनुगीता, यक्षप्रश्न, वगैरे किती तरी प्रकरणें मूळ कथानकाशीं विसंगत दिसतात. तीं सर्व मागाहून चिकट-विलेलीं दिसतात. हरिवंश हें सर्वच्या सर्व प्रकरण तर खिलपर्व म्हणूनच समजतात. मूळ कथेंतील कोणा तरी आदर्श पात्राच्या अनुषंगानें कोणत्या तरी आदर्श प्रसंगाच्या अनुरोधानें ह्या कथा जोडल्या गेल्या. भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, युधिष्ठिर, कर्ण, अर्जुन, द्रौपदी, भीम हीं आदर्श पात्रें ह्या दृष्टीनें अत्यंत उपयोगीं पडणारीं होतीं. युधिष्ठिर तर प्रत्यक्ष धर्मराजच, तो सर्व कथेचा नायक, आणि पुनः यशस्वी नायक, तो शककर्ता भूपति, तो अश्वमेधयाजी, त्याच्यामध्यें सम्राटाचे सर्व सात्त्विक गुण एकत्रित झालेले. तेव्हां अशा ऐतिहासिक विभूतीच्या चरित्राला निरनिराळ्या काळांतील व निरनिराळ्या थरांतील जानपदवाङ्मय चिकटविलें गेलें असल्यास नवल

नाहीं. ह्याच्याहिपेक्षां लोभनीय व उदात्त चारित्र्य श्रीकृष्ण यादवाचें. युधिष्ठिराच्या पांडवकथेंत ज्याप्रमाणें जानपदवाङ्मय विरून जाऊन मूळ पांडवकथेला महाभारताचें स्वरूप प्राप्त झालें त्याचप्रमाणें श्रीकृष्णकथेची गोष्ट झाली. मूळ कृष्णाच्या कथेला निरनिराळें जानपदवाङ्मय येऊन मिळालें तें निरनिराळ्या काळांत मिळालें. श्रीकृष्णाच्या चरित्रांत निरनिराळे कथाप्रवाह येऊन मिळाले आहेत. त्याच्या चरित्रांत जी पात्रांची, प्रसंगांची, वर्तनांची, स्वभावांची, घटनांची विसंगति आढळून येते व जिचा परिहार कांहीतरी गूढ, अनाकलनीय अशा (वेदान्ती तत्त्वज्ञानाच्या) मार्गानें करावा लागतो त्याचें कारण आमच्या दृष्टीनें हें जानपद-वाङ्मयाचें मूळ कृष्णकथेशीं झालेलें मिश्रण होय. कृष्णाला सोळा सहस्र नारी होत्या, कृष्ण हा बालवयांत म्हणजे कामी अवस्थेच्या पूर्वावस्थेंत असूनदेखील गोपींशीं कामकेली करीत असे, तो ऊर्ध्वरेतस् होता, तो अत्यंत कामुक व अत्यंत तत्त्वज्ञानी, गोपींचा वल्लभ व गीतेचा प्रवर्तक असा होता, हीं सर्व कोडीं जीं कृष्णकथेंत पदोपदीं आढळून येतात त्या सर्वांचें कारण आमच्या मतें हें आहे. भारत-महाभारताच्या संस्करणानंतर अठरा किंवा इतर सर्व पुराणांचीं जीं संस्करणें झालीं त्या वेळीं तर ह्या प्रवृत्तीचा अतिरेक झाला. जसजसें हें निरनिराळ्या काळांतील व थरांतील जानपदवाङ्मय मूळ कृष्णकथेला मिळत गेलें तसतसें तिला विविध रूप प्राप्त होऊं लागलें. मूळ कथानायकहि तसतसा विविधस्वरूपी बनूं लागला. कृष्णकथेचा मूळ प्रवाह शुद्ध व एकस्वरूपी असा असून त्यांत निरनिराळ्या ठिकाणांहून जानपदकथा-सरिता जशा मिळत गेल्या तसें त्या मूळ कृष्णसरितेला संमिश्र, गूढ, अनाकलनीय असें स्वरूप प्राप्त झालें.

ही झाली संस्कृत भाषेंतील जानपदवाङ्मयाची गोष्ट. युधिष्ठिर झाला काय किंवा कृष्ण झाला काय, त्यांचें वाङ्मय संस्कृत भाषेंत होतें. जें जानपदवाङ्मय त्यांत येऊन मिसळलें तें इतर भाषांत असलें तरी त्याला संस्कृत भाषेचाच आश्रय करावा लागला. ह्या संस्कृताश्रयी वाङ्मयाखेरीज इतर जानपदवाङ्मय पुष्कळ होतें. त्याचा आश्रय संस्कृत भाषा नसून इतर प्राकृत किंवा जानपद भाषा होत्या. त्या भाषांत तें अवगुंठिलेलें होतें. वैदिक यज्ञीय धर्मासंबंधीं ज्या वेळीं मतभेद उत्पन्न झाले व त्यामुळें ज्या वेळीं अवैदिक दर्शनें किंवा पंथ सुरू झाले त्या वेळीं प्राकृत भाषेंतील जानपदवाङ्मय संस्कृत भाषेंत विरून टाकण्याचें बंद झालें. ह्या प्राकृत जानपदकथा वैदिक धर्माभिमानी राजांना चिकटविण्याचें बंद

झालें. ह्या प्राकृत जानपदवाङ्मयानें आपल्या प्राकृत भाषाच कायम ठेविल्या. प्राकृत राजांनाच तें चिकटून राहूं लागलें. ह्या प्रवृत्तींचें उत्तम उदाहरण म्हटलें म्हणजे पाली भाषेंतील जातकांत आलेलें कथावाङ्मय हें होय. वैदिक सनातनी पंथाचा पुरस्कार करणारें कथावाङ्मय व अवैदिक पंथाचा पुरस्कार करणारें कथावाङ्मय ह्या दोहोंत विरोध असे. त्यांच्या कथा निराळ्या, त्यांतील पात्रें निराळीं, त्यांची भाषा निराळी, त्यांतील विषय निराळे, त्यांतील वाङ्मयीन वृत्तिप्रवृत्ति निराळ्या, असा इतका विरोध त्या दोहोंत असे. क्वचित् पात्रें जरी एकच असलीं तरी त्यांचा कथाभाग निराळा असे. राम ही व्यक्ति वैदिक जानपदवाङ्मयांत एक प्रकारें चित्रित केली असली तर बौद्धवाङ्मयांत ती अगदीं भिन्न प्रकारें चित्रित केलेली आढळते. पाली भाषेंतील ह्या जातककथावाङ्मयाप्रमाणेंच जैन वगैरे इतर अवैदिक पंथांचें अर्धमागधी, अपभ्रंश वगैरे प्राकृत भाषांत लिहिलेलें कथावाङ्मय आहे. त्यांतील प्रवृत्ति ह्या अशाच प्रकारच्या आहेत. बृहत्कथा, भविसायत्तकहा, पउमचरिअ, गाथासत्तसई, गऊडवहो, वगैरे कथावाङ्मय वरील प्रकारांत येण्यासारखें आहे. 'गाथासत्तसई' हा ग्रंथ प्राकृत जानपदवाङ्मयाचा उत्तम नमुना आहे. सातशें प्राकृत गीतिकांचा हा संग्रह आहे. ह्यांचें कर्तृत्व अनेक कवींकडे जातें. कांहीं तरी सात-आठ कवि-कवयित्रींचा त्यांत उल्लेख आहे. एकंदरींत कर्तृत्व सातवाहन हाल ह्या राजाचें आहे अशी पारंपरिक समजूत आहे. आंतील स्वरूप खरेंखुरें जानपदी आहे. नायकनायिकांचा प्रच्छन्न व उत्तान शृंगार, त्यांचा नर्म विनोद, प्रोषित भर्तृकांचा विरह, प्रवासी वणिग्जनांची रंगेल वृत्ति, वेश्यांचें चातुर्य, नायिका–सख्यांचें साचिव्य, श्वश्रूश्वशुरांचा भोळेपणा, व ह्या सर्वांवर दाखविलेला अनंगदेवतेचा जय, इत्यादि गोष्टींमुळें त्या ग्रंथाला एक प्रकारचें रम्यत्व व अभिनवत्व प्राप्त झालें आहे. त्यांत नायक कोणीहि एक राजा आहे असें न दाखवितां खालच्या थरावरील कोणीहि रंगेल मनुष्य असल्याचें दाखविल्यामुळें सर्वसामान्य वाचकाला त्या ग्रंथांत आपुलकी वाटली असल्यास नवल नाहीं.

जानपदवाङ्मय एकत्रित करून त्याला अभिजात वाङ्मयाचें स्वरूप देण्याची प्रवृत्ति आपण संस्कृत व प्राकृत वाङ्मयाबाबत पाहिली. तीच प्रवृत्ति पुढें प्राकृतिक किंवा प्राकृतोद्भव वर्तमानकालीन बोलींच्या बाबत चालू राहिली आहे. हिंदी, गुजराती, बंगाली, उरिया, मराठी ह्या भाषांतील वाङ्मयांत ही प्रवृत्ति आढळून येते. मराठी वाङ्मयाबाबत बोलावयाचें झालें तर महानुभावपंथांतील लीळाचरित्र,

दत्तात्रेयपंथांतील गुरुचरित्र व रामदासीपंथांतील दासविश्रामधाम हे तीन व इतर शनिमाहात्म्य वगैरे ग्रंथ उदाहरणें म्हणून दाखवितां येण्यासारखे आहेत. पंचतंत्र, हितोपदेश, इसापनीति, बिरबलकथा, विक्रमाचें कथावाङ्मय हें भाषांतरित कथावाङ्मय म्हणून सोडून दिलें तरी वरील ग्रंथ अस्सल मराठी जानपदवाङ्मय असून त्याला त्या त्या ग्रंथांत अभिजात वाङ्मयाचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. त्या वाङ्मयाचा दर्जाच वाढविला आहे. त्याचें मूळचें कमी असलेलें वाङ्मयीन मूल्य नाहींसें करून त्यांत अधिक अधिक धार्मिकता, अधिक पावित्र्य व अधिक अभिजातता आणिली आहे. चक्रधर, अवधूत दत्तात्रेय व रामदास स्वामी ह्यांच्या विभूतिमत्त्वाशीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबद्ध अशा कथा त्या त्या ग्रंथांत अनुक्रमें माहींभट, गंगाधर सरस्वती व गिरिधरस्वामी ह्यांनीं जोडल्या. त्या सर्वांचा उपयोग त्या त्या अवतारी व्यक्तीचें विभूतिमत्त्व वाढविण्यांत केला. कांहीं अद्भुत चमत्कारपूर्ण अशा घटना त्यांच्या दैवी सामर्थ्यामुळें झाल्या तर इतर कांहीं त्यांच्या जीवनास चिकटविल्या गेल्या. गुरुभक्तींत नेहमीं हें असें असावयाचेंच. कांहीं थोडासा असामान्यतेचा, अद्भुततेचा व अतिशयोक्तीचा भाग असावयाचाच. हा प्रकार सध्यांसुद्धां गुरुभक्तींत आढळून येतो. साईमहाराज, नारायणमहाराज, ह्यांच्या चरित्रांत अशाच कित्येक गोष्टी चिकटवून देण्याची प्रवृत्ति त्यांच्या शिष्यवरांत दिसून येते. हीच प्रवृत्ति फार झाली कीं तिला बुवाबाजीचें स्वरूप प्राप्त होतें.

वर प्राकृत भाषांतील जानपदवाङ्मयाचा उल्लेख केला. प्राकृत भाषा ह्या लोकांच्या—बहुजनसमाजाच्या—म्हणून त्या खऱ्या जानपदभाषा होत. प्राकृत ह्या शब्दाचा अर्थच मुळीं प्रजासंबंधी, जानपदसंबंधी असा आहे. तेव्हां ह्या जानपदांच्या भाषांत जानपदवाङ्मय अमूप असल्यास नवल नाहीं. त्या भाषांतील मुख्य वाङ्मयांत विक्रमकथावाङ्मयाचा समावेश होतो. आणि तो तसा होणेंहि साहजिक आहे. प्राकृत भाषांच्या अगदीं उत्कर्षाच्या कालांत राजा विक्रमादित्य होऊन गेला. त्याच कालांत मालवगणानें पराक्रम केले. त्याच कालांत अवंतीची भरभराट झाली. त्याच कालांत उज्जयिनी प्रसिद्धीस आली. हा काल म्हणजे प्राकृत भाषांच्या उत्कर्षाचा मध्यबिंदु म्हणून गणावयास हरकत नाहीं. भाषांच्या उत्कर्षाबरोबर वाङ्मयाचाहि उत्कर्ष झाला. ह्या उत्कर्षाचें चांगलें गमक म्हणजे विक्रमकथावाङ्मय हें होय. हें इतकें विस्तृत होतें कीं त्याला बृहत्कथावाङ्मय हें नांव सार्थ शोभतें. ह्याच कालांत गुणाढ्य कवीनें पैशाची या प्राकृत भाषेंत आपली बृहत्कथा लिहिली.

गुणाढ्य हा काव्यगुणांनीं खराच गुणाढ्य–गुणांनीं आढ्य–होता. सृजनवाङ्मयाच्या अभिजात प्रकारांत जें व्यासाचें महत्त्व तेंच त्याच्या जानपद प्रकारांत गुणाढ्याचें महत्त्व. व्यासाचें जसें अभिजात वाङ्मयप्रकारांतील 'महाभारत' हें महाकाव्य आहे तसें गुणाढ्याचें जानपदवाङ्मयप्रकारांतील बृहत्कथा आहे. उलट कांहीं बाबतींत महाभारतकारापेक्षां बृहत्कथाकार हा श्रेष्ठ वाटतो. महाभारतकाराला आपल्या ग्रंथरचनेस अवश्य असणारी अधिष्ठानभूत अशी कौरवकथा आपोआप मिळाली. कौरवांचा इतिहास हा त्याला आयता तयार असलेला मिळाला. कथासूत्र, त्यांतील प्रसंग, त्यांतील पात्रें हीं सर्व सिद्ध झालेलीं मिळालीं. त्यांपैकीं कांहीं निर्माण करण्यांत महाभारतकाराला आपली प्रतिभा खर्च करावी लागली नाहीं. सर्व साहित्य आयतें सिद्ध असेंच मिळालें. तशी गोष्ट बृहत्कथाकाराची नव्हती. त्याला सर्व साहित्य आपल्या प्रतिभेच्या सामर्थ्यावर उभें करावें लागलें. कथासूत्र, पात्रयोजना, प्रसंगघटना वगैरे सर्व त्याला आपल्या प्रतिभेंतून काढावें लागलें. व्यास व गुणाढ्य ह्या दोहोंत हाच भेद आहे. गुणाढ्याची बृहत्कथा ही आमूलाग्र सृजनवाङ्मय आहे. ती आमूलाग्र स्वतंत्र वाङ्मय आहे. तिच्यांत सृजनशक्तीचा जसा विलास आहे, तसाच कलावन्ताच्या लालित्यनिर्मितीचा विलास आहे. कथेची कल्पना जशी विलोभनीय आहे, तशी तिची संपादणीहि विलोभनीय आहे. गुणाढ्याच्या गुणांची थोरवी त्याच्या ग्रंथाच्या छायांवरून जर एवढी प्रत्ययास येते तर प्रत्यक्ष पैशाची भाषेंतील त्याच्या मूळ ग्रंथावरून किती आली असती !

गुणाढ्यांचा मूळ बृहत्कथा हा ग्रंथ अज्ञाततेच्या अवगुंठनाखालीं अंधारांत आहे तसा गुणाढ्य हा स्वतःहि अज्ञाततेच्या अवगुंठनाखालीं आहे. त्याच्याविषयीं फारच थोडी माहिती मिळते. तो मूळचा उज्जयिनीचा. वररुचीचें जें जन्मस्थान तेंच गुणाढ्याचें जन्मस्थान. त्याच्या जन्मकालाबद्दल एकमत नाहीं. कांहीं विद्वान् त्याला सातवाहन राजाचा समकालीन म्हणून खि. उ. पहिल्या शतकांतील मानतात तर दुसरे वेब्रर वगैरे पाश्चात्य विद्वान् त्याला खि. उ. सहाव्या शतकांतील मानतात. इतर कांहीं मंडळी त्याला चौथ्या शतकांत घालतात. बरेंचसें संस्कृत अभिजात नाट्यवाङ्मय बृहत्कथेंतील कथांवर आधारलें गेलें आहे. त्याचप्रमाणें संस्कृत अलंकारवाङ्मयांत बृहत्कथेचा निर्देश केलेला आढळतो. श्रीहर्षाचीं नाटकें, बाणाची कादंबरी, विशाखदत्ताचें मुद्राराक्षस, भवभूतीचें मालतीमाधव हें सर्व वाङ्मय बृहत्कथेंतील ह्या नाहीं त्या कथेवरच आधारलेलें आहे. तेव्हां ह्या सर्वांच्या पूर्वी

गुणाढ्य हा होऊन गेलाच असला पाहिजे. काव्यदर्शाचा कर्ता दण्डी हा आपल्या ग्रन्थांत बृहत्कथेसंबंधीं "भूतभाषामयीं प्राहुरद्भुतार्थां बृहत्कथाम्" असा उल्लेख करतो. ज्या अर्थी या उल्लेखांत 'प्राहुः' असा दूरभूतकालदर्शी प्रयोग आहे त्या अर्थी दण्डीच्या (ख्रि. उ. ६००) पूर्वी पुष्कळ वर्षें अगोदर गुणाढ्याचा काल ठरतो. आपल्या इकडील विद्वत्परंपरेंत हा काल ख्रिस्तशक पहिलें शतक असा मानिला आहे.

गुणाढ्यानें आपली स्वतःची हकीकत सांगितली आहे व ती बृहत्कथामंजरी व कथासरित्सागर ह्यांतील संस्कृत छायांवरून अनुमानितां येण्यासारखी आहे. ही सर्व हकीकत काव्यमय व अद्भुतमय आहे. इतिहास, काव्य व पुराण ह्या तिहींची भेसळ झाल्यामुळें तिच्यांतून सत्याचे कण वेंचण्यास फार कष्ट पडतात व शेवटीं हातींहि पण थोडेच कण लागतात.

गुणाढ्य हा प्रथम शिवाचा माल्यवान् नांवाचा गण होता. माल्यवानाला पार्वतीचा शाप झाला व तो भूतलावर मानवयोनींत येऊन शातवाहन राजाचा अमात्य झाला. काणभूतीनें त्याला आपली कथा सांगण्यास विनंती केल्यावरून त्यानें आपली कथा सांगितली. गुणाढ्य म्हणाला—"सोमशर्मा नांवाचा एक दाक्षिणात्य ब्राह्मण होता. त्याला वत्स व गुल्म हे दोन मुलगे व श्रुतार्था ही मुलगी अशीं तीन अपत्यें होतीं. ह्या तिन्ही मुलांचे आईबाप त्यांच्या ल्हानपणींच वारले. पुढें कांहीं दिवसांनीं श्रुतार्था ही गर्भवती झाली. तिनें नागराजा वासुकीच्या भावाचा मुलगा कीर्तिसेन याच्याशीं आपला गांधर्वविवाह झाल्याचें आपल्या भावांना सांगून त्यांचा संशय दूर केला. पुढें कालांतरानें माझा जन्म झाला. माझ्या जन्मानंतर लगेंच वत्स, गुल्म व श्रुतार्था हीं आपल्या मूळ विद्याधरयोनिप्रत गेलीं. पुढें मी शातवाहन राजाच्या दरबारीं गेलों व तेथें त्याचा मंत्री झालों." अशी ही गुणाढ्याची थोडक्यांत कथा आहे. त्याची आई ब्राह्मण स्त्री होती, बाप नागराजा होता; व तो शातवाहन राजाचा मंत्री होता. ह्या त्याच्या मूळ कथेंतहि आणखी इतर उपकथांचा संबंध आला आहे. त्यांतील पात्रेंहि निरनिराळ्या अवतारांत जन्म घेतलेलीं अशीं आहेत. स्वतः गुणाढ्य हा पूर्वावतारांत शिवाचा माल्यवान् नांवाचा गण होता. काणभूति हा पूर्वावतारांत सुप्रतीक नांवाचा यक्ष होता. तोहि पुनः कात्यायन म्हणून दुसऱ्या एका कथेंत येतो. कात्यायनाबरोबर वररुचीचाहि उल्लेख ओघानेंच येतो. वररुचि हा पूर्वावतारांत पुष्पदंत म्हणून एका कथेंत आढळतो. संस्कृत व्याकरणाच्या

अध्ययनाच्या दोन शाखांमधील भांडणाचा संबंध ह्या गुणाढ्याच्या कथेंत आला आहे, आणि तोहि एका चमत्कारिक प्रकरणांत. शातवाहन राजा आपल्या राणीवशांत जलक्रीडा करीत असतां एका राणीनें त्याला 'मोदकैः (मा उदकैः) ताडय' अशी विनवणी केली. राजाला नीट त्याचा अर्थ न कळल्यामुळें त्यानें तिला प्रत्यक्ष मोदकांनीं मारण्यास सुरुवात केली. हें पाहून त्या सर्व चतुर नारी त्याला हसूं लागल्या. राजा खजील झाला. त्याला आपल्या अज्ञानाबद्दल वाईट वाटलें व त्यानें तेव्हांपासून व्याकरण शिकण्याचें मनावर घेतलें. गुणाढ्य म्हणाला, 'मी पांच वर्षांत शिकवीन. दुसरा शर्ववर्मा म्हणाला, 'मी सहा महिन्यांत शिकवीन.' दोघांनीं पण लाविला. तो पण शर्ववर्म्यानें जिंकला व राजाला त्यानें विद्यासंपन्न केलें. गुणाढ्यानें प्रायश्चित्त म्हणून वनवास पत्करला व विन्ध्य पर्वताकडे प्रयाण करून त्यानें पैशाची भाषेचें अध्ययन केलें. तेथें त्याची वररुचीशीं गांठ पडली. पुढें त्यानें तेथें बृहत्कथा लिहिली.

ह्या बृहत्कथेच्या प्रत्यक्ष लेखनाचा इतिहासहि मोठा अद्भुत आहे. गुणाढ्यानें एक एक लाखाच्या अशा सात लाख श्लोकांच्या सात कथा लिहिल्या. त्या लिहावयास त्याला सात वर्षें लागलीं. त्या काळीं शाई नसल्यामुळें त्यानें रक्तानें सर्व ग्रंथ लिहिला. ग्रंथाची भाषा पैशाची. त्या सर्व रम्य कथा ऐकायला सिद्ध, विद्याधर व पिशाच पुष्कळ येत असत. कथाश्रवणाचें फळ म्हणून सर्व पिशाचांना स्वर्गवास प्राप्त झाला. अशा ह्या दिव्य ग्रंथाला व त्याच्या कर्त्याला पृथ्वीतलावर प्रतिष्ठा कशी मिळवून द्यायची असा प्रश्न पडल्याबरोबर शातवाहन राजाला तो ग्रंथ अर्पण करायचा असें ठरलें. तो ग्रंथ घेऊन गुणाढ्याचे दोन शिष्य गुणदेव व नंदिदेव हे राजाकडे गेले. स्वतः गुणाढ्य प्रतिष्ठान राजधानीच्या बाहेर एका उद्यानांत थांबला. राजाला त्या दोन शिष्यांनीं ग्रंथाची सारी हकीकत सांगितली. परंतु राजा आपल्या विद्वत्तेच्या गर्वांत होता. ग्रंथ काय तर रक्तानें लिहिलेला. ग्रंथाची भाषा काय तर पैशाची. ग्रंथ ऐकला कोणीं तर पिशाचांनीं. हें सर्व ऐकून राजानें विद्वत्तेच्या ताठ्यांत त्या ग्रंथांचा धिक्कार केला. गुणाढ्याला हें सर्व कळल्यानंतर फार खेद वाटला. त्यानें आपला ग्रंथ घेतला. एका शिलोच्चयावर आसन ठोकलें. पुढें एक होमकुंड पेटविलें. ग्रंथाचें एक पान मोठ्यानें वाचायचें आणि अग्नींत टाकायचें असा सारखा त्यानें क्रम चालविला. भोंवतालीं शिष्य बसले आहेत. अरण्यांतील पशुपक्षी आपली तहानभूक विसरून एकाग्रतेनें ऐकत बसले आहेत,

सर्वांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा सारख्या गळताहेत, असा मोठा हृदयद्रावक देखावा होता. तिकडे राजा आजारी झाला. प्राण्यांचें मांस खायला न मिळाल्यामुळें हा आजार झाला असें राजवैद्यांनीं निदान केलें. शिकाऱ्यांकडे चौकशी केली. त्यांनीं अरण्यांतील वस्तुस्थिति राजाला सांगितली. सर्व पशुपक्षी जर गुणाढ्याची कथा एकाग्र होऊन ऐकत बसले आहेत तर मांस तरी कसें मिळायचें अशी त्यांनीं तक्रार सांगितली. राजा स्वतः पाहायला आला. तो सर्व हृदयद्रावक देखावा पाहून त्यालाहि वाईट वाटलें. बाकीचा ग्रंथ राखण्याची त्यानें प्रार्थना केली. तोंपर्यंत सातपैकीं सहा लाख ग्रंथ भस्मसात् झाला होता. फक्त एक लाख ग्रंथ शिल्लक होता. राजाच्या प्रार्थनेवरून त्यानें तो ग्रंथ त्याच्या हवालीं केला व तो वाचण्यास आपले दोन शिष्यहि त्याच्याबरोबर दिले. हा एक लाख ग्रंथ नरवाहनदत्ताची कथा होय. हाच गुणाढ्याचा बृहत्कथा ग्रंथ होय.

बृहत्कथा ग्रंथ एक लाख शिल्लक राहिला असें वर सांगितलें खरें, पण तोहि मूळ ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहीं. मूळ पैशाची भाषेंतील त्याची संहिता उपलब्ध नाहीं. त्या मूळ संहितेवरून दोन संस्कृत रूपांतरें तयार झालीं. ह्या त्याच्या छाया आहेत. ह्या रूपांतरांपैकीं एक बृहत्कथामंजरी हें रूपांतर काश्मीरच्या अनंतराजाच्या (खि. श. १०२८-१०८०) कारकीर्दीत क्षेमेन्द्र नांवाच्या पंडितानें केलें. दुसरें रूपांतरहि त्याच राजाच्या कारकीर्दीत त्याच्या सूर्यवती नांवाच्या राणीच्या प्रोत्साहनावरून सोमदेवभट्टानें तयार केलें. तें कथासरित्सागर या नांवानें प्रसिद्ध आहे. पहिलें रूपांतर दुसऱ्यापेक्षां संक्षिप्त आहे. ह्या दोहोंशिवाय आणखी एक 'बृहत्कथाश्लोकसंग्रह' नांवाचें रूपांतर बुधस्वामी या पंडितानें तयार केलें आहे. ह्याचा काळ खि. उ. ८००–९०० असा आहे. हें रूपांतर एम्. फेलिक्स लकोते (M. Felix Lacote)' या फ्रेंच पंडितानें मोठ्या आस्थेनें संपादित केलें आहे. मूळ गुणाढ्याच्या बृहत्कथेशीं हें इतर रूपांतरांपेक्षां अधिक जवळचें असल्याचें त्यानें सप्रमाण सिद्ध केलें आहे.

क्षेमेन्द्राच्या बृहत्कथामंजरीचे अठरा लंबक आहेत. कथापीठ, कथामुख, लावानक, नरवाहनजन्म, चतुर्दारिका, सूर्यप्रभ, मदनमंचुका, वेला, शशाङ्कवती, विषमशील, मदिरावती, पद्मावती, पञ्च, रत्नप्रभा, अलंकारवती, शक्तियश, महाभिषेक, सुरतमंजरी, हीं त्या अठरा लंबकांचीं नांवें आहेत. सोमदेवाच्या कथासरित्सागराचे एकशें-चोवीस तरंग आहेत. परंतु त्यांतहि अठराच लंबक आहेत. दोन्ही ग्रंथांत

लेखकांचा व त्यांतील कथांचा क्रम बराच उलटासुलटा झाला आहे. त्यांचें पौर्वापर्य नीट साधलें नाहीं. कथांमध्येंहि भेद फार आहे. बुधस्वामीच्या बृहत्कथाश्लोक-संग्रहांत मूळ सव्वीस लाभांपैकीं फक्त सहाच 'लाभ' आहेत. त्यांची श्लोकसंख्या पंचवीस हजार आहे.

बृहत्कथेंत मुख्य कथा आहे नरवाहनदत्त या राजाची. हा वत्सराज व वासवदत्ता ह्यांचा मुलगा. त्याचा मंचुकेशीं विवाह होतो. मदनमंचुका ही कलिङ्गराजाची मुलगी. विवाह झाल्यावर एका दिव्य कन्येनें नरवाहनास मलयाचलावर हरण करून नेलें. तेथें त्याची पिशङ्गजट नांवाच्या मुनीशीं भेट होते. मध्यंतरीं नरवाहनदत्ताचे निर-निराळ्या राजकन्यांशीं विवाह होतात. रत्नप्रभा, अलंकारवती, शक्तियशा, गंधर्वदत्ता, गौरीमुंडाची कन्या, वायुवेगप्रभृति पांच कन्या, मन्दरदेवीप्रभृति पांच कन्या इतक्या निरनिराळ्या देशांतील राजकन्यांशीं त्याचा विवाह होतो. प्रत्येक वेळीं अगोदर युद्ध होणें, त्यांत त्याला जय मिळणें व त्याचें पर्यवसान विवाहांत होणें असा क्रम आहे. मध्येंच मृगाङ्काची कथा आली आहे. त्याचे मंत्री त्याला उज्जयिनीच्या शशाङ्कवतीशीं लग्न करण्याची सल्ला देतात. तो उज्जयिनीला जातो. तेथील कर्मसेन राजाशीं युद्ध होतें. त्यांत त्याचा जय होतो. त्याला शशाङ्कवती प्राप्त होते. शेवटीं मूळ कथेंतील वत्सराजाच्या पद्मावती राणीचा येथें संबंध येतो. अशा रीतीनें वत्सराज, नरवाहनदत्त, मृगाङ्क ह्या तिघांच्या कथांचे प्रवाह एकत्रित केले आहेत. ह्या तीन प्रवाहांच्या अनुषंगानें किती तरी कथा आल्या आहेत. शिवपार्वती, वररुचि, पाणिनी, सात-वाहन, लोहजंघ, सुंदोपसुंद, उर्वशीपुरूरवस्, जीमूतवाहन, गोपाल ह्या सर्व कथा प्रथम आल्या आहेत. ह्या कथांचा जर पूर्वभाग समजला, तर उत्तर भागांत वणिक्-पुत्र, सोमप्रभा, पिशाचब्राह्मण, नकुलमूषक, मार्जारउलूक, सूर्यप्रभा, नलोपाख्यान, पञ्चतंत्र, तालवेताल, इत्यादींच्या कथा आल्या आहेत. पूर्वभागांतील कथा देव, यक्ष, विद्याधर, राजपुत्र ह्यांच्या आहेत. उत्तर भागांतील कथा वणिक्-सार्थवाह, पिशाचब्राह्मण, नकुलमूषक, मार्जारउलूक, पशुप्राणी, तालवेताल ह्यांच्या आहेत. तिन्ही प्रकारचे जानपदवाङ्मयाचे थर ह्या बृहत्कथावाङ्मयांत आढळतात.

ह्या सर्व कथांत विक्रमराजाचा संबंध कोठें येतो असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. विक्रमराजाचा संबंध प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अशा दोन्ही प्रकारांनीं येतो. प्रत्यक्ष विक्रमा-दित्याची कथा अडतिसाव्या तरंगांत सांगितली आहे. त्याची वेश्या मदनमाला हिचा उल्लेख आला आहे. ह्याशिवाय एकशें-वीस, एकशें-तेवीस, एकशें-चोवीस ह्या

तीन तरंगांत विक्रमाच्या कथा आहेत. विक्रमशील, विषमशील, विक्रमकेसरी ह्या नांवांच्या राजपुत्रांच्या कथा विक्रमादित्याच्याच असल्या पाहिजेत असें वाटण्याइतका पुरावा त्यांत आहे. सर्व कथांतील प्रसंगांची घटना अवंती-उज्जयिनीच्या परिसरांत होते. तेव्हां ह्यावरून विक्रमादित्याच्या कथेचें सूत्र कोठें स्फुट तर कोठें अस्फुट असें गोवलेलें दिसतें.

बृहत्कथा ही मूळ पैशाची भाषेंत लिहिली आहे. पैशाची भाषा बोलणारे कोणी पिशाच नांवाचे रानटी लोक होते. ह्यांच्या वसतिस्थानाबद्दल एकमत नाहीं. त्यामुळें पैशाची भाषा अमुक एका विशिष्ट ठिकाणीं बोलली जात होती असें सांगतां येत नाहीं. महाभारतांत पिशाच लोकांचा उल्लेख हिमालय, मध्य आशिया, सध्यांचा वायव्येकडील सरहद्दीचा प्रांत येथें राहणारे लोक असा आला आहे. सध्यां पेशावर हें पूर्वीं पिशाचपूर म्हणून त्यांचें राजधानीचें शहर होतें. सिंधूनदीच्या पूर्व किनाऱ्यावरील केकय प्रांत हा पिशाचांचा प्रदेश असेंहि कित्येक म्हणतात. ह्या ग्रंथावरून हे लोक विंध्यपर्वताच्या परिसरांत राहात असावेत असें वाटतें. पैशाची भाषेचा उल्लेख प्राचीन व्याकरणकारांनीं केला आहे. वररुचीनें एक, हेमचंद्रानें तीन, मार्कंडेयानें तेरा असे पैशाची भाषेचे भिन्न प्रकार निर्देशिले आहेत. कोनो ह्या पंडितानें पैशाची भाषेचा प्रांत विंध्यपर्वताचा परिसर असा ठरविला आहे (J. R. A. S., April 1921). परंतु मूळ पैशाची भाषेंतील बृहत्कथा उपलब्ध नाहीं. तिचीं तीन संस्कृत रूपांतरेंच उपलब्ध आहेत.

ह्या कथांत समाजांतील निरनिराळ्या थरांवर प्रचलित असलेलें तीन प्रकारचें जानपदवाङ्मय एकत्रित केलें गेलें आहे असें आम्हीं वर सांगितलें. ह्यांतील कांहीं जानपदकथा दुसऱ्या देशांतहि गेल्या असाव्यात; किंवा दुसऱ्या देशांतील कथा ह्या बृहत्कथेंत आल्या असाव्यात. त्याचप्रमाणें ह्यांत आर्य, द्राविडी, कोलेरी, आंदमानी, जावा, शिमी, मंगोली इत्यादि जानपदकथांचें मिश्रण झालें असण्याचा संभव आहे. शिव व रुण्डमाला ह्यांसंबंधीं कथा अंदमानांत प्रचलित आहेत. लोहजंघ-रूपिणिका, चंड-महासेन, कृत्रिम हत्ती व त्याच्या पोटांत दडलेले योद्धे ह्यांची कथा ईजिप्तमध्यें आहे. अलीबाबा व चाळीस चोर ही कथा तिचेंच एक दुसरें रूप आहे. मोठ्या हौदामध्यें दडून बसणें ही कल्पना पेगू, मर्तांबान, ब्रह्मदेश येथील वाङ्मयांत आढळते. एकाच्या शरीरांत दुसऱ्यानें प्रवेश करणें, खुणांची करपल्लवी भाषा वापरणें, गरुड व त्याचे पराक्रम, डोहाळे, प्रदक्षिणा घालणें, कळीचा घोडा, हसणारा

मासा, शिबी राजाची कथा, कल्पतरु, वालखिल्य, वगैरेसंबंधींच्या कथा जगाच्या निरनिराळ्या भागांतील जानपदवाङ्मयांत आढळतात. वेतालांच्या कथा बरोबर अशाच स्लाव्ह लोकांच्या जानपदवाङ्मयांत आहेत. पंचतंत्रांतील गोष्टींनीं इराण, अरबस्तान, तुर्कस्तान, इत्यादि प्रदेशांतून युरोपांत प्रवास केला आहे. ह्यावरून हें स्पष्ट आहे कीं बृहत्कथेंतील कथावाङ्मयाचें स्वरूप खरेंखुरें जानपदवाङ्मयीन आहे.

ह्याशिवाय कथांत उल्लेखिलेल्या मुख्य वस्तूहि सारख्या स्वरूपाच्या असलेल्या आढळतात. येथें जर कल्पतरु असला तर युरोपमधील गोष्टींत टोपी आहे. टोपी डोक्यास घातली कीं इच्छिलेली वस्तु प्राप्त होते. इराणांतील वाङ्मयांत एक पिशवी आहे. स्वीडनमध्यें बूट आहेत. सिसिलीमध्यें एक चादर आहे. डेक्यामॅरानच्या गोष्टींत एक बिछाना आहे. मंत्रानें भारलेल्या वस्तु कोठें जॅकेट, तर कोठें काठी, तर कोठें तांब्याचें भांडें, तर कोठें थाली, तर कोठें वहाणांचा जोड, अशा भिन्न भिन्न आहेत. हिंदुस्थानांत गरुड, इराणांत अमरु नांवाचा पक्षी, अरबस्तानांत अंग, जपानांत किर्नी, चीनमध्यें शहामृग, बुद्धांचा हत्तीलिंग असे निरनिराळे पक्षी कथावाङ्मयांत प्राधान्येन वावरतात. पातिव्रत्याच्या गुणाचे चमत्कार, गर्भवतीच्या डोहाळ्यांचे चमत्कार, खुणांच्या भाषेचे चमत्कार, वेश्यांचें चातुर्य, निरनिराळीं दिव्यें, अशा कितीतरी गोष्टी आहेत कीं त्या जगाच्या जानपदवाङ्मयांत आढळतात व त्याचें ऐक्य प्रस्थापित करतात.

बृहत्कथेंतील सर्व कथांत लोकप्रिय अशा कथा म्हटल्या म्हणजे पंचतंत्र व वेताल-कथा ह्या होत. नरवाहनाची किंवा मृगाङ्काची कथा त्या मानानें मागें पडली. पंच-तंत्र व वेतालपंचविशी ह्यांनीं हिंदुस्थानांतच केवळ नव्हे तर बाहेरच्या देशांतहि दूरवर प्रवास केला. दोहींमध्यें नीतिबोध व अद्‌भुतता आहे. पुष्कळ भाषांत त्यांचा अवतार झाला आहे. पैकीं वेतालकथांचा विक्रमादित्य राजाशीं संबंध आहे. सोमदेवानें लिहिलेल्या कथासरित्सागरांत मात्र नायकाचें नांव विक्रमसेनाचा मुलगा त्रिविक्रमसेन असें आहे. हा गोदावरी नदीच्या कांठीं असलेल्या प्रतिष्ठानं येथील राजा होता. दुसऱ्या इतर कथांतील नायक विक्रम हा असून तो उज्जयिनीचा राजा होता. आरंभाची कथा क्षान्तिशील भिक्षूची आहे. त्याला मंत्रसिद्धि प्राप्त करून घ्यावयाची आहे. त्यासाठीं तो राजाचें साहाय्य घेतो. एका झाडावर टांगलेलें प्रेत आणावयास तो राजाला सांगतो. तें प्रेत तो खांद्यावर घेऊन निघूं लागतो तोंच त्यामध्यें असलेला वेताल बोलूं लागतो व त्याची वाटेनें करमणूक व्हावी म्हणून वेताल त्याला

गोष्ट सांगतो. त्या गोष्टींत एक कूटप्रश्न असतो. त्याचें उत्तर तो राजापासून मागतो. राजाला तें देतां येत नसल्यामुळें तें प्रेत पुनः त्या झाडावर टांगतें. असें पंचवीस वेळां होतें. ह्याच त्या पंचवीस कथा होत.

आतां हा वेताल कोण? हा एक पूर्वजन्मींचा ब्राह्मण होता. तो ब्रह्मस्थलांत राहात असतांना त्याला विहिरीजवळ एक साप चावला. त्याच्या अंगाचा दाह झाला. तो विहिरींत उडी टाकूं लागला. इतक्यांत तेथें विक्रमकेसरी नांवाचा मृगाङ्क राजाचा मंत्री फिरत फिरत आला. त्यानें त्या ब्राह्मणाचें विष उतरविलें. ब्राह्मणानें उलट त्याला वेतालविद्या सांगितली. तिच्या सामर्थ्यानें त्याला त्याचा राजा मृगाङ्क भेटला. तिच्या सामर्थ्यानें मृगाङ्काला उज्जयिनीची शशाङ्कवती राजकन्या प्राप्त झाली.

वेतालपंचविशीच्या मराठी व हिंदी रूपांतरांत धारानगरच्या गंधर्वसेन राजाची कथा आरंभीं सांगितली आहे. त्याला सहा मुलगे होते. त्यांत शंख, विक्रम, भर्तृहरि हे तीन होते. भर्तृहरि राज्य करूं लागला. तो पुढें योगी झाला. विक्रम अगोदरच शंखाला मारून राजा झाला होता. तोहि पुढें योगी झाला. विक्रम उज्जयिनीस परत येतो तोंच त्याला नगररक्षक राक्षस अटकाव करतो व त्याला चंद्रभान राजाची गोष्ट सांगतो. ह्या गोष्टींत तिघा भावांचे पूर्वजन्म—राजा, तेली व कुंभार—असे त्यांना कळतात. कुंभारानें तेली भावाला मारून त्याला भुताच्या स्वरूपांत एका झाडावर टांगून ठेवलें. हाच तो वेताल. अशी ही एक दुसरी कथा आहे.

वेतालाच्या एकंदर पंचवीस कथा आहेत. वज्रमुकुट-पद्मावती, तीन ब्राह्मण व व त्यांची पत्नी, दोन पक्ष्यांचा संवाद, पोपटमैना कथा, वीरवर, सोमप्रभ, प्रचंडसिंह, मदनसुंदरी, अनंगवती, लावण्यवती, सोमशर्मा, मनःस्वामिन्, उन्मादयंती, हरि-स्वामिन्, धनवतीपुत्र, मूलदेव ह्यांच्या कथा आहेत. प्रत्येक गोष्टींत कांहीं तरी गूढ प्रश्न राजास टाकला आहे. त्याचें उत्तर मिळालें नाहीं कीं लगेंच वेताल शिंशप झाडावर टांगला जातो. हा क्रम पंचवीस वेळां होतो.

वेतालपंचविशी व सिंहासनबत्तिशी एकत्र जोडण्याचा प्रयत्न वरील भर्तृहरि आणि विक्रम ह्यांच्या कथेमध्यें केलेला दिसतो. भर्तृहरि हा आपल्या अनंगसेना राणीच्या बेइमानी वर्तनाला वैतागून योगी होतो. त्याचा भाऊ विक्रम हा नंतर राजा होतो. तो एका भिक्षूच्या सांगण्यावरून आपलें आयुष्य देऊं इच्छितो. तेथें एक वेताल प्रकट होतो आणि खूष होऊन त्याला मंत्रसिद्धि प्राप्त करून देतो. ह्या कथांचे तीन अवतार आहेत. एक जैन, दुसरा गद्यपद्यमिश्र व तिसरा पद्य. ह्या

तिहींत कथा निरनिराळ्या आहेत.

विक्रमाच्या मृत्यूनंतर त्याचें सिंहासन लुप्त होतें. तें एका शेतांत पुरून ठेविलेलें असतें. त्यावर एक ब्राह्मण शेतकरी माळा बांधतो व शेताचें रक्षण करतो. त्या माळ्यावर तो चढला कीं त्याच्या मनांत उदात्त भावना व उदार विचार येत. खालीं उतरला कीं पुनः व्यावहारिक क्षुद्रवृत्तीचे विचार व भावना येत. हा चमत्कार त्यानें आपल्या भोज राजाला सांगितला. राजालाहि तोच अनुभव आला. त्यानें खणून पाहिलें तों त्याला सिंहासन पुरलेलें आढळलें. तो सिंहासनावर चढणार तोंच त्याला सिंहासनाखालच्या आधाराच्या खांबांतील एका पुतळीनें अटकाव केला व 'तूं विक्रमासारखा आहेस का? असलास तर सिंहासनावर बैस.' असें सांगितलें. भोजानें 'तो विक्रम कसा होता?' असें विचारतांच तिनें एक विक्रमाच्या गुणाची कथा सांगितली. असा प्रकार बत्तीस वेळां झाला. सिंहासनास बत्तीस खांब व प्रत्येक खांबावर एक अशा बत्तीस पुतळ्या होत्या. त्या बत्तीस पुतळ्यांनीं बत्तीस कथा सांगितल्या.

ह्या बत्तीस पुतळ्यांचीं नांवें भिन्न भिन्न संहितांत भिन्न भिन्न आढळतात. मराठी संहितेंत जया, विजया, जयंती, अपराजिता, जयघोषा, लीलावती, मंजुघोषा, जयसेना, मदनसेना, मदनमंजरी, शृंगारकलिका, नरमोहिनी, भोगनिधि, रतिप्रिया, सुमित्रा, प्रेमावती, सुप्रभा, कुरंगनयना, चंद्रज्योती, चंद्रकांती, भाग्यमंजिरी, लावण्यवती, करुणावती, हंसगमना, रूपकांता, देवनंदा, देवांगना, चित्रिणी, सुलोचना, प्रेमावती, गुणप्रिया, चित्रकला, ह्या त्या बत्तीस सिंहासनपुतळ्या होत. ह्यांनीं सांगितलेल्या प्रत्येक कथेंत विक्रमाचा कांहीं तरी गुण वर्णिला आहे. त्यानें दाखविलेलें औदार्य, ब्राह्मणांच्या यज्ञांत दिलेलें साह्य, त्याला वरुणाकडून मिळालेलीं चार रत्नें, देवदत्तानें पारखलेली त्याची कृतज्ञता, एका बैराग्याला दिलेलें समाधान, शीर्षें नसलेल्या दोन प्रेतांना त्यानें दिलेलें जीवदान, त्यानें पाण्यानें भरलेलें सरोवर, राक्षसाच्या तावडींतून त्यानें सोडविलेली वेश्या ब्राह्मण-स्त्री, स्वार्थत्यागानें त्यानें लाजविलेले पंडित, एका मुनीनें त्याला दिलेली राजधर्माबद्दलची सूचना, अप्सरा आणि उकळलेल्या तेलाचें भांडें, वसंत ऋतु आणि ब्राह्मणकन्या, सूर्य, बली, मनि ह्यांना दिलेल्या भेटी, त्याचा आणि शालिवाहनाचा वारससंबंध, जुगाऱ्याची सुधारणा, वेताळाशीं संबंध, त्याचें सामर्थ्य, औदार्य, स्वार्थत्याग, प्राण-त्यागाची तयारी, इत्यादि विषयांसंबंधीं ह्या बत्तीस कथा आहेत.

ह्या वेतालाच्या पंचवीस व सिंहासनाच्या बत्तीस कथांखेरीज शुकानें सांगितलेल्या बहात्तर कथा आहेत. त्यांना 'शुकबहात्तरी' असें म्हणतात. त्यांत विक्रमाचा संबंध फार थोडा आहे. त्यांत स्त्रीस्वभावच अधिक वर्णिला आहे. त्यांच्या विविध चारित्र्यावर त्या आधारिल्या आहेत. पातिव्रत्य, जारकर्मनिषेध, चातुर्य, पांडित्य, प्रवासामुळें होणारा वियोग, प्रोषितभर्तृकांचा स्वभाव अशा पुष्कळ बाबी त्यांत अंतर्भूत केल्या आहेत. कथांची घडण वेतालाच्या कथांसारखीच आहे.

ह्याशिवाय आणखी एक विक्रमाची कथा फार प्रसिद्ध व पवित्र मानिली जाते. ती शनिमाहात्म्यांत ग्रथित केली आहे. मारुतीचे व शनीचे उपासक ह्या पोथीचें नित्य पठन करतात. ही कथा सर्वांच्या परिचयाची आहे. ही कथा फार जुनी नाहीं व हिच्यांत जानपदस्वरूपहि फार नाहीं. विक्रमानें शनीच्या साडेसातीच्या फेऱ्यांत कोणकोणत्या यातना भोगल्या व सर्व यातनांतून तो आपल्या अंगच्या औदार्य, सहनशीलता, सहानुभूति, शौर्य, इत्यादि गुणांच्या जोरावर कसा तावून सुलाखून बाहेर पडला हें त्या कथेंत सांगितलें आहे. वेतालपंचविशीमध्यें विक्रमाचे जे गुण प्रतीत होतात तेच गुण ह्याहि कथेंत आलेले आहेत. कथेची एकंदर रचना ओंवीमय आख्यानाची आहे.

येथवर विक्रमादित्य राजासंबंधीं प्रचलित असलेल्या जानपदवाङ्मयाचें स्वरूप सांगितलें. तें स्वरूप सांगतांना जानपदवाङ्मय कसें तयार होतें, तें समाजांतील निरनिराळ्या थरांवरील लोकांकडून कसें निर्माण होतें व त्यावरून जानपदवाङ्मयाचे भिन्न प्रकार कसे पडतात व प्रत्येक प्रकारांत त्या त्या थरावरील लोकांची संस्कृति कशी अंतर्भूत केली जाते, इत्यादि गोष्टींचाहि विचार आपणास करावा लागला. आतां त्यासंबंधीं एकच प्रश्न राहिला. हा प्रश्न मात्र केंद्रवर्ती स्वरूपाचा असून अत्यंत महत्त्वाचा आहे, आणि तो प्रश्न म्हटला म्हणजे हा—

हा विक्रम राजा कोण ? हा विक्रम राजा केव्हां होऊन गेला ? विक्रम हा कोणी ऐतिहासिक पुरुष होऊन गेला कीं नाहीं ? किंवा हा कविकल्पनेंतील कोणी काल्पनिक पुरुष आहे ? विक्रमादित्य हें व्यक्तिनाम आहे का एखादें बिरुद आहे ? हे प्रश्न आजवर अनेकदां उद्भवले व त्यांचें अद्याप कांहीं पूर्ण समाधानकारक असें उत्तर मिळालें नाहीं. अद्याप कांहीं निश्चित रीतीनें विक्रमादित्य राजा अमुक एका काळीं होऊन गेला असें सांगण्याइतकी परिस्थिति आली नाहीं. सर्व तर्क व अनुमानेंच अद्यापि आहेत. इतकी गोष्ट मात्र खरी म्हणून धरून चालण्यास आमच्या मतें

कोणताहि प्रत्यवाय नाहीं. संस्कृत व प्राकृतोद्भव भाषांतील सर्व किंवा बहुतेक जानपद-वाङ्मयांतील नायकत्व हें विक्रमादित्याकडे दिलें गेलें आहे. बहुतेक सर्व जानपद-लोककथावाङ्मयांतील नायक राजा विक्रम हाच आहे. असें हें नायकत्व परकीय राजाला दिलें जाण्याचा संभव फार कमी असला पाहिजे. तसेंच विक्रमादित्य ह्या केवळ ब्रिरुदाला किंवा पदवीला हा मान दिला जाण्याचा संभवहि तितकाच कमी. तसेंच विक्रमादित्य ह्या काल्पनिक व्यक्तीला तो मान दिला जाण्याचा संभवहि तितकाच सुतराम् अशक्य. सर्व यच्चयावत् कथांत ज्या अर्थी विक्रमादित्य हा नायक म्हणून वावरतो, प्रत्येक कथेंत ज्या अर्थी त्याचें गुणगान होतें त्या अर्थी तो विक्रमादित्य हा खराखुरा राजा होऊन गेला असला पाहिजे. तो काल्पनिक व्यक्ति नसला पाहिजे. तो केवळ ब्रिरुदहि नसला पाहिजे. ही झाली कथानायक म्हणून एक विचारसरणी.

आणखीहि एक विचारसरणी अशीच महत्त्वाची आहे. विक्रमादित्य राजा काय किंवा शालिवाहन राजा काय, ह्यांचीं नांवें आपण आपल्या रोजच्या धार्मिक व्यवहारांत उच्चारतों, त्यांच्या नांवांचा उच्चार धार्मिक विधींच्या संकल्पांत आपण करतों. त्या शब्दांच्या द्वारां आपण आपली कालगणना आज गेलीं हजार-बाराशें वर्षे तरी करीत आहोंत. दिग्विजय करणें, त्यानंतर अश्वमेध करणें, छत्र धारण करणें व आपल्या नांवाचा राजशक स्थापन करणें हीं सर्व अधिराजाचीं चिन्हें होत. ह्या चिन्हांनींच तो सम्राट् म्हणून ओळखला जात असे. राम, युधिष्ठिर, शुंग, कण्व ह्या राजांनीं हें केलें. पुढील कालांतील गुप्त, सेन, शिलाहार, मौखरी, चोल, पांड्य, भोसले ह्या राजवटींतील पहिल्या राजांनीं हेंच केलें. सर्वांनीं स्थापलेल्या कालगणनेला सनातनी धर्मानें मान्यता दिली. कालाच्या ओघांत हे सर्व राजशक मागें पडून उत्तरेकडे विक्रमशक व दक्षिणेकडे शालिवाहनशक हे दोन राजशक स्थायी झाले. हे दोन्ही जर परकी अनार्य राजे असते तर ह्यांच्या नांवानें राजशक सुरू झाले नसते;—सुरू झाले असते तरी धर्ममान्य झाले नसते. हे दोन राजे जसे अनार्य नसावेत तसे ते केवळ कविकल्पितहि नसावेत हेंहि तितकेंच स्पष्ट आहे. केवळ कवीच्या कल्पनेंतून निघालेल्या राजांच्या नांवांनीं कालगणना सुरू झाली नसती व धर्ममान्यहि झाली नसती.

तेव्हां विक्रमादित्य हा आर्यवंशाचा राजा असावा, तो सनातनी हिंदु-धर्माभिमानी असावा. त्यानें दिग्विजय केला असावा. त्यानें अश्वमेध यज्ञ केला असावा, व आपला राजशक स्थापला असावा. हाच राजशक आज दोन हजार वर्षे आपण

वापरीत आहेंत. तरीपण ही गोष्ट कबूल करणें प्राप्त आहे कीं हीं वरील सर्व अनुमानें आहेत. विक्रमादित्याच्या ऐतिहासिकत्वाबद्दल निश्चित पुरावा उपलब्ध नाहीं. त्याच्या नांवाबद्दल, त्याच्या बिरुदाबद्दल, त्याच्या वंशाबद्दल, त्याच्या राजवटीबद्दल, त्यानें मिळविलेल्या यशाबद्दल व स्थापिलेल्या कालगणनेबद्दल विद्वानांचें एकमत नाहीं. निरनिराळ्या विद्वानांचीं निरनिराळीं मतें आहेत. कोणी आंध्रवंशीय शातकर्णी हाच शककर्ता विक्रमादित्य असावा असें म्हणतात, तर कोणी अझेस (ख्रि. पू. १००) नांवाचा यवन राजा हा तो असावा असें म्हणतात, तर कोणी गुप्तवंशांतील दुसरा गुप्त (ख्रि. उ. ३८०–४१४) हा तो असावा असें म्हणतात, तर कोणी यशोवर्मा (ख्रि. उ. ६००), तर कोणी कनिष्क कुशान हाच विक्रमादित्य असें म्हणतात. विक्रमादित्य हें प्रथम जरी व्यक्तिनाम असलें तरी पुढें तें बिरुद झालेलें दिसतें. कारण हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत विक्रमादित्य ह्या नांवानें आपणास संबोधणारे किती तरी राजे होऊन गेल्याचें आढळतें. शातकर्णी आंध्र, समुद्रगुप्त, चंद्रगुप्त (दुसरा), सत्याश्रय, अनिवारी, त्रिभुवनमल्ल, विक्रमार्क, वगैरे आंध्र, गुप्त व चालुक्यवंशीय राजे आपणा स्वतांस विक्रमादित्य असें म्हणतात. ह्यांपैकीं प्रत्येकानें आपापल्या राजवटींत पराक्रम गाजविले, परकी शत्रूंना पादाक्रांत केलें, दिग्विजय केला, अश्वमेधयज्ञ केला व कालगणना सुरू केली. पहिल्या मूळ विक्रमादित्यानें जें केलें तें सर्व आपण केलें तेव्हां त्याची कालगणना ती आपली, त्याचें जें विक्रमादित्य बिरुद तें आपलें अशी त्या प्रत्येकाची भावना झाली असल्यास व त्या भावनेनें प्रेरित होऊन त्यानें आपणास विक्रमादित्य म्हणवून घेतलें असल्यास नवल नाहीं. असें त्या प्रत्येकानें आपणास विक्रमादित्य म्हणवून घेतलें म्हणूनच हा सर्व विक्रमादित्यांसंबंधीं घोटाळा झाला आहे.

शिलालेख, नाणीं, पुराणांतील उल्लेख, बौद्ध, जैन व सनातनी हिंदुधर्मपरंपरा, इत्यादि साधनांत ह्या कालासंबंधीं माहितीचे जे कण आढळतात ते एकत्र करून साधारणपणें स्थूलमानानें पुढीलप्रमाणें इतिहासाचा आराखडा तयार होतो. इसवी सनाच्या पूर्वी पहिल्या शतकांत बलिष्ठ अशा तीन सत्ता हिंदुस्थानांत राज्य करीत होत्या. एक पूर्वेकडे शुंगराजांची, दुसरी उत्तरेकडे ग्रीक यवनांची आणि तिसरी दक्षिणेकडील पैठणची आंध्रांची. उज्जयिनीच्या दृष्टीनें ह्या तीन सत्ता महत्त्वाच्या होत्या. ह्याच सुमारास शकस्तान येथील शक राजांची सत्ता हळुहळू बलिष्ठ होऊं पाहात होती. उज्जयिनीवर स्वामित्व कोणाचें असावें ह्या संबंधांत ह्या सर्व सत्ता-

धीशांत स्पर्धा होती. त्या स्पर्धेमुळेंच शक आणि आंध्र व शक आणि गुप्त ह्यांचा झगडा झाला. शक आणि आंध्र ह्यांचे दोन वेळां—एक खि. पू. १०० मध्यें व दुसरा खि. उ. १०० मध्यें—झगडे झाले. पहिल्या झगड्यांत शातकर्णी आंध्र ह्यानें जय मिळविला; व दुसऱ्यांत शालिवाहनानें जय मिळविला. शक आणि गुप्त ह्यांचा झगडा खि. उ. ४०० मध्यें झाला. ह्यांत चंद्रगुप्त दुसरा ह्यानें जय मिळविला. शातकर्णी आंध्रानें विक्रमादित्य हें ब्रिरुद घेऊन कालगणना सुरू केली. ती नर्मदोत्तर हिंदुस्थानांत अद्याप सुरू आहे. शालिवाहनानें सुरू केली ती दक्षिणेंत रूढ आहे. दुसऱ्या चंद्रगुप्तानें व चालुक्यवंशीय राजांनीं नुसतें विक्रमादित्य हें बिरुद धारण केलें. असा हा थोडक्यांत विक्रमादित्यासंबंधीं इतिहास आहे. खिस्तपूर्व पहिल्या शतकांत एका बाजूस वैदिकधर्म व दुसऱ्या बाजूस बौद्ध व जैनधर्म असा धर्मांचा लढा सुरू होता. जैन व बौद्ध धर्मांची बाजू ग्रीक, यवन, शक, कुशान हे परकी राजे घेत व वैदिकधर्मीय राजांशीं भांडत. पुष्यमित्र शुंगाशीं कुशानवंशांतील दोन्ही खडफिसेस लढले. ह्या वंशाला यक्षवंश व त्या राजांना बुद्धयक्ष व गंभीरयक्ष असें बौद्धवाङ्मयांत म्हटलें आहे (म. श्री. क. ५४१-५४६). पुष्यमित्र राजाला बौद्धवाङ्मयांत 'गोमिषंड दुरात्मन्' असें म्हणून 'तूं व तुझा वंश नरकांत जाल' असा शांप दिला आहे (मञ्जुश्रीमूलकल्प ५३५-५३७). जैन-वाङ्मयांतहि असेच उल्लेख आढळतात. उज्जयिनीच्या गर्दभिल्ल नांवाच्या राजानें कालकाचार्य ह्या जैनमुनीचा अपमान केला. त्यानें तो जैनमुनि चिडला व त्यानें एका शकवंशीय राजाला त्याचा सूड घेण्यासाठीं बोलाविलें. त्याप्रमाणें तो आला. त्यानें उज्जयिनी जिंकली व गर्दभिल्लाला मारलें. पुढें लगेंच गर्दभिल्लाच्या मुलानें प्रतिष्ठानहून येऊन शक राजाला पादाक्रांत करून बापाच्या वधाचा सूड घेतला. ही जी घटना झाली तीच विक्रमादित्याचा शकावर जय होय. हिच्या स्मरणार्थ कालगणना सुरू झाली. दुसराहि एक जैन-कथांतील उल्लेख महत्त्वाचा आहे. सिद्धसेन दिवाकर ह्याच्या दीक्षेच्या उपदेशाचा सात्त्विक परिणाम म्हणून विक्रमानें सर्व पृथ्वीवरचें ऋणाचें ओझें दूर केलें, तिची मुक्तता केली आणि वर्धमानानें स्थापिलेल्या कालगणनेंत बदल केला (वर्धमानसंवत्सरपरावर्तनमकरोत्). हा जो बदल केला व तो महावीराच्या निर्वाणानंतर ४७० वर्षांनीं केला ह्याबद्दल सर्व जैन धार्मिक परंपरांत एकवाक्यता आहे.

खिस्तपूर्व पहिलें शतक व खिस्तोत्तर दुसरें शतक असा दोनशें वर्षांचा काल

हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांतील क्रांतीचा काल होय. ह्या कालांतच सामाजिक, धार्मिक, वाङ्मयीन व भाषिक क्रांति झाली. त्याबरोबर राजकीय क्रांति झाली. वैदिकधर्माचें पुनरुज्जीवन, महाभारताचें संस्करण, मनुस्मृतीचें संस्करण, प्राकृत भाषांचा उत्कर्ष, सत्तसई, बृहत्कथा ह्या ग्रंथांचें संकलन हीं ह्या कालांतच झालीं. ह्या कालांतच आंध्र शातकर्णीनें शकांवर जय मिळवून उज्जयिनी जिंकली, अश्वमेध केला, आपल्या नांवाची कालगणना सुरू केली. ह्या कालांतच शातवाहनानें शकांवर जय मिळवून दिग्विजय केला व आपल्या नांवाची कालगणना सुरू केली. दिग्विजय करणें, अश्वमेध करणें व आपल्या नांवाची कालगणना सुरू करणें हीं दोन सम्राट्-पदाचीं सर्वमान्य व धर्मविहित लक्षणें होत. तीं संपादून हिंदुस्थानावर वैदिक-धर्माभिमानी असें साम्राज्य आंध्र शातकर्णी व शातवाहन ह्यांनीं स्थापिलें. ह्या गोष्टी अनुक्रमें खिस्तपूर्व ५७ व खिस्तोत्तर ७८ मध्यें झाल्या. पहिल्याचें स्मृतिचिन्ह म्हणून विक्रमसंवत् आपण पाळतों. दुसऱ्याचें स्मृतिचिन्ह म्हणून शालिवाहन शक आपण पाळतों. विक्रम व शालिवाहन हे दोन वैदिकधर्मीय अधिराजे, सम्राट्, अश्वमेधयाजी, कालगणनासंस्थापक असे असल्यामुळें सर्व कथावाङ्मयांत केंद्रवर्ती होऊन बसल्यास नवल नाहीं. स्वार्थत्याग, औदार्य, शौर्य, निर्भयत्व, अमानित्व, परहितपरत्व, इत्यादि सर्व सात्त्विक गुणांचें निधान व आदर्श नृपति म्हणून विक्रमादित्य मानिला गेल्यामुळें तो सर्व जानपदकथावाङ्मयाचा नायक केला गेला. सर्व जानपदवाङ्मय हें विक्रमकथावाङ्मयच झालें.*

---

* सदर निबंध ' विक्रमस्मृतिग्रंथां 'त प्रसिद्ध झालेला आहे. निबंधलेखनाच्या कामीं पुढील ग्रंथांचा उपयोग झाला. त्या त्या ग्रंथकारांचे आम्ही आभारी आहोंत. कथा-सरित्सागर–निर्णयसागर; बृहत्कथामंजरी; Ocean of Stories, Vol. I–X by Tawney, Panzer; सिंहासनबत्तिशी (शुक्ल–मराठी); वेतालपंचविशी. ह्याशिवाय डॉ. भांडारकर, के. पी. जयस्वाल, व्हिन्सेंट स्मिथ, पेरिप्लूस इत्यादि ग्रंथकारांचा उपयोग झाला आहे.

# ३. अक्षरवाङ्मय-निर्माता ज्ञानेश्वर

आज इतकीं वर्षें होऊन गेलीं. कांहीं नाहीं तरी जवळ जवळ सहाशें सातशें वर्षें झालीं. 'ज्ञानेश्वर माउली' चा नामघोष सर्व महाराष्ट्रांत कानाकोपऱ्यांत दुमदुमून राहिला आहे. तिथें प्रांतभेद नाहीं, स्थलभेद नाहीं किंवा वर्णभेदहि नाहींच नाहीं. ब्राह्मण असो वा शूद्र असो, लहान मूल असो वा वयस्क असो, स्त्री असो वा पुरुष असो, श्रीमंत असो वा गरीब असो; प्रत्येक जण ह्या नांवाचा जयघोष करण्यांत धन्यता मानीत आहे. पूर्वी कित्येकांनीं हा नामघोष केला. आजहि कित्येक हा नामघोष मोठ्या भावनेनें, मोठ्या श्रद्धेनें करीत आहेत, व आपल्या जन्माचें सार्थक करीत आहेत. ह्या सहाशें वर्षांच्या काळांत बदल झाले. देशांत किती तरी क्रांत्या झाल्या. कित्येक राजवटी बदलल्या. कित्येक वेळां निसर्गाचीं संकटें आलीं. धार्मिक छळ झाले. ह्या बाह्य क्रांत्यांचा कांहींसुद्धां परिणाम झाला नाहीं. ज्ञानेश्वर-माउलीच्या नामाचा घोष कांहीं कमी झाला नाहीं. उलट तो वाढतच जात असल्याचें आपण प्रत्यक्ष पाहतों आहोंत. लाखों वारकरी खांद्यावर पताका, हातांत टाळ व मुखांत 'ज्ञानेश्वर माउली, तुकाराम' हा अखंड नामघोष करीत पंढरपुरींत चंद्रभागेच्या वाळवंटांत तन्मयतेनें तंद्रींत नाचतांना पाहिले म्हणजे मन समाधान पावतें, दृष्टि निवते, थोडी तरी आध्यात्मिक जागृति उत्पन्न होते. ह्या वारकऱ्यांना ऊन नाहीं, तहान नाहीं, पाऊस नाहीं, वारा नाहीं. कशाचीहि फिकीर नाहीं. प्रत्यक्ष मृत्यूचीहि पर्वा नाहीं. उलट ह्या भजनाच्या समाधींत असतांना मृत्यु आला तर त्याच्यासारखा दुसरा आनंद नाहीं, ही त्यांच्या मनाची भावना असते. हें असें आज सहाशें वर्षें चाललें आहे. अशी जी जबरदस्त मोहिनी लोकांच्या मनावर घातली आहे तिच्यावरून त्यांची थोरवी सिद्ध होते. ज्ञानेश्वराचें माहात्म्य सांगण्यास ह्यापेक्षां दुसरा आणखी पुरावा कोणता हवा !

इसवी सनाच्या तेराव्या शतकाच्या शेवटीं ही एक अद्वितीय विभूति होऊन गेली. अद्वितीयत्व इतकें कीं त्यांना ईश्वराचा अवतार मानण्यापर्यंत मजल गेली. वयाची हयात पाहिली तर वीस-एकवीस वर्षांची. इ. स. १२७५ त ज्ञानेश्वरांचा जन्म झाला व १२९५ मध्यें त्यांनीं आपला देह ठेवला. ह्या वीस वर्षांतही पुन्हा बालवयाचीं अजाणपणाचीं कांहीं तरी पहिलीं दहा-बारा वर्षें सोडलीं तर, अवघ्या सात-आठ वर्षांत ज्ञानेश्वरांनीं मोठें लोकोत्तर कार्य केलें. त्यांच्या कार्याला दुसरी

तोड नाहीं. त्याला दुसरी उपमा नाहीं. त्यांनीं स्वतःच्या उन्नतीचें कार्य केलें असेल. स्वतःचा वैयक्तिक मोक्ष साधला असेल. त्यांनीं स्वतः ब्रह्मानंद चाखला असेल. हें त्यांचें वैयक्तिक माहात्म्य होतें. ह्यालाहि फारसें महत्त्व नाहीं. ध्रुवानें नाहीं का हें साधलें? त्यानें नाहीं का अढळपद मिळविलें? बाळ चिल्हयानें नाहीं का आपल्या आयुष्याचें सार्थक केलें? ही वैयक्तिक बाब आहे. ज्ञानेश्वरांची गोष्ट त्या सर्वांपेक्षां निराळी आहे. हें सोळा वर्षांचें मूल, पण सर्व जगाला थक्क करणारें असें वाङ्मय निर्माण करतें व सर्व वेदांत्यांना अचंबा वाटणारें असें तत्त्वज्ञान सांगतें आहे! सर्वच कांहीं चमत्कार वाटतो! जगाच्या निरनिराळ्या भाषांत आजवर निरनिराळें वाङ्मय लिहिलें गेलें असेल. त्यांतील कांहीं श्रेष्ठहि असेल. त्यामध्यें कित्येक गुणहि असतील. परंतु भाविक, वाङ्मयीन व आध्यात्मिक ह्या तिन्ही गुणांत ज्ञानेश्वरांनीं लिहिलेल्या ज्ञानेश्वरीच्या बरोबरीचा दुसरा ग्रंथ क्वचितच आढळेल. ज्ञानेश्वरींतील अक्षरें नादमय, शब्द अर्थमय, अर्थ वेदांतमय, वेदांत मोक्षमय असा हा ज्ञानेश्वरीचा थाट आहे. ज्ञानेश्वरीचे बाह्य गुण व आंतर गुण हे दोन्ही सारख्या तोलाचे आहेत. शब्द, अर्थ, अलंकार, लेखनरीती ह्या गोष्टी एकमेकाचें मूल्य वाढवितात. शब्दानें अर्थ वाढतो, अर्थानें अलंकार शोभतात, अलंकारानें लेखनरीतीचें सौंदर्य उठावदार दिसतें. ज्ञानेश्वरींतील शब्द तर भरघोस मोत्यांसारखे आहेत. ज्ञानेश्वर हे शब्दसृष्टीचे प्रत्यक्ष ईश्वरच होते. शब्दांतील व्यापकपण तर असाधारण होतें. त्याचा त्यांना इतका आत्मविश्वास वाटत होता कीं ते प्रतिज्ञेनें म्हणत, "पाहो तया भाव फावती गुण चिंतामणीचे." आपल्या मराठी भाषेतील लिहिण्याबद्दल त्यांना इतकी खात्री वाटत होती कीं, ते मोठ्या अभिमानानें म्हणतात, "माझा मऱ्हाठाचि बोलु कौतुकें। परि अमृतातेंहि पैजा जिंके। ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन ॥" इतका त्यांचा आत्मविश्वास दांडगा होता. अलंकाराच्या बाबत उपमा, दृष्टांत, रूपक, अर्थांतरन्यास, असे नाना प्रकार त्यांनीं अमूप वापरले आहेत. उपमा, रूपक तर नुसते सारखे झडतात. एकीपेक्षां दुसरी उपमा सरस, मागच्यापेक्षां पुढली वरचढ अशी उपमांची चढती श्रेणी आहे. हा रूपक पसंत पडत नाहीं तर हा घ्या दुसरा, त्याच्यापेक्षांहि हा तिसरा सरस घ्या, अशी रूपकांची नुसती खैरात सहज लीलेनें ज्ञानेश्वरांना करतांना पाहिलें म्हणजे अचंबा वाटतो. हा सोळा वर्षांचा मुलगा, ह्याचें ज्ञान किती विशाल, ह्याचा अनुभव किती विविध, ह्याची कल्पना किती स्वैर, ह्याची बुद्धि किती सूक्ष्म, ह्याची भावना किती हळुवार, ह्याची प्रतिभा किती दैवी!

सर्वच ह्या मुलाचें अलौकिक, सर्वच कांहीं असामान्य व अद्वितीय. ही झाली त्या ग्रंथाच्या बाह्य स्वरूपाची गोष्ट.

त्या ग्रंथाचें अंतरंग तर बाह्य रंगापेक्षां श्रेष्ठ आहे. काव्यरसाची पखरण चहूंकडे दरवळते आहे असें वाटतें. आपणा सर्वांना शृंगाररस आवडतो; आणि तें साहजिकच आहे. सर्व रसांचा राजा असें त्याला आपण म्हणतों. कुणाला करुणरस आवडतो. त्यापासूनच इतर रस उत्पन्न झाले असें कांहीं मानतात. परंतु ह्या रसराजा शृंगाराला ज्ञानेश्वराच्या शांतरसानें तेव्हांच जिंकून टाकलें आहे. "जेथ शांताचिया घरा। अद्भुत आला आहे पाहुणेरा। आणि येरांहि रसां पांतिकरा। जाहला मानु॥ देशियेचेनि नागरपणें। शांतु शृंगारातें जिणें। तरी ओंविआ होती लेणें। साहित्यासी॥" नवरसाच्या शिरीं पाय देऊन शांतिरसाला मीं मूर्धाभिषिक्त केलें आहे. मराठी भाषा हें शांतिरसाचें घर आहे. ज्ञानेश्वरीनें ब्रह्मविद्येची खाण सर्वांसाठीं उघडली असून जगाला आनंदाचें आवार केलें आहे. ज्ञानेश्वरीचें अंतरंग श्रेष्ठ का बहिरंग श्रेष्ठ हें ठरविणें कठिण आहे. "जैसे आंगाचेनि सुंदरपणें। लेणिया आंगचि होय लेणें। तेथें अळंकारिलें कवण कवणें। हें निर्वचेना॥" कोणीं कोणाला शोभा आणली हें सांगणें कठिण आहे. अंगहि सुंदर व दागिनेहि सुंदर! अंगाच्या सौंदर्यानें दागिने शोभतात व दागिन्यांच्या सौंदर्यानें अंग शोभून दिसतें हें कसें सांगायचें? एकाद्या कलाकृतींत जीवनमूल्यें आपण सध्यां हुडकतों व त्यांवरून त्या कलाकृतीचें मूल्य आपण ठरवितों. जीवनसाफल्य त्या कलाकृतीनें कितपत झालें आहे हें आपण पाहतों. ही सध्याची कलेची मूल्यमापनाची विचारसरणी आहे. परंतु जीवनमूल्यें काय किंवा जीवनसाफल्य काय, हीं बऱ्याच अंशीं भौतिक स्वरूपाचीं असतात, आत्मिक स्वरूपाचीं नसतात. ज्ञानेश्वरीची मजा अशी आहे कीं, तिच्यांत भौतिक व आत्मिक ह्या दोन्ही स्वरूपांचीं चिरंतन मूल्यें आहेत. म्हणूनच हा ग्रंथ म्हणजे महान् कलाकृति आहे; म्हणूनच हा ग्रंथ अक्षरवाङ्मय आहे.

असला हा अक्षरवाङ्मयाचा ग्रंथ सोळा वर्षांच्या वयाच्या मुलाकडून लिहिला जाणें म्हणजे त्याच्या लेखणींत काय सामर्थ्य असलें पाहिजे! त्या प्रतिभेंत किती दिव्यत्व असलें पाहिजे! हें दैवी चमत्काराशिवाय होणें शक्य नाहीं. ह्या दिव्य प्रतिभाशक्तीमुळेंच ज्ञानेश्वरांच्या अंगीं कांहीं दैवी चमत्कार भाविक भक्तांनीं चिकटवून दिले आहेत. ज्ञानेश्वरांनीं पैठणांतील एका रेड्याचे तोंडून वेद वदविले. निवृत्तिनाथ, ज्ञानदेव वगैरे भावंडें हीं मुलें ब्राह्मण—यजुर्वेदीय शाखेचीं, परंतु

ह्यांचे वडील विठ्ठलपंत ह्यांनीं प्रथम संन्यास घेऊन नंतर गुरूच्या सांगण्यावरून गृहस्थाश्रम स्वीकारला. पुनः संसार केला. तदनंतर हीं चार मुलें झालीं. आणि साहजिकच संन्याशाचीं मुलें म्हणून जातीच्या बाहेर टाकलीं गेलीं. ह्यांचे मुंज वगैरे धर्मविधि कोणी ब्राह्मण करीनात. तेव्हां त्यांनीं पैठणच्या ब्राह्मणांकडून संमति आणली. रेड्याकडून वेदमंत्राचा घोष करविलेला पाहून पैठणचे ब्राह्मण खुष झाले. ह्या संन्याशाच्या मुलाचें सामर्थ्य पाहून चकित झाले व त्यांनीं त्यांना संमतिपत्र दिलें हा एक चमत्कार; त्यांनीं एका मृत ब्राह्मणास सजीव केलें हा दुसरा चमत्कार; तसेंच आपल्या तापलेल्या पांठीवर मुक्ता-बाईकडून मांडे भाजविले हा तिसरा चमत्कार. असे किती तरी चमत्कार यांच्या संबंधीं प्रचलित आहेत. असाच दुसरा एक चमत्कार ज्ञानेश्वर व त्यांचीं भावंडें ह्यांच्याबद्दल सांगतात. एकदां चांगदेव म्हणून महायोगी त्यांना भेटावयास आला. तो योगी असल्यामुळें गळ्यांत मोठमोठे नाग, बसावयास वाघ, हातांत सापाचा चाबूक अशा थाटानें तो येत होता. आपल्या योगसामर्थ्याचा त्याला मोठा गर्व झाला होता. हीं भावंडें आळंदीस आपल्या आजोळीं एका पडक्या भिंतीजवळ खेळत होतीं. चांगदेव जसा वाघावर बसला होता तशींच हीं मुलें त्या भिंतीवर बसलीं आणि भिंतीला टांच दिली. त्याबरोबर ती पडीक भिंत आपली चालूं लागली. हळुहळू पुढें चांगदेवांकडे सरकूं लागली. चांगदेवानें तो चमत्कार पाहिला आणि आश्चर्यानें थक्क झाला. स्वतःच्या योगसामर्थ्याची त्याची धुंदी एकदम उतरली. मग त्यानें ह्या भावंडांपैकीं मुक्ताबाईचा गुरूपदेश घेतला. अशा दैवी चमत्काराच्या ज्या दंतकथा रूढ झाल्या त्या त्यांच्या दैवी प्रतिभेमुळें व अलौकिक कर्तृत्वामुळेंच होय. वैराग्य, त्याग, सात्त्विकपणा, भक्ति, ज्ञान, योग व काव्यप्रतिभा ह्या सर्व दैवी संपत्तीच्या गुणांत, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई हीं भावंडें असामान्य होतीं.

ज्या काळांत हीं भावंडें होऊन गेलीं तो काळच अद्वितीय होता. तेरावें शतक म्हणजे महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा काळ होय, व महाराष्ट्राचें सौभाग्य ह्या काळांत उदयास आलें. महाराष्ट्राचें वैभव त्या काळांत सर्वांना दिपवीत होतें. हें शतक म्हणजे महाराष्ट्रांतील 'सुवर्णयुग' होय. महाराष्ट्रांत त्या काळीं स्वराज्य होतें. यवनांचा संपर्कहि महाराष्ट्रास लागला नव्हता. देवगिरीच्या जाधवांचें राज्य महाराष्ट्रभर होतें. जाधव घराणें हें द्वारकेच्या श्रीकृष्णाच्या यादव वंशापैकीं आपणांस

मजे. जाधवांचा मूळ पुरुष दृढप्रहारी नांवाचा राजा होता. त्यानें आपलें छोटेंसें राज्य नाशिक जिल्ह्यांतील सिन्नर येथें इ. स. ७४५ मध्यें स्थापलें. पुढें त्याच्या वंशांतील भिल्लम् जाधवानें इ. स. ११८७ मध्यें देवगिरी येथें आपलें स्वतःचें निराळें असें राज्य सुरू केलें. या भिल्लमाच्या राजवंशामध्यें जैतपाळ, सिंघण, कृष्णदेव, महादेव, रामदेव असे नामांकित राजे होऊन गेले. ह्यांनीं राज्य तर चांगलें चालविलेंच; पण विद्येचाहि पुरस्कार केला. विद्वान्, ग्रंथकर्ते, कवि ह्यांना उदार आश्रय दिला. सिंघणाचा प्रधान सोढल नांवाचा काश्मिरी पंडित होता. त्याचा मुलगा 'संगीतरत्नाकरा'चा कर्ता शार्ङ्गधर. सिंघण राजानें सातारा जिल्ह्यांतील शिखर शिंगणापूर येथील शिवमंदिर बांधलें. तेथें त्याच्या राजवाड्याचे अवशेष अद्याप दाखवितात. कृष्णदेव, महादेव व रामदेव हे जाधव राजे. ह्यांनीं तीच परंपरा पुढें चालविली. त्यांत, पुनः त्यांना हेमाडपंतासारखा बुद्धिमान् प्रधान मिळाला. हेमाडपंताला श्रीकरणाधिप म्हणत. त्याच्या बुद्धिमत्तेमुळें जाधवांच्या साम्राज्याचा वचक चहूंकडे बसला. देवगिरीचें राज्य म्हणजे "त्रैलोक्यांतील संपत्तीचें विश्रांतिस्थान" ठरलें. हेमाडपंत किंवा हेमाद्रि हा नामांकित ग्रंथकारहि होता. तो व बोपदेव हे त्या काळांतील पंडित होते. हेमाडपंती देवळें, मोडी लिपि वगैरे त्याच्या आठवणी महाराष्ट्रांत अद्याप आहेत. बोपदेवाचा भागवत ग्रंथ तर प्रसिद्धच आहे. हेमाडपंताचा 'चतुर्वर्गचिंतामणि' हा व्रतवैकल्यपर व आणखी ज्योतिष-वैद्यक ह्या शास्त्रांवरील ग्रंथ उपलब्ध असून चांगल्या मोलाचे आहेत. रामदेवासारखा राजा व हेमाडपंतासारखा दिवाण मिळाल्यानंतर देशांत विद्या व धन ह्यांचें वैभव प्राप्त झालें असल्यास नवल नाहीं. रामदेवराव राजासंबंधीं खुद्द ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथांत पुढील उद्गार काढले आहेत : "तेथ यदुवंश विलासु । जो सकळकळानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्री रामचंद्र ॥ " रामदेवराव हा सकल कलांचा निवास होता. यादववंशाचा विलास होता. तो न्यायाला पोसणारा राजा होता. अशा राजाच्या आश्रयांत ज्ञानेश्वरानें लावलेला वाङ्मयाचा व वेदान्ताचा वृक्ष फोफावत जाऊन त्याचा अश्वत्थ वृक्ष झाला असल्यास काय आश्चर्य ?

रामदेवराव राजाचा आश्रय ज्ञानेश्वर वगैरे भावंडांनाच फक्त होता असें नाहीं. ह्या जाधवांच्या राजवटींत सर्व विद्वानांना व कवींना आश्रय असे. ह्या काळांत निवृत्तिनाथ, ज्ञानदेव हे जसे साधुसंत होते तसेच इतर पंथांचेसुद्धां साधुसंत पुष्कळ होते. महानुभाव पंथ हा वऱ्हाडमधील ऋद्धिपूरच्या गोविंद प्रभु ऊर्फ गुंडम्

राऊळ ह्यानें स्थापला. ह्याला चक्रधर ह्या नांवाचा एक अत्यंत प्रभावी सामर्थ्याचा शिष्य मिळाला. चक्रधर हा मूळचा भडोचचा गुजराती सामवेदी ब्राह्मण व एका प्रधानाचा मुलगा. हा एकदां यात्रेला निघाला असतांना गुंडम् रावळाची व त्याची गांठ पडली व त्यानें दीक्षा घेतली. ह्यानंतर महानुभाव पंथाचा प्रसार मोठ्या जोरानें होऊं लागला. मोटमोठे विद्वान् ब्राह्मण ह्या पंथास येऊन मिळाले. कांहीं स्त्रियाहि येऊन मिळाल्या. हे सर्व कृष्णाचे उपासक. जातिभेद, वर्णाश्रम वगैरे न मानणारे. बुद्धीनें समर्थ, प्रतिभेनें समर्थ व कर्तबगार असे हे प्रथमचे चक्रधराचे शिष्य होते. त्यामध्यें नागदेवाचार्य, भास्करकवि, केशवसूरि, दामोदर पंडित, गोपाळ पंडित वगैरे मुख्य होते. 'गुंडम् रावळाचें तप, चक्रधराची वेधशक्ति व नागदेवाचें संघटनसामर्थ्य ह्या तीन गुणांनीं महानुभाव पंथाचा प्रसार खूप होऊं लागला.' परंतु महानुभावांच्या ह्या पंथप्रसारापेक्षां त्यांनीं जें मराठी वाङ्मय त्या कालांत निर्माण केलें त्याचें महत्त्व विशेष आहे. असें कोणतेंहि शास्त्र नाहीं कीं ज्याच्यावर ह्या महानुभावी पंडितांनीं लिहिलें नाहीं. काव्य, भाषा, व्याकरण, कोष, ज्योतिष, वैद्यक वगैरे सर्व शास्त्रांवर त्यांनीं रचना केली आहे. ही महानुभावी पंडितांनीं केलेली वाङ्मयरचना व मुकुंदराज, निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर ह्या नाथपंथी संतांनीं केलेली वाङ्मयरचना पाहिली म्हणजे हें तेरावें शतक किंवा जाधव राजांची राजवट म्हणजे मराठी वाङ्मयाचा पुनरुजीवनाचा काल असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. म्हणूनच आम्हीं त्या कालाला मराठीचें 'सुवर्णयुग' असें म्हटलें आहे.

आणखीहि एका दृष्टीनें हें सुवर्णयुग ठरतें. नाथपंथी संत व महानुभावपंथी संत ह्यांनीं केलेली कामगिरी सांगितली. परंतु ह्या दोन्ही पंथांपेक्षां त्या कालांतील तिसऱ्या एका पंथांतील साधुसंतांनीं केलेली कामगिरी विशेष उल्लेखनीय आहे. हा पंथ म्हणजे नारायणपंथ होय. हाच पुढें वारकरी पंथ म्हणून प्रसिद्धीस आला. हाच भक्तिसंप्रदाय होय. ह्या पंथाचें मुख्य दैवत पंढरपूरचा विठ्ठल हें होय. ह्या पंथांतील साधुसंतांनीं तेराव्या शतकांत इतकी धर्मजागृति केली कीं महाराष्ट्रांतील सर्व लोकांत भक्तीची स्फूर्ति झाली. भक्तीची लाट समाजांतील खालच्या थरापर्यंत जाऊन पोहोंचली. सर्व कुटुंबच्या कुटुंब, सर्व जाति, भक्तिभावनेनें व काव्यस्फूर्तीनें स्फुरल्या. त्यांत ब्राह्मण, मराठे, शिंपी, कुंभार, माळी, न्हावी, वेश्या, महार, मुसलमानसुद्धां संत-मंडळींत येऊन बसले. अशी कोणती जात राहिली नाहीं कीं जिच्यांत कोणी साधुसंत झाला नाहीं, किंवा ज्यानें कांहीं काव्यरचना केली नाहीं. कान्हु पाठक, नामा शिंपी,

गोरा कुंभार, सेना न्हावी, सांवता माळी, बंका महार, चोखा मेळा, कान्होपात्रा, जगमित्र नागा, नरहरि सोनार, जोगा परमानंद वगैरे सर्व जातींतील साधुसंत होते. ह्यांत जनाबाई, गोणाई, राजाई, साखराई वगैरे स्त्रियाहि होत्या. नाथपंथाचे निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताबाई हेहि त्यांत मिळाले. हा सर्व त्या काळांतील संतमेळा होय. ह्या सर्व संतमेळ्यानें विठ्ठलनामाचा गजर जो केला तो महाराष्ट्रांतील कानाकोपऱ्यांत दुमदुमत राहिला. सबंध महाराष्ट्र ह्या संतमेळ्यानें आपल्या अभंगवाणीनें जागें केलें. भक्तीचा व वाङ्मयाचा मोठा 'गदारोळ' महाराष्ट्रांत उडवून दिला. म्हणूनच ज्ञानेश्वरकालाला आम्ही मराठी भाषेचें व मराठी वाङ्मयाचें 'सुवर्णयुग' असें म्हणतों.

तेराव्या शतकांतील नाथ, नारायण व महानुभाव ह्या तीन पंथांतील साधुसंतांचें वाङ्मयीन कार्य हें अशा स्वरूपाचें आहे. ह्या सर्वांत श्रेष्ठ ज्ञानेश्वर होत. ज्ञानेश्वरांनीं ग्रंथनिर्मितीहि पुष्कळ केली. गीतेवरील टीका म्हणजे त्यांची ज्ञानेश्वरी, किंवा ज्ञानदेवी. हिलाच भावार्थदीपिका असें म्हणतात. हाच त्यांचा मुख्य ग्रंथ. ह्याचें महत्त्व आम्हीं आरंभींच सांगितलें. हा ग्रंथ मराठी भाषेला भूषणभूत होईल. आपल्या गुरूबद्दल म्हणजे ज्येष्ठ बंधु निवृत्तिनाथाबद्दल किती प्रेमाचे, आदराचे व विनयाचे उद्गार काढले आहेत ज्ञानदेवानें ! श्रोत्यांची किती विनवणी केली आहे ! हा ग्रंथ अहमदनगर जिल्ह्यांतील नेवासें या गांवीं लिहिला. ज्ञानेश्वर सांगत असत— त्यांचे शिष्य सच्चिदानंद बोवा हे महालसेच्या देवळांतील खांबाला टेकून लिहीत असत व श्रोते मंडळी ऐकत असत. हा ज्ञानेश्वरीचा खांब अद्यापि नेवासें येथें दाखवितात. श्रोते मंडळींत त्यांचे गुरु निवृत्तिनाथहि असत. ज्ञानेश्वरांची आपल्या गुरूबद्दलची भावना इतकी उच्च होती कीं, आपला ज्ञानेश्वरी ग्रंथ हा निवृत्तिनाथांच्या कृपेमुळें निर्माण झाला—त्यांच्या शांतिरसाचा वर्षाव तो हा ग्रंथ असें ते मानीत. ते म्हणतात : "मग आर्तांचेनि वोरसें । गीतार्थ ग्रथन मिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथ ॥ (१८.१७६२). हा सर्व ग्रंथ ऐकल्यानंतर निवृत्तिनाथ ज्ञानेश्वरांना म्हणाले कीं, "तूं भाष्यानुसार गीतेवर टीका लिहिलीस; पण धन्य मुकुंदराज कीं ज्यांनीं विवेकसिंधुसारखा ग्रंथ स्वमतीनें लिहिला." ह्यावर "आपली आज्ञा असेल तर मीहि असा स्वतंत्र ग्रंथ लिहीन," असें म्हणून ज्ञानेश्वरांनीं 'अमृतानुभव' लिहिला, अशी एक आख्यायिका आहे. 'अमृतानुभव' हा ज्ञानेश्वरांचा दुसरा ग्रंथ. हा अगदीं स्वतंत्र आहे. ह्यांत त्यांनीं आपल्या अनुभवाचें

अमृत ओतलें आहे. हा अमृतासारखा गोड आहे. ह्यांत अमृतत्वाचा अनुभव आहे. ह्यांतील तत्त्वज्ञान व वेदान्त इतका उच्च आहे कीं, तेथें शब्द मौनावतात. "बोल निमे तें तें बोलणें । येथींचें ॥" असें ते स्वतःच म्हणतात. येथें भाषा कुंठित होते. ह्या ग्रंथाला दोन भाग, दहा प्रकरणें असून एकंदर ओवी-संख्या दीड हजारांवर आहे. ज्ञानेश्वरीच्या मानानें हा ग्रंथ लहान आहे. ज्ञानेश्वरींत काव्य अधिक आहे, व वेदान्त गीतेंतील आहे. ह्या ग्रंथांत तत्त्वज्ञान अधिक आहे व तें स्वतंत्र आहे. ह्यांतील शिवशक्तीची एकरूपता, शब्दमंडन, शब्दखंडन, मायेचा निरास, शेवटीं ज्ञानाचाहि निरास, जग हें चिद्विलास आहे, व आम्ही ज्ञान व अज्ञान यांच्यापलीकडचे आहोंत, हे सर्व विषय अध्यात्म विद्येचे असल्यामुळें चांगल्या पंडितालासुद्धां सहज समजायचे नाहींत. ते सामान्य लोकांना कसे सहज समजणार ! म्हणून हा ग्रंथ सामान्य लोकांना कठिण व नीरस वाटतो. ज्ञानेश्वरीइतका हा ग्रंथ लोकप्रिय नाहीं.

ज्ञानेश्वरांचे निश्चित असे हे दोन ग्रंथ होत. एक ज्ञानेश्वरी व दुसरा अमृतानुभव. ज्ञानेश्वरीलाच ज्ञानदेवी किंवा भावार्थदीपिका म्हणतात. ह्या दोन ग्रंथांखेरीज चांगदेव पासष्टी, स्वात्मपत्र हे आणखी दोन ग्रंथ त्यांच्या नांवावर मोडतात. ज्ञानेश्वरांनीं 'योगवासिष्ठटीका' लिहिल्याचें नामदेव सांगतो. ह्याशिवाय ज्ञानदेवांचे हरिपाठाचे अभंग व इतर सुमारें आठशें अभंग व पदें आहेत. ज्ञानेश्वरीची भाषा जुनी व प्राचीन वाटते. अभंगांची भाषा अर्वाचीन वाटते. त्यामुळें अभंग ज्ञानेश्वरांचे नसावेत असें एक मत विद्वानांमध्यें प्रचलित आहे.

ह्या कालांतील वाङ्मयावरून तत्कालीन सामाजिक परिस्थितीची चांगली कल्पना येते. सामाजिक, धार्मिक, राजकीय अशा निरनिराळ्या परिस्थितीसंबंधीं उल्लेख पुष्कळ ठिकाणीं विखुरलेले आहेत. त्यावरून सातशें वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्रीय समाजाचें चित्र चांगलें काढतां येतें. ज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानेश्वरींत वापरलेल्या उपमा-दृष्टांतांवरून निरनिराळ्या क्षेत्रांतील माहिती मिळते. शहरें व खेडीं येथील समाजरचना, लोकांचे व्यवहार, व्यापार, उद्योगधंदे, शेती, आरोग्य, कुटुंबराहणी वगैरे गोष्टींवर त्यानें चांगला प्रकाश पडतो. राजा धर्माप्रमाणें व न्यायनीतीप्रमाणें राज्य करी. प्रजाहि राजावर देवतेप्रमाणें प्रेम करी. प्रजा आपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें वागे. जातिभेद पाळले जात. कुटुंबव्यवस्थेंत प्रेमळपणा व वात्सल्य असे. राजाराजांत युद्धेंहि होत. ते एकमेकाला जिंकीत. रणभेरी, डंका, भोंगळ, भांदळ,

काहळा हीं रणवाद्यें त्या काळीं वापरीत. कट्यार, कांबी हीं हत्यारें होतीं. लोक द्वंद्वें व कुस्ती खेळत. सैन्य चार प्रकारचें असे. युद्धांत जैत (जय) व हारी (पराजय) हे यायचेच. युद्धांत पाठ दाखविण्याची चीड येई. नगरांत व खेड्यांत घरें चांगलीं बांधीत. घरांना धुराडीं व खिडक्या असत. मालासाठीं वखारी असत. शहरांत मोतीचौक असे. सोनें, रुपें, मोतीं, रत्नें ह्यांचीं दुकानें असत. सोन्याचा भाव पंधरा रुपयांपर्यंत असे. सोन्याला शब्दच 'पंधरें' हा वापरीत. टांकसाळी होत्या. नाण्यांचे आकार वेगळाले, पण कस एकच असे. खोटीं नाणींहि पाडणारे कांहीं ठक होते. अंगावर निरनिराळे दागिने घालीत. मुद्, नथ, एकावली, भोंवरी, बुगडी, कडियाळी वगैरे दागिने स्त्रिया घालीत. कापडांचे प्रकारहि पुष्कळ वापरीत असत. लोंव्र, पांघरायच्या सोनसळ्या, शेले, शालू, पीतांबर, दुबंधी, धोतरें, लुगडीं, चोळ्या, तंतुपट वगैरे वापरीत. लाकडाचीं बाहुलीं, साइखेडी, चित्रींचे सिंह, चित्रांचीं फळें, झळाळीचीं चित्रीव फळें हे शोभेचे जिन्नस होते. लोकांच्या खाण्यांत तांदूळ व पीठ असे. पिठाचा विकरा होई. घरांत दिवे, ठाणवया व टवळे ह्यांत लावीत. माल कांटाळ्यावर तोलून देत. कर्ज देणें-घेणें चाले. नट, नाच, बहुरूपी, कळसूत्री हे करमणुकीचे प्रकार होते. बागाईत शेती चांगली करीत. वडप (वृष्टि) ची वाट पाहत. रोगावर नाना प्रकारचे उपाय करीत. पंचाक्षरी, मांत्रिक, खंडोबाचे वाघे, देवलसे भगत, सापाचे गारुडी, कोल्हाटी, भाट वगैरे भिक्षा मागत हिंडत असत. भुताखेतांवर विश्वास असे. लग्नसमारंभ मोठ्या थाटानें होई. वऱ्हाडी येत. केळवणें होत. परगुणें (पाहुणचार) करीत. नांव घेणें, उखाणे घालणें, अहेर करणें, धेंडा नाचणें हे चालत. नवऱ्यामुलामुलींना खांद्यावर घेऊन नाचत. खाण्याचे पदार्थ तर पुष्कळ प्रकारचे होते. मांडे, अंबवडा, कुरवडा, सांडई, शेवा, शिखरणीचे वडे, इडरी, नारिखा, मालत्तिया (खीर), उपेणी, भर्जीठके (भजीं) वगैरे पुष्कळ प्रकार करीत.

सातशें वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्रीय समाजाचें थोडक्यांत वर्णन दिलें आहे. ज्ञानेश्वराचे ग्रंथ म्हणजे खाणी आहेत. त्यांतून अनेक अमोल रत्नें बाहेर पडतात. असें हें काव्याचें, ज्ञानाचें व वेदान्ताचें भांडार ज्ञानेश्वरांनीं उघडलें. लोकांना काव्य तर दिलेंच, पण त्याबरोबर ज्ञानहि दिलें. परब्रह्मसुख दिलें. काव्यानंद व ब्रह्मानंद असे दोन्ही दिले. भाग्य मराठी भाषेचें कीं त्या भाषेच्या आरंभाच्या काळांत ज्ञानेश्वरासारखा प्रतिभावंत व प्रज्ञावंत अवतारी साधुसंत मिळाला. ज्ञानेश्वरीसारखें

सामर्थ्याचें अधिष्ठान मराठी वाङ्मयास मिळालें. ह्यामुळेंच पुढचें वाङ्मयहि तेजस्वी झालें. सर्व जगांतल्या वाङ्मयांत अत्यंत प्रासादिक व रसाळ ठरणारा ज्ञानेश्वरी हा ग्रंथ एकदां तरी वाचा. वेळ नसेल तर कलश अध्याय अठरावा अध्याय तरी वाचा. तितकाहि वेळ नसेल तर एखादा लहान पंधरावा निदान अकरावा अध्याय वाचा. तेंहि नाहीं साधलें तर अध्यायाच्या आरंभींचें नमन तरी वाचा. म्हणजे त्यांत काय मजा आहे ती कळेल. संसारांतील तापानें गांजलेल्या मनाला समाधान मिळेल, जीवनांतील शांति मिळेल. परब्रह्माची अंधुक कां होईना, पण कल्पना येईल.

# ४. बाळशास्त्री जांभेकर व अव्वल इंग्रजी काल

परवां २७ मे शुक्रवारीं श्री. बाळशास्त्री जांभेकर ह्यांची शंभरावी श्राद्धतिथि मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत साजरी करण्यांत आली. अध्यक्षस्थानीं मुंबई इलाख्याचे मुख्य प्रधान श्री. बाळ गंगाधर खेर हे होते. समारंभांत सहकार करणाऱ्या संस्थांत पत्रकारसंघ ह्या संस्थेचा प्रामुख्यानें उल्लेख करावयास हवा. त्याच दिवशीं व त्या दिवसानंतरच्या आठवड्यांत प्रसिद्ध झालेल्या मराठी दैनिक व साप्ताहिक वर्तमानपत्रांत श्री. बाळशास्त्री ह्यांचें व्यक्तिमत्त्व व कार्यमत्त्व ह्यांचा आढावा घेणारे लेख प्रसिद्ध झाले. मासिकांतहि त्यांचे समालोचनात्मक व परिचयात्मक लेख प्रसिद्ध होतील. सर्व पत्रपंडितांना पत्रकारपरिषदेचा तसा आदेशच होता. त्या आदेशानुसार हें सर्व झालें व ह्या सर्वांनीं एक गोष्ट चांगली झाली. आणि ती म्हणजे, महाराष्ट्रांतील ह्या आद्यपत्रपंडिताचें नांव सर्वसामान्य लोकांना समजलें; त्यांनीं केलेल्या कार्याचें महत्त्व त्यांना कळून आलें; त्यांच्या अचाट बुद्धिमत्त्वाची कल्पना त्यांना आली; अव्वल इंग्रजींतील अगदीं पहिल्या पिढींतील एका कार्यवंताची व विद्यावंताची कर्तबगारी कळून आली.

अव्वल इंग्रजींतील काळ हा परवां परवांपर्यंत बराचसा अज्ञात होता. गेल्या दहापंधरा वर्षांत ह्या काळासंबंधीं थोडीशी माहिती उपलब्ध झाली आहे. हा राज्यक्रांतीचा काळ तर होताच, पण मराठ्यांचें राज्य गेलें व इंग्रजांचें राज्य आलें. ह्या राज्यक्रांतीबरोबर विचारक्रांति झाली, आणि ती फार जबरी झाली. महाराष्ट्रांत आजवर पुष्कळ राजवटी बदलल्या; परंतु त्याबरोबर समाजांतील जाणकारांच्या विचारवटी इतक्या बदलल्या नाहींत. राष्ट्रकूट, चालुक्य, शिलाहार, जाधव ह्यांच्या राजवटी आल्या, गेल्या. त्यांनीं महाराष्ट्रांतील राजकारण मुळासकट उचमळून काढलें असेल. परंतु त्यानें विचारसरणींत कांहींच फरक पडला नाहीं. मुसलमानी रियासती आल्या. त्यानें विचारसरणींत कांहीं थोडासा फरक पडला. कांहीं धार्मिक उच्छेद झाले; कांहीं धर्मांतरें झालीं; कांहीं आचारविचारांची देवघेव झाली; भिन्न भिन्न संस्कृतींच्या मिलाफाचे जे परिणाम साधारणपणें होतात तेहि झाले; परंतु ही सर्व प्रक्रिया आत्मसात्करणाची ठरली. सर्व परकी महमदी विचारसरणी पचनीं पाडून तिचेंच हिंदवीकरण किंवा महाराष्ट्रीकरण झालें; त्यामुळें आजवरच्या सर्व राज्यक्रांत्या महाराष्ट्रास विचारसरणीच्या दृष्टीनें भोंवल्या नाहींत; ह्या राज्यक्रांतीच्या वेळीं

महाराष्ट्राचें महाराष्ट्रपण नाहींसें झालें नाहीं. ह्या क्रांतीच्या उच्छेदामुळें हें महाराष्ट्रपण लव्हाळ्यासारखें नमलें असेल; पण तें मोडलें नाहीं; नाहींसें होण्याची गोष्ट तर दूरच! परंतु ह्या इंग्रजी राजवटीमुळें जी राज्यक्रांति झाली व तिच्या अनुषंगानें जी विचारक्रांति झाली, ती त्वरित झाली. इतकी त्वरित कीं तिचें स्वरूप आकलण्यासहि वेळ मिळाला नाहीं. अव्वल इंग्रजींत चांगल्या चांगल्या विचारवंतांनासुद्धां दिङ्मोह झाल्याचा देखावा दृष्टीस पडतो. त्याचें कारण हें होय. इंग्रजांनीं देशाचें आक्रमण केलें, आमच्या लोकांना कांहीं वाटलें नाहीं. इंग्रजांनीं सत्तेचें आक्रमण केलें, त्यांतहि आमच्या लोकांना विशेष वाटलें नाहीं. परंतु इंग्रजांनीं आमच्या संस्कृतीचें आक्रमण केलें, ह्यानें मात्र आमचे लोक दिङ्मूढ झाले. त्यांची विचारशक्ति पंगू झाली व पिंजऱ्यांत जिथल्या तिथेंच फडफडूं लागली.

अशा ह्या संस्कृति-आक्रमणाच्या कालखंडांत बाळशास्त्री जांभेकर हे होऊन गेले. सदाशिव बापूशास्त्री छत्रे, हरि केशवजी, मोरभट दांडेकर, जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बापूशास्त्री शुक्ल, गंगाधरशास्त्री फडके, माडगांवकर, दादोबा पांडुरंग ही सर्व मंडळी त्याच पहिल्या पिढींतील होय. हे सर्व त्याच कालखंडांत उदयास आले. हे सर्व बुद्धिमान् खरे; परंतु परक्या संस्कृतीच्या आक्रमणाच्या दडपणाखालीं रुतून गेल्यामुळें त्यांच्या बुद्धींतील तेजस्वीपणा दिसून आला नाहीं. हें दडपणाचें ओझें कमी होण्यास व महाराष्ट्रीय बुद्धिमत्तेच्या विकासास पूर्ण वाव मिळण्यास पुढें पन्नास वर्षांचा काळ जावा लागला. हीनगंडाचें हें ग्रहण अर्धशतक टिकलें.

नाहीं तर हें कोडें उलगडतच नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभाच्या सुमारास असे दोन परस्परविरुद्ध देखावे दिसतात कीं, त्यांच्या कार्यकारणभावाचा नीट उलगडाच होत नाहीं. प्रतिपक्षाशीं प्रत्यक्ष युद्ध खेळण्याच्या बाबतींत यशवंतराव होळकरासारखा धडाडीचा व मॉन्सनसाहेबाला, मध्य हिंदुस्थानांत पीछेहाट करावयास लावणारा सेनापति त्याच काळांत उत्पन्न व्हावा; बापू गोखल्यासारखा कोरेगांवांत स्टीव्हन्सनला आख्खी रात्र कोंडून ठेवणारा शूर सेनानी त्याच काळांत निर्माण व्हावा; स्वराज्याच्या हमराहीच्या आड येणाऱ्या गंगाधरशास्त्र्याला मारणारा त्रिंबकजी डेंगळे त्याच काळांत निपजावा; इंग्रजाच्या सैन्याची दमछाट करणारा चतुरसिंग भोसल्यासारखा चतुर लढवय्या त्याच काळांत असावा; प्रतापसिंहासारखा धर्मानें, नेकीनें, हुशारीनें व दक्षतेनें राज्य हाकणारा छत्रपति त्याच काळांत निर्माण व्हावा; हा सर्व उज्ज्वल देखावा एका बाजूला आणि लगत त्याच्या दुसऱ्या बाजूला

बाजीरावासारखे नादान, दौलतरावासारखे धुंद, सर्जेराव घाटग्यासारखे आगेवेताळ, गंगाधरशास्त्र्यासारखे लाळघोटे, बाळाजीपंत नातूसारखे बेइमानी, व आप्पासाहेब भोसल्यासारखे स्वकुलकलंक पुरुष निर्माण व्हावे, हा देखावा दुसऱ्या बाजूला! एकाच काळीं, एकाच देशभूच्या कुशींतून माणुसकीच्या अशा भिन्न स्वभावाच्या प्रतिमा कां निर्माण व्हाव्या, हें कोडें नीट स्पष्ट रीतीनें सुटत नाहीं. ही झाली राजकारणांतील गोष्ट.

वाङ्मयांतहि तीच गोष्ट प्रत्ययास येते. तेथेंहि तस्सेंच कोडें पडतें. युद्धकारणांत ज्याप्रमाणें सेनानीचें, राजकारणांत ज्याप्रमाणें मुत्सद्द्यांचें, महाराष्ट्रीयत्व नाहीसें झालेलें दिसतें, त्याप्रमाणें वाङ्मयकारणांत प्रतिभावंतांचें व प्रज्ञावंतांचें महाराष्ट्रीयत्वच नाहींसें झालेलें दिसतें. महाराष्ट्रीय वृत्ति पार सर्व क्षेत्रांतून लोपून गेली. सर्वांना तिचा विसरच पडला. नाहीं तर त्याच एका काळांत रामजोश्यासारख्यानें अस्सल मराठा बाण्याचें कवन गावें, होनाजी बाळा, सगनभाऊ, कादर बुढण, गंगु हैबती, अनंत फंदी, बचु फंदी ह्यांच्यासारख्यांनीं अस्सल मराटमोळ गाणें म्हणावें; मल्हार रामराव चिटणीस, सोहोनी, कृष्णाजी शामराव, रघुनाथ यादव ह्या गद्यसूरींनीं मराठा छत्रपति व त्यांचे कर्तबगार पेशवे, हरिवंश, भाऊसाहेब ह्यांच्यासारख्या शूरांचे पराक्रम अस्सल मराठा बाण्यानें व आत्मीयतेनें वर्णन करावें, असा हा देखावा एका बाजूला दिसतो व त्याच्याच दुसऱ्या बाजूला काय विपरीत देखावा दिसतो! कांहीं थोडीं वर्षेंच जाण्याचा अवकाश, तो अस्सल मराठी बाणा गेला; तें मराटमोळ स्वरूप गेलें; तें आत्मीयत्व गेलें! कृतीचा पराक्रम तर पूर्वींच गेला होता; पण शब्दाचा पराक्रमहि नाहींसा झाला. भोसल्यांच्या दरबारीं राजकारण खेळवणाऱ्या वेणीराम पंडितांच्या सांनिध्यांत राहणारा वैजनाथ पंडित कोठें पंचतंत्राचें भाषांतर करतो; तर कोठें 'सेंट मॅथ्यू' ह्या बायबलच्या भागाचा तर्जुमा करण्यांत केरीला मदत करतो; तर दुसरा कोणी एखादा पंडित मराठी भाषेचें व्याकरण व कोश तयार करतो; तर तिसरा कोणी शास्त्री एखादें पाक्षिक, साप्ताहिक किंवा मासिक काढतो; तर इतर कांहीं विद्वान् मंडळी पाठशाळा, शिक्षामंडळी, हैंदशाळा, पुस्तक मंडळीसारख्या संस्था स्थापन करतात; तर पांचवा कोणी लेखक इसापनीति, बालमित्र, इंग्लंड देशाचा इतिहास वगैरे शालेय पुस्तकांचीं भाषांतरें करण्यांत कृतकृत्यता मानतो. असा हा दुसऱ्या बाजूचा देखावा आहे. ह्या भाषिक व वाङ्मयीन प्रयत्नांचें मोल मराठी भाषेच्या दृष्टीनें आम्ही कमी समजतों अशांतला भाग नाहीं. आद्य मराठी प्रयत्न म्हणून ते मोलाचे आहेत हें खरें; परंतु एकंदर

राष्ट्रीय महात्मतेच्या दृष्टीनें ह्याचें मोल तोलायला नको का ? महाराष्ट्राच्या कर्तबगारीच्या एकंदर आलेखांत ह्या अव्वल आंग्लकालीन प्रयत्नांचें स्थान कोणतें व कोठें बरोबर बसतें, हें पाहायला नको का ? मी म्हणतों त्या स्वराज्यस्थापनेच्या संस्था जाऊं द्यात; त्या साम्राज्यविकासाच्या संस्था जाऊं द्यात; रोहिडेश्वरासमोरच्या स्वराज्याच्या शपथा जुन्या म्हणून सोडून द्या; जिंजीवासांतील एकीकरणाच्या आणाभाका जुन्या म्हणून सोडून द्या; पानिपतच्या कैचीच्या रणांगणावरील बेलभंडार जुना म्हणून सोडून द्या; हे सर्व जुने प्रयत्न म्हणून सोडले तरी चालेल, पण वसईच्या तैनाती फौजेच्या विरोधाचे प्रयत्न तर ह्या काळांतीलच ना ? प्रतापसिंहाचे स्वराज्यासाठीं उठावणीचे प्रयत्न ह्या काळांतीलच ना ? यशवंतराव शिर्के व रंगो बापूजी ह्यांचे स्वराज्यासंबंधीं पार्लमेंटकडे दाद मागण्याचे प्रयत्न ह्याच काळांतील ना ? इसवी सन १८०० ते १८३० ह्या कालखंडांतील महाराष्ट्रांतील एकंदर परिस्थितीचें चित्र डोळ्यांसमोर उभें केलें म्हणजे त्या चित्रांत हे कोशव्याकरणरचनेचे प्रयत्न, हीं इसापनीति-शुकबहात्तरीचीं भाषांतरें, ह्या हैंद पुस्तकमंडळी, नेटिव्ह शिक्षण मंडळी संस्था ह्या सर्व बाबी फार फिक्या दिसतात; हे सर्व तेजोविहीन प्रयत्न दिसतात. ह्या अशा तेजोविहीनकाळांतच जांभेकर होऊन गेले.

हे प्रयत्न असे तेजोविहीन कां झाले ? अशी कोणती किमया झाली कीं तिनें ह्या बुद्धिमान् महाराष्ट्रीयांचें सर्व तेज लोपून जावें किंवा त्यांची प्रभा नाहींशी व्हावी ? त्यांना भुरळ पडली खरी. इंग्रजांचें सर्वच कांहीं चांगलें, त्यांचें युद्धशास्त्र चांगलें, त्यांचीं शस्त्रास्त्रें चांगलीं, त्यांचें राज्यकारण चांगलें, त्यांचें राज्य चांगलें, त्यांचा न्याय चांगला, त्यांचें शिक्षण चांगलें, त्यांचा धर्म चांगला, त्यांच्या चालीरीती चांगल्या, असा त्यांच्या चांगुलपणाचा वचक जिकडे तिकडे बसला. त्यांचें सर्व चांगलें ठरल्यानंतर ओघानेंच आपलें सर्व वाईट ठरावें, ह्यांत नवल नाहीं. असा एक प्रकारचा हीनगंड उत्पन्न झाला. एक प्रकारच्या पराभूत वृत्तीनें सर्वांना पछाडलें.

त्यांत आणखी एका गोष्टीची भर पडली. इंग्रजांनीं मराठ्यांचा देश पादाक्रांत केला, त्यांची सत्ता आत्मसात् केली. पण ह्याबरोबर महाराष्ट्रीय संस्कृतीवरहि आक्रमण केलें व तें पद्धतशीर योजनेनुसार केलें. हें करण्यास इंग्रजांकडे एकापेक्षां एक सरस अशीं माणसें होतीं. मालकम, एलफिन्स्टन पुण्या-मुंबईकडे, जेन्किन्स नागपूरकडे व कर्कपॅट्रिक हैदराबादकडे, एकापेक्षां एक वरचढ, कर्तबगारच काय पण कर्दनकाळ आणि आक्रमक असे होते. त्यांनीं सर्व राष्ट्र चहूंबाजूंनीं चांगलें पोखरून

ाढलें, व आपल्या आंग्ल आक्रमणाला भूमि भुसभुशीत करून सोडली. हे सारे योद्धे र होतेच, मुत्सद्दी तर होतेच, परंतु चांगले संस्कृतिसंपन्न, विद्यासंपन्न असे होते. ांत पुन्हा कार्नॅक, ग्रँट, मेकॉले ह्यांचें साह्य त्यांना मिळालें. ह्या सर्वांनीं व इतर कांहीं मेशनऱ्यांनीं महाराष्ट्रीय संस्कृतीवर आक्रमण करण्याची योजना केली, शिक्षणाच्या ोजना तयार केल्या, पाठशाळा काढल्या, पुस्तकांचीं भाषांतरें करविलीं, मोठमोठे ंड उभारले, बक्षिसें जाहीर केलीं, महाराष्ट्रांतील बुद्धिमान् लोकांचीं मनें वश करून ह्या ार्यास लावलीं. प्रथम प्रथम कांहीं दिवस संस्कृत व देशी विद्येचा पुरस्कार ाला. परंतु हा देखावा थोडेच दिवस टिकला. संस्कृत विद्या मागें सरली, देशी ेद्या मागें सरली व तिच्या ठिकाणीं आंग्ल विद्या जी अधिष्ठित झाली ती अद्याप-र्यंत तशीच प्रामुख्यानें अधिष्ठित अशीच आहे. ह्या सामाजिक प्रक्रियेच्या आरंभाच्या काळांत जी मंडळी सांपडली, त्यामध्यें बाळशास्त्री जांभेकर हे होते.

ह्या आरंभाच्या पिढीच्या उद्योगांत जो कमीपणा दिसतो, त्याबद्दल त्यांना दोष ेतां येत नाहीं. त्या मंडळींना दोन गोष्टी करावयाच्या होत्या. आपली स्वतःची ्तद्देशीय संस्कृति टिकवायची होती, ही पहिली गोष्ट. आणि पाश्चात्य आंग्ल संस्कृति आत्मसात् करायची होती, ही दुसरी गोष्ट. असा हा दोन संस्कृतींचा झगडा होता. ह्या संघर्षामध्यें त्यांची बुद्धिमत्ता वेंचली गेली. राज्यसत्ता गेल्यानंतर संस्कृतिसंरक्षण हें एकच कार्य राष्ट्रांतील बुद्धिमंतांना उरतें व तें काम परकी सत्तेची मर्जी सांभाळून करावयाचें असतें. इंग्रजी सत्ता आल्यानंतर आंग्ल संस्कृति-प्रसाराचे जेवढे म्हणून मार्ग राज्यकर्त्यांनीं सुलभ करून दिले, त्या सर्वांचें आपल्या परिस्थित्यनुसार अवलंबन करायचें ह्या मंडळीनें ठरविलें. शिक्षणप्रसार, पुस्तक-प्रकाशन, अध्ययन, वर्तमानपत्रप्रकाशन, संस्थास्थापना, समाजसुधारणा इत्यादि लोकशिक्षणाचे सर्व मार्ग त्यांनीं अनुसरायचें ठरविलें. ह्या मंडळींत अग्रेसरत्वाचा मान छत्रे, क्रमवंत, शुक्ल ह्यांच्याबरोबर बाळशास्त्री जांभेकर यांच्याकडे जातो. ह्या अग्रेसर मंडळींत कांहीं मंडळी जुन्या पेशवाईत गृहस्थी वळणाची होती, कांहीं जुन्या शास्त्री वळणाची होती, तर इतर कांहीं इंग्रजी नव्या वळणाची होती. कांहींत तर हीं सर्व वळणें एकत्र झालीं होतीं. कांहीं कांहीं कोडीं जीं उलगडत नाहींत तीं ह्या निरनिराळ्या वळणांच्या संमिश्रणामुळेंच होय. दिङ्मोह झाल्याचा जो देखावा दिसतो तो ह्यामुळेंच !

अशा ह्या कालांत पोंभुर्ल्याच्या जांभेकर घराण्यांतील हा बाळ मुलगा कोंकणांतून

मुंबईंत आला. घरीं कोंकणांत असतांना वडिलांच्या सांनिध्यांत संस्कृत अध्ययन जें झालें, तेवढें घेऊन हा बुद्धिमान् बाळ मुंबईत बापू छत्रे ह्यांच्या सांनिध्यांत पांच-सहा वर्षे राहिला. नवीन पाश्चात्य विद्याहि ह्या मुलानें आत्मसात् केली. अगोदरच तीव्र बुद्धि—इतकी तीव्र कीं, त्याचे गुरुजी व सहाध्यायी त्याला 'बृहस्पति' असें म्हणत. तेव्हां ह्या बृहस्पतीला नवी विद्या घेण्यास वेळ कितीसा लागणार? त्यांत पुन्हा छत्रे, क्रमवंत ह्यांच्यासारख्यांचा पुरस्कार आणि आश्रय मिळाल्यामुळें नव्या विद्येची साधना फार लवकर झाली. मुंबईंत हा मुलगा आला, त्या वेळीं चौदा वर्षांचा असावा व पुढें पांचसहा वर्षांत, म्हणजे वयाच्या विसाव्या वर्षी, सध्यांच्या पदवीधराइतकी तयारी त्याची झाली. विशेषतः भाषा, इतिहास, गणित व इतर भौतिक शास्त्रें इत्यादि विषयांत ह्या मुलाची प्रगति त्या काळच्या साधनांप्रमाणें चांगली समाधानकारक अशी झाली. बाळ ह्या मुलाचा जन्म १८१० सालचा, मुंबईंत त्याचें आगमन १८२४ च्या सुमारास आणि शिक्षणाची समाप्ति साधारणपणें १८३० च्या सुमारास, असा स्थूल आराखडा आहे. जन्माचें साल १८१० नसून तीन वर्षे पुढें म्हणजे १८१३ आहे, असा कांहींचा शोध आहे. बाळचें शिक्षण मात्र १८३० मध्यें संपलें.

शिक्षण संपल्यानंतर बाळशास्त्री ह्यांची नेमणूक नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचे सेक्रेटरी म्हणून झाली व तेथून त्यांच्या सार्वजनिक कार्यास आरंभ झाला. ह्यांतच त्यांची नोकरी येते, त्यांचा वृत्तपत्रव्यवसाय येतो व त्यांचें ग्रंथलेखनहि येतें. ते अध्यापक असतांना त्यांना शिष्यहि चांगले मिळाले. डॉ. भाऊ दाजी, नारायण दाजी, रा. ब. केरो नाना छत्रे व हिंदुस्थानचे आद्य राजकारणी महर्षि दादाभाई नौरोजी ही मंडळी त्यांना शिष्य म्हणून लाभली. ह्यांतील प्रत्येकाला आपल्या गुरूबद्दल पराकाष्ठेची पूज्यबुद्धि होती. दादाभाईंनीं तर आपला पूज्यभाव मोठ्या कृतज्ञतापूर्वक प्रकट केला आहे. "भाषा, इतिहास, तत्त्वज्ञान इत्यादि विषय शिकवितांना त्यांचें अफाट ज्ञान प्रकट होई व शिकणाऱ्याच्या मनावर फार चांगला ठसा उमटे," असे उद्गार रा. ब. मोरो नानाजी हे काढतात. त्यांच्या अध्यापन-कौशल्यामुळेंच प्रो. ऑर्लिबार ह्यांनीं एल्फिन्स्टन संस्थेंत त्यांना दुय्यम प्रोफेसर नेमण्याबद्दल त्यांची शिफारस केली व त्यांना आपल्या हाताखालीं नेमून घेतलें (१८३४). पुढें ते रजेवर गेल्यानंतर त्यांना मुख्य प्रोफेसर म्हणून नेमलें (१८४२). एल्फिन्स्टन कॉलेजमधील नेमणुकीच्या पूर्वी एक दोन वर्षे ते अक्कलकोटच्या

युवराजांना शिक्षक म्हणून होते (१८३२). प्रोफेसर असतांना दक्षिण भागांतील मराठी शाळांचे सुपरिंटेंडंट म्हणून ते काम पाहात असत. पुढें नॉर्मल स्कूल निघाल्यानंतर त्यांवरील पहिले डायरेक्टर म्हणून त्यांची नेमणूक झाली, व शेवटीं ते सर्व इलाख्यांतील देशी शाळांचे सुपरिंटेंडंट होते.

सरकारी नोकरींतील निरनिराळ्या हुद्द्यांचीं कामें करतांना त्यांनीं आपला लेखनाचा व्यवसाय चालू ठेवलाच होता. नेटिव्ह सेक्रेटरी असतांना 'दर्पण' नांवाचें पाक्षिक सुरू केलें (६-१-१८३२). पाक्षिकाचें नंतर लगेंच साप्ताहिक केलें. ह्या दर्पणांत इंग्रजी व मराठी अशा दोन भाषांत मजकूर छापला जाई. इंग्रजी मजकूर स्वतः बाळशास्त्री लिहीत. दर्पण हें साप्ताहिक आठ वर्षे चाललें. नंतर त्यांनीं 'दिग्दर्शन' नांवाचें मासिक सुरू केलें. ह्या नियतकालिकांशिवाय त्यांचें ग्रंथलेखन चालूच होतें. त्यांनीं लिहिलेल्या पुस्तकांत बालव्याकरण, भूगोलविद्या, नीतिकथा, सारसंग्रह, शून्यलब्धिगणित, हिंदुस्थान देशाचा प्राचीन इतिहास इत्यादि लहानमोठीं पुस्तकें आहेत. त्यांनीं लिहिलेल्या पुस्तकांचें स्वरूप मात्र शालेय असेंच आहे. ह्यांशिवाय रॉयल एशियाटिक सोसायटीच्या नियतकालिकांत त्यांनीं कांहीं लेख लिहिले आहेत. गिरनार, नागपूर येथील शिलालेख व खारेपाटण, सातारा, कोल्हापूर, सामानगड येथें सांपडलेले ताम्रपट ह्यांचीं वाचनें त्यांनीं प्रसिद्ध केलीं हें त्यांचें प्राच्यसंशोधन होय. ह्याशिवाय भूगोल, खगोल, भूगर्भ, वनस्पति इत्यादि शास्त्रांसंबंधींहि त्यांनीं कांहीं लिखाण केलें आहे. सरकारी नोकरी व इतर कार्य चांगलें केल्याबद्दल त्या वेळचा मोठ्यांतला मोठा जो 'जे. पी.' चा मान तो त्यांना सरकारकडून मिळाला. अशीं निरनिराळीं कार्यें करीत असतांनाच ऐन उमेदीच्या काळांत म्हणजे वयाच्या अवघ्या पस्तिसाव्या वर्षी त्यांनीं आपली इहयात्रा संपविली (१७ मे १८४६).

बाळशास्त्री हे अव्वल इंग्रजींतील एक अत्यंत बुद्धिमान् गृहस्थ होते. ते उत्तम शिक्षक होते. एल्फिन्स्टन कॉलेजमधील पहिले एतद्देशीय प्रोफेसर होते. मुंबई इलाख्यांतील नॉर्मल स्कूलचे पहिले प्राध्यापक व मुख्तसर होते. ते एक चांगले ग्रंथकार होते. ते समाजसुधारक होते. ते प्राच्य विद्येचे संशोधक होते. ते पत्रकार होते. त्यांची इतकी विविध कामगिरी असली तरी त्या सर्वांत उल्लेखनीय व पुढील पिढींना स्फूर्तिदायक अशी त्यांची कामगिरी म्हटली म्हणजे 'दर्पण', 'दिग्दर्शन' ह्या नियतकालिकांचें संपादन ही होय. लेखक, ग्रंथकार, प्रोफेसर व संशोधक ह्या

सर्वांपेक्षां संपादक म्हणूनच त्यांची योग्यता विशेष आहे. त्यांचें महाराष्ट्रावर जर कोणतें ऋण असेल तर तें सर्वांत अधिक हेंच आहे, व त्याच दृष्टीनें महाराष्ट्रानें त्यांचें उतरायी होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यांची स्मृति जर चिरकालिक करावयाची झाली तर त्याच दृष्टीनें करायला हवी. तशी ती केली तरच ती त्यांची स्मृति स्फूर्तिदायक ठरेल. 'दर्पण' मधील इंग्रजी भाग जरी त्यांचा असला व मराठी भाग कुणाचा हें जरी निश्चित सांगतां आलें नाहीं, तरी 'दर्पण'ची कल्पना त्यांचीच. त्याची संपादणीहि पण त्यांचीच. तेव्हां आद्य महाराष्ट्रीय पत्रपंडित म्हणूनच आपण त्यांना मान दिला पाहिजे. त्यांच्या पत्रपांडित्यानें जितकें नेत्रलोभन व स्फूर्तिप्रदान होईल तितकें त्यांच्या अध्यापकत्वानें होणार नाहीं, त्यांच्या प्रोफेसरीनें किंवा मुन्सफीनें होणार नाहीं, त्यांच्या पुस्तकलेखनानें होणार नाहीं किंवा त्यांच्या ताम्रपटसंशोधनानेंहि पण होणार नाहीं. शंभरीच्या उत्सवाच्या आनंदभरांत किंवा आद्यत्वाच्या आश्चर्यभरांत किंवा स्वकीयाच्या आत्मीयत्वभरांत वाङ्मयीन स्थायी मूल्यांचा किंवा वैयक्तिक महात्मतेच्या मूल्यांचा संभ्रम तर आपल्या हातून होत नाहीं ना, ह्याविषयीं आपण दक्षता बाळगली पाहिजे.

खरी म्हणजे त्यांची तळमळच स्फूर्ति देणारी आहे. 'दर्पण' मूळ काढलें तें विद्याव्यवहाराचें द्वार असें एक वर्तमानपत्र म्हणून काढलें. "या देशाचे लोकांत विलायती विद्येचा अभ्यास वाढावा आणि तेथील ज्ञान प्रसिद्ध व्हावें असा या वर्तमानपत्राचा उद्योग मुख्यत्वें होता. विलायतेंतील विद्या, कला, कौशल्यें, याविषयींचे व त्यांतील ज्या भागांचा उपयोग या देशांत झाल्यास फार हित आहे, त्याविषयींचे ल्हानसहान ग्रंथ लिहिले जातील. अशा गोष्टींपासून पुरुषांस शोध करण्यास आणि विद्येंत परिश्रम करणारांस विचार करावयास विषय मिळतील. परंतु जे शुद्ध मनोरंजन मात्र इच्छितात, त्यांचींहि हृदयें 'दर्पणा' मध्यें ल्हानल्हान चमत्कारिक ज्या गोष्टी असतील त्यांपासून संतुष्ट होतील. मनोरंजन करणें, चालते काळाचीं वर्तमानें कळविणें, आणि योग्यतेस येण्याचे मार्ग दाखविणें या गोष्टींची दर्पण छापणारांस मोठी उत्कंठा आहे." दर्पणकारांचें हें मूळचें उद्दिष्ट त्यांनीं सतत आठ वर्षें व पुढेंहि दिग्दर्शनद्वारा आपणांपुढें ठेविलें. हेंच उद्दिष्ट इतर मुंबईअखबार किंवा प्रभाकर वगैरे पुढच्या वर्तमानपत्रकर्त्यांनीं आपणांपुढें ठेविलें. तेंच उद्दिष्ट आजच्याहि वर्तमानपत्रकर्त्यांच्या पुढें आहे. हीच बाळशास्त्री जांभेकरांची स्फूर्ति आणि हीच त्यांची स्मृति. हें उद्दिष्ट साधतांना तत्कालीन परिस्थितीप्रमाणें त्यांना

निरनिराळ्या विषयांवर लिहावें लागलें. निरनिराळे वाद खेळावे लागले. हिंदुधर्म, मिशनरी धर्म, ईश्वराचें अस्तित्व, पुनर्विवाह, मानवजाती, विचार, जातिभेद, ज्ञाति व रीति, मानवजात व पशुजात, स्त्रियांस विद्याभ्यास, स्त्री-पुरुषांना समान हक्क, पार्लमेंट व सुधारणा, सरकारी नोकऱ्यांचें हिंदीकरण, सरकारी नोकऱ्यांत जातीयता, महाराष्ट्र भाषेचें व्याकरण इत्यादि विषय दर्पणांत चर्चिले गेले. धर्माच्या बाबतींत तर वादाची पराकाष्ठा होई. ती इतकी कीं लोकांनीं 'दर्पण' हें नांव बदलून 'रणशिंग' हें नांव ठेवण्यापर्यंत मजल गेली. दर्पणानंतर मुंबईअखबार, दिग्दर्शन, धूमकेतु, ज्ञानचंद्रोदय, प्रभाकर, ज्ञानसिंधु, ज्ञानप्रकाश अशीं नियतकालिकें निघालीं. हीच परंपरा पुढें चांगली जोपासली जाऊन आज तिला एक प्रकारचा भरघोसपणा आला आहे. पत्रपांडित्याचें हें जें रोप बाळशास्त्र्यांनीं लाविलें तेंच त्यांचें खरें कार्य व तेंच त्यांचें खरें ऋण.

आपली प्राचीन संस्कृति टिकवायची व नवी पाश्चात्य संस्कृति आत्मसात् करायची असें दुहेरी कार्य बाळशास्त्री व तत्समकालीन विचारवंतांनीं महाराष्ट्रांत आरंभिलें. त्याला अनुकूल परिस्थिति मिळाली, सरकारचें साह्यहि त्याला मिळालें. लोकांची संमतीहि त्याला मिळाली. कांहीं संस्था स्थापल्या गेल्या. तीस-चाळीस-पर्यंत लहानमोठे ग्रंथहि तयार झाले. आतां हा प्रयत्न चांगला फोफावणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. इंग्रजांच्या सुराज्याचा उष्माहि त्याला सुखकर होऊं लागला. राज्य परकीयांचें असल्यामुळें कोणत्याहि देशहिताच्या कार्याचे आरंभक असे भीत भीत पावलें टाकीत गेले असल्यास नवल नाहीं. त्यांना सर्वच रचना आरंभापासून करावयाची होती. पायाची रचना नेहमींच डोळ्यांत भरते असें नाहीं. पुढें भव्य सुशोभित असा इमला उभारल्यानंतर तर ती अगदींच भरत नाहीं. लोकहितवादींचीं शतपत्रें, चिपळूणकरांची निबंधमाला, टिळक आगरकरांचा केसरी, वगैरे हीं सुशोभित अशीं उत्तरकालीन दालनें दिसतात व तीं नेत्रविलोभनहि करतात. परंतु ह्या सुशोभित दालनांची बांधणी व उभारणी दर्पण, दिग्दर्शन, मुंबईअखबार, प्रभाकर, ज्ञानसिंधु ह्या आद्य प्रस्तरांवर झाली आहे, हें विसरून कसें चालेल ? त्यांतहि पुन्हा प्राथम्याचा मान दर्पणकारांकडे जातो.

त्यांचें कार्य असेंच नेहमीं पत्रपंडितांना स्फूर्ति देत राहो असेंच ह्या बाळ-शास्त्र्यांच्या शतसांवत्सरिक श्राद्धतिथीच्या निमित्तानें कोणीहि इच्छिणार.

# ५. डॉ. भांडारकर व महाराष्ट्रीय संशोधन

परवां ऋषिपंचमीस मुंबई येथील प्रार्थनासमाजमंदिरांत डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर ह्यांचा स्मृतिदिन साजरा करण्यांत आला. त्यानिमित्त प्रो. कु. सुलभाबाई पाणंदीकर ह्यांचें व्याख्यान झालें. कु. सुलभाबाई ह्या रामकृष्णपंतांच्या नात होत. आपल्या आजोबांच्या प्रेमळ सांनिध्यांत त्यांनीं आरंभींचीं सतरा वर्षें घालविलीं. आपल्या आजोबांच्या प्रेमळ वात्सल्यांत त्या वाढल्या. त्यांच्या ऋषिसाध्य आश्रमीय वातावरणांत त्या सुसंस्कृत झाल्या. त्यांच्या भावनामय व बुद्धिमय अशा द्विविध शिस्तींत त्या तयार झाल्या. तेव्हां त्या दिवशीं रामकृष्णपंतांची बुद्धि, संस्कृति, विद्वत्ता व आनुवंशिकता ह्यांचें अल्पांशांत का होईना, पण दर्शन व स्मरण झालें असल्यास नवल नाहीं. सुलभाबाईनीं आपल्या व्याख्यानांत आपल्या आजोबांच्या ज्या आठवणी सांगितल्या त्यांनीं तें व्याख्यान विशेष मनोरंजक झालें. त्यांनींच तर व्याख्यानांत एक प्रकारचा जिव्हाळा आणिला. रामकृष्णपंतांचें विद्यामय जीवन पुष्कळांना परिचित असेल. परंतु त्यांचें वैयक्तिक खाजगी जीवन आणि तेंहि इतक्या जवळून पाहिलेलें अशी मंडळी त्यांच्या कुटुंबांतीलच असणार हें उघड आहे. तेव्हां सर्वांना उपलब्ध न होणारी माहिती त्या दिवशीं सहज ह्या व्याख्यानानें मिळाली. सुलभाबाईनीं आपल्या आजोबांचें ऋण फेडलें. आम्हीहि त्यांच्या विद्या-कार्याचें स्मरण करून ऋषिऋण अंशतः तरी फेडण्याचा प्रयत्न करणार आहों.

डॉ. भांडारकर हे संस्कृत विद्येचे पंडित म्हणून प्रसिद्ध आहेत. दुय्यम शाळां-तील संस्कृत विषयाच्या दोन पाठ्य पुस्तकांचे कर्ते म्हणून तर ते सर्व विद्यार्थ्यांच्या परिचयाचे आहेत. मुंबई विद्यापीठांतील विद्यार्थ्यांच्या किती तरी पिढ्या ह्या दोन पुस्तकांनीं संस्कृत विद्येंत आजवर सुसंस्कृत केल्या. पुढें पुढें तर इतकें निकटचें समीकरण बनलें कीं, भांडारकर म्हणजे संस्कृत व संस्कृत म्हणजे भांडारकर. कोणत्याहि विषयाचीं शाळेंतील पाठ्यपुस्तकें लिहिणें ही गोष्ट मामुली आहे. थोडेंसें विषयाचें ज्ञान, पाठाची थोडीशी कल्पना, थोडासा वशिला, इतकी सामग्री पाठ्य-पुस्तकलेखकाला पुरेशी असते. तेव्हां भांडारकरांचा लौकिक ह्या पाठ्यपुस्तकांवर नाहीं हें केव्हांहि स्पष्ट आहे. या पुस्तकांनीं लोकांशीं त्यांची ओळख करून दिली असेल, परंतु त्यांनीं भांडारकरांना खरा लौकिक प्राप्त करून दिला असें म्हणणें हें गैर आहे. त्याचप्रमाणें भांडारकर हे शिक्षक व प्राध्यापक होते, म्हणून ते मोठे झाले

असें म्हणणेंहि बरोबर नाहीं. आजवर संस्कृतचे शिक्षक काय किंवा प्राध्यापक काय, थोडेथोडके झाले ? पण भांडारकरांना जो लौकिक मिळाला तो ह्यांच्यापैकीं कुणाच्या वांट्याला आला ? तेव्हां भांडारकरांचा लौकिक किंवा मोठेपणा दुसऱ्या कशांत तरी असला पाहिजे. असें हें दुसरें काय आहे व त्यानें रामकृष्णपंतांना इतका मोठा लौकिक, केवळ ह्या देशांतच नव्हे तर परदेशांतहि, कसा प्राप्त करून दिला ?

भांडारकरांना जो अलौकिक लौकिक मिळाला, तो त्यांच्या संशोधनानें मिळाला. हें त्यांचें संशोधन संस्कृत वाङ्मयासंबंधीं आहे, संस्कृत भाषेसंबंधीं आहे, महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासासंबंधीं आहे, प्राचीन धर्मपंथांसंबंधीं आहे, प्राच्यविद्या किंवा पुरातत्त्व म्हणून जे विषय मानण्यांत येतात त्या विषयांसंबंधीं आहे. पुरातत्त्वशास्त्रांचें असें एकहि अंग नाहीं कीं ज्यांत डॉ. रामकृष्णपंतांनीं संशोधन केलें नाहीं. वेद व वेदान्त, व्याकरण व भाषा, इतिहास व पुराणें, शिलालेख व ताम्रपट, नाणक व मुद्रा, प्राचीन पोथ्या व लिपि, इत्यादि पुरातत्त्वाच्या सर्व अंगांचा त्यांनीं अभ्यास केला; त्यांतील ज्ञात गोष्टी विशद केल्या; अज्ञात गोष्टी नव्यानेंच प्रकाशांत आणिल्या, आणि प्राच्य विद्यासंशोधनाचा असा कांहीं भरभक्कम पाया घातला कीं, त्या संशोधनाच्या अधिष्ठानावर पुढें कित्येक प्राच्य व प्रातीच्य विद्वानांनीं आपलें संशोधन थाटलें. आजहि कित्येक संशोधक त्याच सामग्रीचा फायदा घेत आहेत. अशा रीतीनें संस्कृत विद्येच्या अभ्यासकांची व संशोधकांची एक भांडारकरी वळणाची अशी परंपरा ह्या देशांतच केवळ नव्हे, तर पाश्चात्य देशांतहि निर्माण झाली आहे. स्फूर्ति जी मिळाली ती कांहींना प्रत्यक्ष गुरु-मुखांतून मिळाली, तर इतर कांहींना ती त्यांच्या ग्रंथांवरून मिळाली आहे. पुण्यास त्यांच्या नांवानेंच स्थापिलेल्या 'भांडारकर प्राच्य-विद्यासंशोधनमंदिरां'त संग्रहित केलेलें साहित्य व चालू असलेलें संशोधनकार्य हें रामकृष्णपंतांच्या जीवितध्येयाचें एक जिवंत स्मारकच होय.

पाश्चात्य देशांत पुरातत्त्व शास्त्राचा अभ्यास अगोदर बरेच दिवस चाललेला होता. परंतु त्या अभ्यासांत खरी क्रांति जी झाली, ती संस्कृत विद्येच्या शोधानें झाली. वेद-वेदांगें ह्यांच्या अभ्यासानें त्याला एक निराळेंच वळण लागलें. पाणिनीच्या व्याकरणाच्या शोधानें व संशोधनानें त्या अभ्यासाला ऐतिहासिक व तौलनिक स्वरूप प्राप्त झालें. त्यांत पुनः झेन्द-अवेस्तांतील शोधांची भर पडली. रोथ आणि बोटलिंग्र ह्या दोघां विद्वानांनीं तयार केलेला सेंट पिटर्सबर्ग नांवाचा वेदांचा प्रचंड

कोश, रोथनें तयार केलेलें निरुक्ताचें संशोधन, गोल्डस्टूकरनें केलेली पाणिनीच्या क्लिष्टांतील क्लिष्ट समजलें गेलेल्या व्याकरणग्रंथाची विचिकित्सा, मॅक्समुल्लरनें संपादित केलेली ऋग्वेदसंहिता, डॉ. बूल्हरनें केलेली काठकधर्मसूत्रांची व तदनुषंगें मनुस्मृतीची मांडणी व या सर्वांच्या मध्यें सामग्र्यानें शोभणारा वेबरचा वैदिक वाङ्मयाचा इतिहास इत्यादि कार्यें संशोधनप्रदीपच होत. ह्या प्रदीपांच्याच प्रकाशांत पाश्चिमात्य देशांत संशोधन पूर्वींहि चाललें व सध्यांहि चाललेलें आहे. फ्रान्स, अमेरिका, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया ह्या देशांत पुढें पुढें जें संस्कृत विद्येसंबंधीं संशोधन झालें तें वरील ग्रंथांच्या स्फूर्तीमुळेंच झालें. ह्या सर्व संशोधनाच्या सातत्या-मुळें व घनत्वामुळें अशी अवस्था प्राप्त झाली कीं, वैदिक वाङ्मयाचें पठन प्रत्यक्ष गंगा, यमुना किंवा सरस्वती ह्या नद्यांच्या परिसरांतसुद्धां तितक्या आस्थेनें व तीव्रतेनें होत नसे, कीं जितक्या आस्थेनें व तीव्रतेनें तें व्होल्गा, सीन किंवा थेम्स नद्यांच्या परिसरांत होत असे. त्या पाश्चात्य नद्यांचे परिसर वेदविद्येच्या घोषानें दुमदुमत असत. आमच्या इकडील नद्यांचे परिसर मात्र वेदघोषानें उद्‌घोषित होण्याचें थांबलें. अशा रीतीनें पाश्चात्य देशांत प्राच्यविद्येचा व प्राच्यसंस्कृतीचा पुरस्कार व प्रचार जोरांत होऊं लागला. त्याच विद्येच्या जोरावर पाश्चात्य लोकांनीं आपलें भाषिक व वांशिक प्राचीनत्व प्रस्थापित केलें. आर्य लोकांचेच आम्ही वंशज आहोंत व आर्यांच्या भाषेपासून निघालेल्या भाषाच आम्ही बोलत आहोंत अशी जी प्राचीनत्वाची जाणीव पाश्चात्य राष्ट्रांत झाली, ती ह्या प्राच्यविद्येच्या संशोधनामुळेंच झाली. ह्या त्यांच्या संशोधनाचे व अभ्यासाचे पडसाद आमच्या इकडेहि उठले. अशाच पडसादांपैकीं एक पडसाद म्हणजे आमच्या हिंदुस्थानांतील वेदविद्येंतील अभ्यास हा होय.

पाश्चात्य देशांत झालेलें प्राच्यविद्येचें संशोधन हें अर्थात् हिंदुस्थानांत उपलब्ध झालेल्या साधनसामग्रीवर आधारलेलें असणार हें उघड आहे. हीं साधनें हिंदुस्थानांतून ठिकठिकाणच्या ग्रंथभांडारांतून गोळा केलीं गेलीं. तीं कंपनीसरकारच्या मार्फत गोळा करण्यांत आलीं. हीं गोळा करतांना त्या त्या साधनांचा साहजिकच अभ्यास केला गेला. कंपनीसरकारच्या कांहीं सुबुद्ध लष्करी नोकरांनीं व कांहीं मिशनरी धर्मोपदेशकांनीं दोन प्रकारचीं कामें केलीं. त्यांनीं नित्याचें देशाक्रमणाचें कार्य तर तन्मयतेनें केलेंच, पण त्या कार्याबरोबर तितक्याच तन्मयतेनें हें सांस्कृतिक कार्य केलें. तीच गोष्ट मिशनरी धर्मोपदेशकांची. त्यांनीं धर्मप्रसाराच्या

कार्याबरोबर हें सांस्कृतिक कार्य तितक्याच तन्मयतेनें केलें. त्याचाच एक परिणाम असा झाला कीं, पाश्चात्य देशांत प्राच्यविद्येच्या साधनांचा एकसारखा ओघ सुरू होऊन तिकडील ग्रंथसंग्रहालयें चांगलीं थाटलीं गेलीं. बोडलियन ग्रंथसंग्रहालय, लायप्झीग, बर्लिन, व्हिएन्ना, पॅरिस 'वगैरे ठिकाणचीं ग्रंथालयें अद्वितीय कशीं झालीं ? पुणें येथील पेशव्यांच्या दौलतीच्या वारशाबरोबर ज्याचा वारसा एल्फिन्स्टन साहेबांकडे आला, तें सगुणाबाईचें हस्तलेखसंग्रहालय किंवा ग्रंथशाळा, शरफोजी भोसल्याचें सरस्वती महाल नांवाचें तंजावर येथील ग्रंथालय, किंवा पाटणा येथील खुदाबक्ष लायब्ररी हीं आमच्याकडील ग्रंथालयें देखील पाश्चात्य ग्रंथालयांपुढें कांहींच नव्हत. कित्येक दुर्मिळ व महत्त्वाचे हस्तलेख, पोथ्या व ग्रंथ हीं साधनें इकडील शास्त्रीमंडळींच्या साह्यानें सरकारमार्फत व अन्य रीतीनें गोळा केलीं गेलीं व युरोपच्या मार्गास लागून तिकडे उपलब्ध होऊं लागलीं, हा त्याचा एक परिणाम.

त्याचा दुसरा परिणाम असा झाला कीं, हिंदुस्थानांतसुद्धां अभ्यासकांची एक परंपरा निर्माण झाली. त्यांनीं हस्तलेख शोधले, शिलालेख वाचले, पोथ्या गोळा केल्या, नाणीं पैदा केलीं, जुने अवशेष खोदले, भाषिक पाहण्या केल्या व अशा रीतीनें प्राच्य विद्येच्या अभ्यासाचें अधिष्ठान कायम केलें. ह्या अधिष्ठनाचीच एकेक शाखा एकेका अभ्यासकानें उचलली व आत्मसात् केली. म्यूरनें वैदिक शाखा उचलली व संस्कृत टेक्स्ट्स्चे पांच भाग लिहिले. बूल्हरनें धर्मसूत्रवाङ्मय उचललें व मनुस्मृति संपादित केली. सेनार व फ्लीट ह्यांनीं शिलालेखी वाङ्मय उचललें व हिंदुस्थानांतील प्राचीन शिलालेख छापून काढले. टॉडनें राजपुतान्यांतील वैतालिक वाङ्मय उचलिलें व ' राजस्तान ' ग्रंथ लिहिला. बीम्सनें गौडी भाषिक वाङ्मय उचललें व आपलें औत्तरीय आर्य भाषांचें व्याकरण लिहिलें. होएर्न्ले ह्यानें हिंदी भाषेचें स्वरूप विशद केलें, टेसिटोरीनें गुजराती भाषा उघड करून सांगितली. काल्डवेल्नें द्राविडी भाषेचें व्याकरण लिहिलें. गुण्डेर्ट व किटेल ह्यांनीं कानडी भाषेचे कोश तयार केले. ह्या झाल्या वाङ्मयीन व भाषिक शाखा. इतिहास, फारसी तवारिखा, पाली वगैरे प्राकृतिक साहित्य, काव्यनाटकादि ललित वाङ्मय, कथासरित्सागर, राजतरंगिणी वगैरे जानपद व प्रांतिक साहित्य, पौराणिक वाङ्मय ह्या बाबीहिं संलक्षिल्या गेल्या. सर विल्यम जोन्स, व्हिन्सेन्ट स्मिथ, ब्रिग्ज, ग्रँट् डफ, ऱ्हीस डेव्हिडस्, विल्सन, पार्गीटर वगैरे अभ्यासकांनीं त्या त्या क्षेत्रांत आपापलीं नांवें चिरस्थायी केलीं. ह्यांचीच उज्ज्वल परंपरा पुढें मॅक्डोनेल, रॅप्सन,

रॅास, डॉडवेल, थॉमस, लेव्ही, ग्रीयर्सन इत्यादींनीं पुढें चालविली. हीच परंपरा बार्नेट, टर्नर, ब्लोक इत्यादि आज चालवीत आहेत.

ह्या सर्व पाश्चात्य संशोधकांत बरोबरीचें स्थान पटकाविण्याच्या योग्यतेचे आपल्या महाराष्ट्रांतील पंडितांतच केवळ नव्हे तर सर्व भारतवर्षांतील पंडितांत अग्रगण्य असे पंडित म्हणजे म्हणजे डॉ. रामकृष्णपंत भांडारकर हे होत. महादेव मोरेश्वर कुंटे, काशिनाथ बापूजी पाठक हीं आपल्याकडील आणखी उल्लेखनीय नांवें होत. न्यायमूर्ति रानडे ह्यांचेंहि नांव ह्याबाबत निर्देशिण्यासारखें आहे. परंतु, त्यांना सर्वांगीण सांस्कृतिक उत्कर्षांची पूर्ण कल्पना व आंच असली तरी संशोधनाच्या एखाद्या शाखेंत सूक्ष्मता व पारंगतता त्यांच्यांत नव्हती हें कबूल करणें भाग आहे. कुंटे ह्यांनीं पूर्व-मीमांसा वाङ्मयाचा अभ्यास केला. "व्हिसिसिट्यूड्स ऑफ आर्यन् सिव्हिलिझेशन" हा संशोधनपूर्ण ग्रंथ लिहून त्यांनीं पाश्चात्य देशांत मोठा लौकिक व विश्वकोशांत नामनिर्देश मिळविला. न्यायमूर्ति तेलंगांनीं गीतेचें भाषांतर करून 'सेक्रेड बुक्स् ऑफ् दि ईस्ट' ह्या ग्रंथमालेंत तो ग्रंथ गोवला जाण्याचें महत् श्रेय संपादिलें. पाठकांनीं कांहीं शोधनिबंध लिहिले. परंतु, ह्या सर्वांत अद्वितीय असें संशोधनकार्य डॉ. भांडारकरांचें आहे.

डॉ. रामकृष्णपंतांच्या संशोधनकार्याचें अद्वितीयत्व आहे तरी कशांत? व हें संशोधन आहे तरी काय? हे प्रश्न साहजिकच पुढें येतात. संस्कृतचे प्रोफेसर असतांना अधिकारान्वयेंच त्यांना हस्तलिखितें व पोथ्या ह्यांच्यावर अभिप्राय द्यावे लागत. डेक्कन कॉलेजमधील संस्कृत ग्रंथालय म्हणजे पेशव्यांकडून वारसानें इंग्रजांकडे आलेलें. त्यांत दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखितें पुष्कळ होतीं. पेशवाईतील राजघराण्यांतील निरनिराळ्या व्यक्तींनीं ह्या पोथ्या तयार करविल्या. त्या नक्कलल्या. राधाबाई, चिमाजीआप्पा, पिलाजी जाधव, रघुनाथराव, काशीबाई, गोपिकाबाई, पार्वतीबाई, सगुणाबाई वगैरे मंडळींना पोथ्यासंग्रह करण्याचा, लिहवून व वाचवून घेण्याचा नाद होता. ह्यांतील प्रत्येकाजवळ स्वतःची ग्रंथशालाच असे. ह्या सर्वांत सगुणाबाईची ग्रंथशाला फार संपन्न होती. तींत नाना बिषयांवरील पोथ्या व हस्तलिखितें होतीं. पेशव्यांची हीच मुख्य ग्रंथशाला व हिचाच कदाचित् वारसा इंग्रजांकडे येऊन डेक्कन कॉलेजमधील संस्कृत ग्रंथालयाचें केंद्रीभूत मूळ हीच ग्रंथशाला झाली असावी. ह्या ग्रंथालयांत पुढेंहि इंग्रज सरकारनें अमोलिक भर घातली. निरनिराळ्या ग्रंथभांडारांतील पोथ्या प्रयासानें, आस्थेनें, मूल्य देऊन, पैदा केल्या व अशा

रीतीनें संग्रह तयार केला. ह्या पोथ्यांचें वर्णनात्मक फेरिस्त तयार करण्याचें कार्य डॉ. भांडारकर यांना संस्कृत प्रोफेसर म्हणून करावें लागलें. नव्या पोथ्यांची सुद्धां पाहणी करून त्यांचें मूल्य ठरवावें लागलें. हस्तलेखांची वर्णनात्मक यादी तयार करणें म्हणजे किती जिकिरीचें काम आहे हें तें काम करणाऱ्यालाच माहीत असतें. पोथीची लिपि उकलणें, तिचा विषय उलगडणें, तिच्या काळासंबंधीं अंदाज बांधणें, तिचा कर्ता व लेखक निश्चित करणें, तिचे आदि, अन्त व मध्य ह्यांचे निर्देश करणें ह्या गोष्टी प्राचीन हस्तलेखांबाबत अत्यंत जरूरीच्या होत. ह्याशिवाय त्यांची संशोधनांत उपयुक्तता ठरत नाहीं. डॉ. भांडारकर ह्यांनीं केलेल्या ह्या उद्योगाचें महत्त्व वरील गोष्टींवरून कळून येईल. हें ग्रंथ-सूचीचें कार्य फार किचकट असतें. हेंच कार्य सध्यां भांडारकर प्राच्यमंदिरांत चाललें आहे, व श्री. गोडे हे जरी आपणाकडून श्रमांचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत, तरी त्याचा पार अद्याप पडत नाहीं.

हें झालें एक काम. दुसरें, डॉ. भांडारकर ह्यांनीं 'दक्षिणचा प्राचीन इतिहास' हा संशोधन निबंध लिहिला. हा त्यांचा नुसता 'अंतर्दृष्टिक्षेप' आहे असें ते म्हणतात. परंतु, ह्यांत दक्षिण प्राचीन इतिहासाच्या संशोधनाबाबत जें एकदां डॉ. भांडारकर ह्यांनीं ठाम पाऊल टाकलें तें कायमच झालें आहे. त्यांत अद्याप कोणास फारसा फरक करतां आला नाहीं. तें ऐतिहासिक संशोधन आद्यहि आहे आणि अद्ययावत्‌हि अद्याप आहे. हाच इतिहास गॅझिटीयरमध्यें समाविष्ट केला गेला. दक्षिणच्या इतिहासांतील प्राचीन राजवटी, राजांचीं नांवें व बिरुदें, त्यांच्या कारकीर्दी, त्यांनीं कोरलेले शिलालेख, त्यांचीं नाणीं, त्याचेसंबंधीं पौराणिक निर्देश, इतर ग्रंथांत आलेले त्यांचे उल्लेख, महाराष्ट्राचा सामाजिक इतिहास ह्या सर्वांचा उत्तम मेळ त्यांनीं ह्या ग्रंथांत घातला आहे. ह्यांत गोळा केलेलीं साधनें, त्यांचें केलेलें वर्गीकरण, त्यांच्या मूल्यांची त्यांनीं केलेली विचिकित्सा व त्या सर्वांवरून काढलेले निष्कर्ष व साधनें संपलीं असतांना संभाव्य इतिहासासंबंधीं बांधलेलीं अनुमानें ह्या गोष्टी ह्या ग्रंथांतील उल्लेखनीय होत. 'दक्षिणचा इतिहास' हा ग्रंथ आहे लहानच; परंतु संशोधनाचा एक उत्तम नमुना म्हणून फार आदरणीय आहे, असेंच सर्व संशोधक मानतात. ही झाली त्यांची दुसरी कामगिरी.

डॉ. भांडारकर ह्यांचें तिसरें संशोधनाचें प्रसिद्ध कार्य म्हटलें म्हणजे त्यांनीं १८७७ सालीं मुंबई विद्यापीठाच्या विद्यमानें दिलेलीं भाषाशास्त्रीय व्याख्यानें हीं होत. भाषाशास्त्र, संस्कृत व संस्कृतोद्भव अर्वाचीन भाषा ह्यांचें सांग व उत्पत्तिक

विवेचन त्यांनीं ह्या व्याख्यानांच्या द्वारा केलें आहे. भाषा उत्पन्न कशी होते, ती वाढते कशी, संस्कृत भाषेची उत्पत्ति, तिच्या विकासाच्या अवस्था, पाली आणि इतर पोटभाषा, प्राकृत व अपभ्रंश, उत्तर हिंदुस्थानांतील अर्वाचीन बोलींची स्वरप्रक्रिया, त्या भाषांत उतरलेले व्याकरणाचे प्राचीन अवशेष, त्यांच्यांत उत्पन्न झालेले व्याकरणाचे प्राचीन अवशेष, त्यांच्यांतील व्याकरणाचे नवीन प्रकार, संस्कृत, पाली, प्राकृत आणि अर्वाचीन बोली ह्यांचे परस्परसंबंध इत्यादि मुद्दे त्यांनीं ह्या व्याख्यानांत विचारांत घेऊन त्यांची मांडणी शास्त्रशुद्ध पद्धतीनें केली आहे. उदाहरणें तर अमूप दिलीं आहेत. ह्या ग्रंथाची खरी मजा त्यांतील उदाहरणांत आहे. उदाहरणें दिल्याशिवाय त्यांनीं एकहि विधान केलें नाहीं. भाषाशास्त्रांतील त्यांची सखोलता, सूक्ष्मता व अचूकपणा ह्या ग्रंथांत पदोपदीं आढळतात. बीम्सचा प्रयत्न ह्यांच्या प्रयत्नाच्या पूर्वींचा आहे. परंतु उदाहरणें व उदाहरणांवरून बांधलेले उच्चाराचे सिद्धांत ह्या बाबतींत भांडारकरांचा प्रयत्न सरस वाटतो. शिवाय बीम्सच्या ग्रंथांत अर्वाचीन भाषांचेंच फक्त विवेचन असल्यामुळें तें त्या त्या आर्योद्भव अर्वाचीन भाषेच्याबाबत तौलनिक स्वरूपाचेंच फक्त झालें आहे. त्यांत संस्कृत, पाली, प्राकृत, अपभ्रंश ह्या भाषांचा विचार नसल्यामुळें त्यांत ऐतिहासिक स्वरूप उतरलें नाहीं. भांडारकरांचा प्रयत्न ऐतिहासिक आणि तौलनिक अशा दोन्ही स्वरूपांचा असल्यामुळें तो बीम्सच्या प्रयत्नापेक्षां सरस वाटतो. बीम्स व भांडारकर ह्यांनीं दाखवून दिलेला भाषिक संशोधनाचा मार्ग त्यांच्यानंतर पुष्कळांनीं अनुसरला. ग्रियर्सनचा काश्मिरी कोश, ब्लोकची मराठी भाषेंतील शब्दांची सूचि, टर्नरचा नेपाळी भाषेचा कोश इत्यादि भाषिक प्रयत्न त्याच दिशेनें केलेले आहेत. ब्रुग्मान व वाल्दे ह्यांनीं तर तर मूळच्या बीम्स-भांडारकरांच्या शब्दविचिकित्सेस सर्वस्पर्शी असें स्वरूप देऊन भाषिक प्रयत्नांची व्याप्ति वाढविली. संस्कृत वगैरे आर्यभाषांच्या जोडीला त्यांनीं युरोपमधील सर्व भाषा घेतल्या. त्याच्याहिपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे वेदाच्याहि पूर्वींच्या आर्यभाषेचें स्वरूप विशद करण्याची बुद्धीची चतुराई त्यांनीं दाखविली, ही होय.

बीम्स काय किंवा भांडारकर काय किंवा ब्रुग्मान काय किंवा वाल्दे काय, ह्यांचे प्रयत्न स्वरप्रक्रिया व प्रत्ययप्रक्रिया ह्यांच्या दृष्टीनें कितीहि संपूर्ण, सांग, सोपपत्तिक व सोदाहरण असले तरी दुसऱ्या एका दृष्टीनें अपूर्ण राहिले. ती दृष्टि म्हणजे शब्दाच्या अर्थाच्या विचाराची. शब्दाच्या अर्थाचा विचार मात्र ह्यांच्या कुणाच्या

ग्रंथांत नाहीं; पण ह्या वैगुण्यांत त्यांचा कांहीं दोष नाहीं. शब्दाच्या अर्थाची उपपत्ति हा विषयच एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांत युरोपमध्यें उदयास आला. ह्याचें सर्व श्रेय पोस्टगेट आणि ग्रीएल् ह्या भाषापंडितांकडे जातें. भांडारकरांचें भाषिक-संशोधन मात्र ह्या एका दृष्टीनें उणें राहिलें हें खरें. त्यांनीं आरंभिलेलें भाषिक-संशोधनाचें कार्य कांहीं थोडेंसें त्याच तीव्रतेनें राजवाडे, गुणे, बेलवलकर ह्यांनीं चालविलें. राजवाड्यांनीं मराठी धातुकोश सिद्ध केला. गुणे ह्यांनीं भाषाशास्त्रीय प्रवेश म्हणून प्राथमिक स्वरूपाचें पुस्तक लिहिलें. बेलवलकर ह्यांनीं व्याकरण-परंपरा विशद केल्या.

सर रामकृष्णपंतांचें चौथें वाङ्मयीन कार्य म्हटलें म्हणजे त्यांनीं लिहिलेलें "वैष्णविझम् व शैविझम्" हें पुस्तक होय. हें पुस्तक आहे धार्मिक विषया-वरील. ह्यांत शैवपंथ व वैष्णवपंथ ह्याविषयीं प्रामुख्यानें विचार केला आहे. भांडारकर हे संशोधक व प्रार्थनासमाजिस्ट असल्यामुळें हें असल्या धार्मिक, ऐतिहासिक संशोधनाच्या स्वरूपाचें पुस्तक त्यांच्याकडून लिहिलें जाणें साहजिक होतें. हिंदुस्थानांतील ह्या दोन धार्मिक विचारांचे प्रवाह किती जुन्या काळापासून व कोणकोणत्या अवस्थांमधून आले, ह्याचा इतिहास त्यांनीं ह्या पुस्तकांत मांडला आहे. शैवपंथ व वैष्णवपंथ ह्यांपासून निघालेलीं व हिंदुस्थानांत सध्यां निरनिराळ्या प्रांतांत रूढ असलेलीं भिन्न भिन्न मतें ह्या पुस्तकांत निर्देशिलीं आहेत. धर्माचा व तत्त्वज्ञानाचा हा इतिहास आहे. हेंहि पुस्तक लहानच आहे; परंतु संशोधन, सोपपत्तिक विवेचन, ऐतिहासिक आधार ह्या सर्वांचा तें एक उत्तम नमुना आहे. भांडारकर हे प्रथम संशोधक होते व नंतर ते इतर कांहीं धर्मप्रवक्ते वगैरे होते. ते संशोधक असल्यामुळें त्यांना पुढें आलेल्या साहित्याचें पृथक्करण करावें लागे. साधनांचें पृथक्करण आणि तेंहि निर्विकार व निःपक्षपातीपणानें केल्यानंतर समन्वयाचें काम त्यांना करावें लागे. ह्या संशोधनाच्या पद्धतींत बौद्धिक गुणच अधिक उपयोजावे लागतात. भावनिक गुणांना त्यांत वाव नसतो. परंतु धर्म हा विषयच भावनिक स्वरूपाचा आहे. त्यामुळें ह्या ग्रंथांत विषय एक स्वरूपाचा आणि विवेचनाची पद्धति अगदीं भिन्न, दुसऱ्या स्वरूपाची, अशी अवस्था झाली आहे. त्यामुळें ह्या ग्रंथांत भांडारकरांचा बौद्धिक प्रकर्ष दिसून येतो; भावनिक प्रकर्ष तितकासा दिसून येत नाहीं. त्यांच्या माहात्म्याचा पडताळा आला तरी त्यांच्या विवेचनानें अंतःकरण हेलावलें जात नाहीं. ह्यांतील संशोधन चांगलें; तत्त्व-

विचिकित्सा चांगली; त्यांची स्वतःची मूळ धर्मभावनाहि चांगली. परंतु हें सर्व बुद्धीच्या अधिष्ठानावर मांडलेलें आहे, हृदयाच्या अधिष्ठानावर मांडलेलें नाहीं. तसें जर मांडलें असतें तर तें कदाचित् श्रद्धामय, क्वचित् अंधश्रद्धामयहि झालें असतें. श्रद्धा आणि संशोधन ह्या दोहोंचें सूत कधीं फारसें जुळत नाहीं. संशोधनांत श्रद्धा ही बाजूसच ठेवावी लागते. आणि तसें झालें आहे म्हणूनच हें पुस्तक अव्वल दर्जाच्या संशोधनांत मूळ धरून बसलें आहे व जगांतील एका सन्मान्य संशोधनग्रंथावलींत समाविष्ट झालें आहे.

त्यांचें पांचवें कार्य म्हटलें म्हणजे त्यांचीं धर्मपर व्याख्यानें हें होय. हा लौकिक स्वरूपाचा प्रयत्न आहे. प्रार्थनासमाज मंदिरांत दिलेलीं हीं व्याख्यानें होत. ह्यांत मात्र भावनिक अधिष्ठान आहे. ह्यांतील मांडणी वाचणाऱ्याच्या अंतःकरणास स्पर्श करते. ह्यांत ते धर्मोपदेशक तत्त्वप्रतिपादक म्हणून दिसतात; संशोधक म्हणून फारसे दिसून येत नाहींत. ह्या प्रार्थना आहेत. ह्या संशोधनाचा विषयच नव्हत; ह्या श्रद्धेचा विषय होत. ह्या अन्तःकरणाला पटायच्या असतात, तशा त्या अन्तःकरणाला पटतात. धर्मपर व्याख्यानें रानड्यांचींहि आहेत. इतरांनींहि प्रार्थनामंदिरांत प्रार्थना व उपासना चालविल्या. त्या सर्वांमध्यें रानड्यांच्या श्रद्धेइतकी श्रद्धा आढळून येत नाहीं. एकनाथी भागवतावरील न्यायमूर्ति रानड्यांचीं प्रवचनें पराकाष्ठेच्या भक्तीच्या ओलाव्यानें आर्द्र झालेलीं असत असें कित्येक सांगतात. भावनेच्या आर्ततेबाबत व जिव्हाळ्याबाबत इतरांचीं व्याख्यानें रानड्यांच्या व्याख्यानांची बरोबरी करूं शकणार नाहींत.

भांडारकरांनीं संशोधन केलें, ग्रंथ लिहिले, त्याचें कालिक आद्यत्व व माहात्म्य प्रस्थापित केलें. सर्व आयुष्यभर विद्याकार्य केलें. साहजिक त्या सर्व कार्यानें इतरांना स्फूर्ति दिली. त्या कार्यानें अभ्यासकांची एक परंपरा निर्माण केली. संशोधकांची एक परंपरा निर्माण केली. त्यांच्यासारखें संस्कृतसंबंधीं संशोधन जरी सर्वांनीं केलें नसलें, तरी त्यांनीं भांडारकरांची संशोधनाची पद्धत घेतली. त्यांची संशोधनी वृत्ति घेतली. संशोधनामध्यें संशोध्य विषयापेक्षां संशोधनी वृत्तीचें व संशोधनी पद्धतीचें महत्त्व विशेष असतें. अविश्रांत श्रम करण्याची ताकद, साधनें गोळा करण्याची संग्रही, सापेक्षी वृत्ति, साधनांचें स्वरूप ओळखण्याची पात्रता, त्यांचें योग्य वर्गीकरण करण्याची सूक्ष्मता, त्यांतील पुरावा शोधणें व पुराव्याच्या मूल्यांची शहानिशा करणें, त्या मूल्यांप्रमाणें त्यांची प्रतवारी ठरविणें, तीं सर्व साधनें

एकमेकांजवळ जोडून मांडून त्यावरून विषयाचा नकाशा तयार करणें, त्यावरून अनुमानें व सिद्धांत प्रस्थापित करणें, व हें सर्व झाल्यानंतर साधनें जिथें उपलब्ध होत नाहींत अशा ठिकाणीं पुढील अभ्यासकांसाठीं संभाव्य तर्क फेंकून देणें, ह्या अव्वल संशोधनपद्धतींतील मुख्य अवस्था होत. ह्या अवस्था भांडारकरांच्या पद्धतींत दिसून येतात. ह्यांतील एखादी अवस्था कमी अधिक प्रमाणांत असेल; पण सर्व आहेत हें नक्की. हीच भांडारकरी संशोधनी पद्धत. ह्यांतील कोणताहि दुवा ढिला नसे. सर्व इमारत भरभक्कम खडकाच्याा पायावर उभारली असल्यामुळें इतरांनीं तिच्यावर कितीहि हल्ले केले, तरी थोडासुद्धां तिला हादरा बसत नसे. त्यांच्या संशोधनाचीं साधनें भरभक्कम व खरींखुरीं, त्यांचें वर्गीकरणहि यथायोग्य व त्यांचे सिद्धांतहि पुराव्याच्या बाहेर यत्किंचितसुद्धां न जाणारे असे असत. त्यामुळें भांडारकरांनीं प्रस्थापित केलेलीं विधानें डोळे झांकून इतरांनीं घ्यावींत, तीं कधींहि फसबिणार नाहींत अशी संशोधकांना खात्री अद्यापिहि वाटते. संशोधकाला जरूर असणारी बौद्धिक सचोटी त्यांच्याजवळ पुरेपूर होती. बुद्धीची विद्युत् चमकत नसल्याचा आरोप पत्करण्यापर्यंत त्यांची मजल गेली; परंतु थक्क करून सोडणारें असें भ्रमसात् संशोधन करून दाखविण्याचा त्यांना कधीं मोह झाला नाहीं. त्यांचें संशोधन शांत, सान्द्र व गंभीर असें वाटतें.

भांडारकरांची ही संशोधनाची परंपरा महाराष्ट्रांत कुणी व कशी चालविली हा ह्याच्या पुढचा प्रश्न. त्यांच्या हाताखालीं तयार झालेले कांहीं विद्यार्थी होतेच. कित्येकांचा गुरु या नात्यानें त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध आला नाहीं. पण त्यांच्या ग्रंथांशीं आला व त्यांना संशोधनप्रेरणा मिळाली. लोकमान्य टिळक, राजवाडे बंधु, शिवरामपंत परांजपे हे तर त्यांचे विद्यार्थी. त्यांचे ह्यांचे राजकीय व सामाजिक मतभेद विकोपाचे होते. पण गुरु इतक्या श्रेष्ठ विद्याभिरुचीचा होता कीं, टिळकांचें 'आर्टिक होम' हें संशोधन पाहिल्याबरोबर शिष्याला प्रेमानें जवळ बोलावून त्याला गुरूनें धन्यवाद दिले. राजवाड्यांच्या पहिल्या खंडाची प्रस्तावना पाहिल्याबरोबर राजवाड्यांनाहि त्यांनीं धन्यवाद दिले. भांडारकरांची परंपरा वैदिक संशोधनाबाबत टिळकांनीं चालविली. ऐतिहासिक संशोधनाबाबत राजवाड्यांनीं चालविली. जुन्या मराठी काव्याच्याबाबत शंकरराव देवांनीं चालविली. संस्कृत ललित व तर्क वाङ्मयाच्याबाबत शिवरामपंतांनीं चालविली. महाराष्ट्रांत जशी ही परंपरा वरील विद्वानांनीं चालविली, तशी गुजरातेंत केशव हर्षद्राय ध्रुव व नरसीराय भोलानाथ

दिवेटिया ह्यांनीं चालविली. महाराष्ट्रांतील परंपरा पुढें पाठक, घाटे, बेलवलकर, दीक्षित, आळतेकर, मिराशी ह्यांनीं चालविली. मुंबईच्या शाखेंत त्यांच्या बरोबरीचे तेलंग, कुंटे वगैरे होतेच. पुढें चिंतामणराव वैद्य, सुखटणकर, काणे, ठाकोर ही मंडळी निघाली. ह्यांच्यापैकीं कांहींचा भांडारकरांशीं गुरुशिष्याचा प्रत्यक्ष असा संबंध आला नाहीं. कांहीं कांहींनीं संशोधनी वृत्तीच तेवढी त्यांच्यापासून घेऊन पुढचा सर्व संशोधनप्रपंच आपल्या स्वतःच्या बौद्धिक हिंमतीवर थाटला. राजवाड्यांचा सर्व संशोधनपरिष्कार हा असा स्वतंत्र आहे. राजवाड्यांचीच फक्त परंपरा सध्यां चालल्लेली दिसते. आपटे व पोतदार दत्तोपंतद्वय, देव-भट-द्वय, हे त्या परंपरेंतील एकनिष्ठ सेवक होत. प्राचीन ग्रंथसंपादनाचें भांडारकरांचें कार्य विष्णुपंत सुखठणकर ह्यांनीं मोठ्या विस्तृत व अभिनव प्रकारानें महाभारताच्या बाबत सुरू करून जगाकडून वाहवा मिळविली. त्यांचें उर्वरित कार्य सध्यां बेलवलकर करीत आहेत. शिलालेखवाचनाचें व प्राचीन इतिहाससंशोधनाचें भांडारकरांचें कार्य स्वतः त्यांचे पुत्र देवदत्तपंत, काशिनाथपंत दीक्षित, मिराशी, डिक्सळकर व ग. ह. खरे हे सध्यांहि करीत आहेत. भाषिक संशोधन गुणे ह्यांनीं केलें. सध्यां वैद्य, कत्रे, उपाध्ये वगैरे करीत आहेत. धर्म, अलंकार वगैरे शास्त्रांतील संशोधन व विवेचन पांडुरंगपंत काणे करीत आहेत. ही उपरिनिर्दिष्ट मंडळी भांडारकरांच्या प्रत्यक्ष परंपरेंतील होती किंवा आहेत असें आमचें म्हणणें नाहीं. किंवा त्या सर्वांना त्यांच्या अध्यापकत्वाचा किंवा स्फूर्तिदातृत्वाचा लाभ झाला असेंहि आम्हांला म्हणायचें नाहीं. परंतु ह्या सर्वांचे ते अग्रणी होत हें मात्र खरें.

महाराष्ट्राबाहेरचे संशोधकहि भांडारकरांकडे स्फूर्तीसाठीं बघत असत. कलकत्त्यास तर त्यांचे चिरंजीव देवदत्तपंतत ह्यांनीं एक संशोधनशाखा स्थापिल्यासारखें केलें. त्यांचें मौर्यकालीन संशोधन व त्यांचा ‘ अशोक ’ हीं कार्यें सर्वमान्य आहेत. के. पी. जयस्वाल, हीरालाल, बी. सी. ला, एस. के. डे, आर. सी. मुजुमदार, सिद्धेश्वर वर्मा, सुनीतिकुमार चतर्जी, भट्टाचार्यजी, गौरीशंकर ओझा, गंगानाथ झा, कृष्णस्वामी अयंगार, जदुनाथ सरकार हे इतर प्रांतांतील संशोधक उल्लेखनीय होत. भांडारकरांशीं ह्यांचा कुणाचा प्रत्यक्ष संबंध आला नसला, तरी त्यांनीं आरंभिलेलें संशोधनकार्य त्यांनीं चालविलें आहे इतक्यापुरताच हा उल्लेख येथें केला.

डॉ. सर रामकृष्णपंतांचें कार्य व त्याचें महत्त्व हें अशा प्रकारचें आहे. ह्याचेंच स्मरण आम्ही आज करून ऋषिऋणाच्या फेडीची अंजलि त्यांना अर्पण करीत आहों.

# ६. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे

कै. विश्वनाथपंत राजवाडे जाऊन आज सतरा वर्षें झालीं. १९२६ सालच्या डिसेंबरच्या शेवटच्या दिवशीं ते वारले. ह्या महिन्यांत त्यांचा स्मृतिदिन किंवा श्राद्धदिन आहे. धुळें व पुणें येथें तो पाळलाहि जाईल. ज्या कार्यांत त्यांनीं आपल्या आयुष्याचीं ऐन उमेदीचीं तीन तपें वेंचिलीं तें कार्य त्यांच्या पश्चात् चाललें आहे हेंच दाखविण्याचा उद्देश ह्या स्मृतिदिनाच्या मुळाशीं आहे. नंदादीपाची वात प्रथम त्यांनीं प्रज्वलित केली. तीच हळुहळू पुढें सारून ती तेवत ठेवण्याचें काम आपण करीत आहों. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचें महत्त्व त्यांनीं ओळखलें व तीं मिळविण्यासाठीं जिवाची केवढी आटापीट केली ! त्या कामाला तसलाच माणूस पाहिजे होता. ऊन नाहीं, तहान नाहीं; घर नाहीं, दार नाहीं; अशा परिस्थितीचा व वृत्तीचा मनुष्य त्या कामाला मिळाला म्हणूनच साधनांचे बावीसतेवीस खंड निर्माण झाले, म्हणूनच पाटांगणी ज्ञानेश्वरी, राधामाधवविलास चंपू यांसारखे दुर्मिळ ग्रंथ मिळाले, म्हणूनच सुबंत, तिङन्त, संस्कृत भाषेचा उलघडा, ज्ञानेश्वरीव्याकरण, धातुकोश ह्यांसारखे मौलिक विचारसरणीचे ग्रंथ लिहिले गेले.

राजवाडे म्हणजे चालताबोलता इतिहास, चालतेंबोलतें व्याकरण. ती त्यांची उंची पुरी देहयष्टि, तो सफेत रुमाल, तो एका गुंडीचा सफेत सदरा, तें पुढचा सोगा सोडलेलें आखूड धोतर, ती हातांतील जाड काठी, तो पायांतील जाड ब्राह्मणी तळेगांवी जोडा, ती बेगुमानी व बेदरकारी मुद्रा ह्या गोष्टी आज सतरा वर्षें होऊन गेलीं तरी जशाच्या तशा दृष्टीपुढें उभ्या राहतात. चालतांना पाऊल टाकलें कीं तें लांब व जोरांतच पडावयाचें, असें कीं खालची धरित्री जणूं कांहीं नमलीच पाहिजे. जी चालण्याची गत तीच बोलण्याची. मी म्हणजे कोणी तरी विशेष, इतर सर्व माझ्यापुढें तुच्छ अशी जाणीव क्षणोक्षणीं होत असे. हे पुढें वावरणारे सर्व लोक कारकुंडे, मरण्यासाठींच जन्माला आलेले. मीच तेवढा द्रष्टा अशी बेपर्वाईची भावना असे. आदरयुक्त कुणासंबंधीं उल्लेख मिळावयाचा नाहीं. मोठ्या व्यक्तीबद्दल एखाद्या वेळेस मोठ्या कौतुकानें लाडाचा उल्लेख येई, नाहीं असें नाहीं. जी बोलण्याची गत तीच लिहिण्याची. एखाद्याच्या मागें लागले कीं त्याला पुरा केल्याशिवाय ते सोडीत नसत. गोविंदपंत बुंदेले खतम् केला (खंड १ प्रस्ता.). ब्रह्मेंद्रस्वामी खतम् केला (खंड ३, प्रस्ता.). एखाद्या विषयाच्या मागें लागले कीं तीच तऱ्हा. पुरा

थांग लावल्याखेरीज त्याचा पिच्छा सोडीत नसत. समाजाचीं मुळें, भाषेचीं मुळें, व्याकरणाचीं मुळें, उच्चारांचीं मुळें अगदीं खोदून काढलीं. संस्कृत भाषेचा उलघडा करतां करतां वेदपूर्वकालीन रानटी आर्यांच्या भाषेचें स्वरूप ठरविलें. वृद्धिगुणाचा विचार करतां करतां मूळ ध्वनि शोधून काढले. ज्ञानेश्वरीचें व्याकरण लिहून मराठीच्या इतिहासाचा पाया घातला. पानिपतची सर्व घटना उकलून सांगितली. मानभावी वाङ्मयाची संकेतलिपि उकलण्याची तर अजब किमया केली. असे एक ना दोन, किती तरी विषय अक्षरशः फोडले. पुरातत्त्वाचें असें एकहि अंग नाहीं कीं ज्यावर राजवाड्यांनीं कांहीं लिहिलें नाहीं. तुम्ही तें खोडा, चुकीचें आहे असें म्हणा, काल्पनिक आहे असें म्हणा; परंतु तें तुम्हांस विचारांत घ्यावयास हवेंच हवें; त्याशिवाय गत्यंतर नाहीं.

असा हा पुरुष बुद्धीनें जसा प्रखर व कणखर होता तसा शरीरानेंहि कणखर होता. लहानपणच्या हूडपणामुळें शरीर साहजिकच कणखर बनलेलें. त्यांत पुढें पुनः पद्धतशीर तालीम व व्यायाम. डेक्कन कॉलेजांत असतांना नावेचीं वल्हीं ते जोरांत मारूं लागले कीं, युरोपियन बोटक्लबमधील इंग्रज आश्चर्यानें तोंडांत बोट घालीत. पोहायला पडले कीं तास तास पाण्यांत डुबत असत. नदीचें पाणी तोडण्यांत तीच चपळाई व तोच जोर. येवढें झालें कीं, खाण्याजेवण्यांत तोच प्रकार. केळ्यांचा घडचा घड फन्ना करीत. जिलब्यांचें ताटच्या ताट सफा होई. त्यांच्या विशेष आवडीचे पदार्थ म्हणजे फळें. जेवणांत आवडीचा पदार्थ वरणभात आणि तूप. तुपाची सबंध वाटी वरणभातांत ओतीत. भात पानांत वाढला म्हणजे त्या ढिगाकडे पाहून आपण स्वतःच एखादे वेळेस हसत आणि 'काय हो! किती भात मी खातों!' असें म्हणत. कोणा मित्राकडे जेवायला गेले तर त्यांचा आहार पाहून वाढणाऱ्या बाईसहि धन्यता वाटे. आपण स्वयंपाक केला व ब्राह्मण समाधानानें जेवला ह्याबद्दल तिला आनंद वाटे. स्वच्छतेबद्दल कदरहि त्यांची कडक होती. कांहीं ओंगळ त्यांना खपत नसे. केर काढतांना थोडा केर राहिला कीं, एखादे वेळीं केर काढणाऱ्याच्या पाठींत केरसुणी बसे. बायकांच्या स्वयंपाकांत कांहीं अमंगळ दिसलें कीं, शिव्यांचा वर्षावच करीत व कायमचें वितुष्ट ओढवून घेत. विरक्त वृत्ति ही त्यांची पहिल्या-पासूनच होती. वडिलांच्या वेळचे सावकारी देण्याघेण्यासंबंधीं असलेले कर्जरोखे त्यांनीं आपल्या हातानें फाडून टाकले. नोकरी थोडा काळ केली. लग्नहि केलें. पण संसारांतून लवकर सुटका झाली. पुढचें सर्व आयुष्य संन्याशाप्रमाणें त्यांनीं घालविलें

स्वतां स्वयंपाक करावयाचा. स्वतः कपडे धुवावयाचे. अंगपुऱ्या फळीवर घोंगडी घेऊन उताणें निजावयाचें. पुष्कळ वेळां दोन प्रहरच्या भर उन्हांत शुद्ध ओझोन् वायु मिळतो म्हणून फिरावयास निघावयाचें. अशा एक ना दोन, किती तरी गोष्टी त्यांच्या कणखर जीवनाच्या द्योतक म्हणून सांगण्यासारख्या आहेत.

राजवाड्यांच्या कांहीं गमतीहि सांगण्यासारख्या आहेत. सर्व लोक आपल्या वाइटावर आहेत, ते आपल्याला मारायला पाहतात अशी त्यांची समजूत असे. एकदां साताऱ्यास असतांना त्यांच्या खोलीच्याजवळ कांहीं मुलें सुटी असल्यामुळें खेळत होतीं व खूप दंगाहि करीत होतीं. त्यांना काय माहीत बिचाऱ्यांना कीं, ह्या जवळच्या खोलींत राष्ट्रानें ज्याच्या जीवनाबद्दल काळजी वाहायला पाहिजे असा माणूस राहतो आहे म्हणून. मुलांचा आपला गल्का चाललाच होता. एकदा दोनदा हे गरजले. तिसऱ्यांदा आयामाया उद्धारल्या. ह्यानंतर मुलें अधिकच चेवलीं. शेवटीं यांनीं निष्कर्ष काढला कीं, पुण्याच्या मंडळाच्या लोकांनीं माझ्याविरुद्ध कट केला आहे आणि हीं मुलें त्यांनीं माझ्याविरुद्ध उठविलीं आहेत. दुसऱ्या दिवशीं अर्थात् ती जागा सोडली. एकदां असेंच टांगेवाल्याचें व त्यांचें मोठ्या विकोपाचें भांडण झालें व चाबूक-काठीची खणाखणी झाली. भांडणाचें कारण काय तर ट्रंक पुढें ठेवायची कीं मागें ठेवायची ! अखेर टांगा सोडला. त्याची भरपाई केली. स्टेशनवर जायचें राहिलें. ह्या सर्वांच्या मुळाशीं काय तर मी राष्ट्राचा इतिहास लिहितों आहें, तें ह्या पोलिसांना नको आहे, आणि त्यांनीं ह्या टांगेवाल्यास माझे विरुद्ध उठविलें. अमदाबादेस अशीच एकदां गंमत झाली. संध्याकाळीं कॉलेज हॉस्टेल रूममध्यें आम्हीं ताटें मागविलीं आणि जेवायला बसलों. गुजराथी सुरती जेवण मोठें चवदार असे. तीनचार दिवस त्यांना फार आवडलें व मोठ्या चवीनें जेवले. त्या रात्रीं आमचें जेवण चाललें असतां हजेरी घेणारा रेक्टर आला. आणि आमच्याशीं गप्पा मारीत बसला. विषय पुष्कळ झाले, त्यांत जेवणाचा विषय निघाला. राजवाड्यांनीं अन्नाची मोठी तारीफ केली. पुऱ्या यँव असतात, त्यँव असतात, असें चाललें. "अहो पण या पुऱ्या खऱ्या कणकेच्या रव्याच्या नाहींत, अहो, ह्या मक्याच्या आहेत" असें त्या रेक्टरच्या तोंडांतून बाहेर गेलें. त्याबरोबर राजवाड्यांनीं पुरी तर टाकलीच, ताट बाजूला सारलेंच पण पुरीचा अर्धा घास जो तोंडांत होता तोहि फेकून दिला. दुसऱ्या दिवशीं अर्थातच त्यांनीं अमदाबाद सोडलें. तळेगांवांस अशीच एक गंमत झाली. भाटवडेकरांच्या जुन्या वाड्यांत आम्ही राहात होतों. रोज नदीवर स्नान करावयाचें,

कपडे धुवायचे, घरीं स्वयंपाक स्वतः करायचा, भांडीं घासायचीं व लेखनवाचन करावयाचें असा क्रम असे. राधामाधवविलास चंपूची प्रस्तावना ह्या मुक्कामांत लिहिली. घरांच्या भिंतीच्या छिद्रांत डांबर ओतायचें. बरेच दिवस राहिलों. एकदां इन्शुअर्ड घेण्यासाठीं म्हणून जवळच्या पोस्टांत मी गेलों. तेथें मास्तरशीं बोलतां बोलतां भाटवडेकर वाड्याविषयीं बोलणें निघालें. मास्तर म्हणाला, 'अहो, तेथें राहतां कसे? तेथें तर परसांत शेवग्याच्या झाडावर हडळ आहे.' हें ऐकल्यावर मी तर अस्थिर झालोंच. त्या रात्रीं झोंपहि आली नाहींच. दुसरे दिवशीं त्या झाडाखालीं भांडीं घासावयास बसवेना. आम्ही त्या शेवग्याच्या शेंगा रोज मुगाच्या आमटींत घालीत असूं. त्या शेंगाहि मला काढवत ना. राजवाडे म्हणाले, 'अहो, झालें काय?' मग त्यांना मीं हडळ, तो शेवगा वगैरे सर्व सांगितलें. तेहि चलितचित्त झाले. वर दाखविलें मात्र नाहीं. दोन प्रहरच्या जेवणास कांहीं आम्ही त्या वाड्यांत राहिलों नाहीं. सरळ आपली अण्णा विजापूरकरांच्या घराची वाट धरली. कांहीं न सांगतां तेथें जेवलों. संध्याकाळीं तळेगांवहि पण सोडलें. एकदां पुनः अशीच मजा झाली. आणि ते व मी असे दोघे पुष्कळ वेळ एकमेकांकडे बघत हसत राहिलों. तळेगांवलाच आमचा मुक्काम होता. दोन प्रहरची वेळ. जेवण करून आम्ही दोघेहि थोडेसे लवंडलों होतों. मी खालीं होतों व ते माडीवर आपल्या नेहमींच्या बाकावर उताणे निजले होते. डोक्यांत वृद्धिगुण होतांना उच्चारांत फरक कसे होतात हा विषय घोळत होता. वर आढ्याकडे दृष्टि लावून अ, आ, इ, ऐ, उ, ओ, ऋ, आर्, ऌ, आल् असे निरनिराळे ध्वनि तोंडांतून निघत होते. हे ध्वनि थोडे थोडके कांहीं तरी पंधरा मिनिटें सारखे निघत होते. सारखें हूं, हूं, हिं, हॅंय, हॅंल, हुं, हिं आपलें चाललें होतें. कांहीं वेळानें झाडलोट करणारी म्हातारी आली. तिनें तें जिन्यांतून ऐकलें. त्याबरोबर ती पायरीवरच थबकली. बाबा कांहीं आजारी झाले कीं काय? असा तिला संशय आला. नेट करून कशी तरी ती वर आली व बोलली, "बाबा! आज असें कायव्ह करतां? तुम्हास्नी काय व्हतंय? काय दुखतंय? मी रगडूं का? चोळतें वाटलं तर मी." ती सारखी म्हणत होती, "मी रगडतें, चोळतें, दम खा जरा." ते सारखे म्हणत होते, "तसं कांहीं नाहीं, मला कांहीं होत नाहीं गो, मी चांगला बरा आहें. कांहीं झालं नाहीं." वर कांहीं भांडण चाललंय कीं काय म्हणून मी वर गेलों. पाहतों तों दोघांची आपली हुज्जत सारखी चालली आहे. मग थोड्या वेळानें खरा प्रकार समजून आला आणि त्या बाईची मग मीं समजूत घातली. वृद्धि काय, आणि गुण काय, आणि त्यांच्या

उच्चारांतील फरक काय, त्यांचें त्या बाईला काय होय! तिला आपलें सारें कण्हणें वाटलें. आम्ही आपले हसतच राहिलों. मीं म्हटलें, "बस करा तुमचे हे गुणवृद्धि. एकदम खरेखुरेच आजारी पडाल. आणि खरेच आजारी पडलां तर तुमचे ऋणानुबंधी आतहि जवळ असणार नाहींत. त्यांना कळायचेंहि नाहीं. दुसरेच कोणी तुमची शुश्रूषा करतील."

आणि शेवटीं अगदीं तसें झालें. त्यांच्या शेवटच्या आजारपणांत त्यांच्या ऋणानुबंधींचें दुर्दैव हें कीं, त्यांच्यापैकीं कोणीहि त्यांच्याजवळ नव्हते. शंकरराव देव नव्हते, भास्करराव भट नव्हते. पोतदार, आपटे, मुंडले, मेहेंदळे, चांदोरकर, डॉ. केतकर, मायदेव, कुलकर्णी ह्यांपैकीं कोणीहि जवळ नव्हते. ह्या सर्वांनीं त्यांची थोरल्या भावाप्रमाणें काळजी वाहिली. परंतु अंतकाळीं डोक्याखालीं मांडी देण्याचें भाग्य एकालाही लाभलें नाहीं. शुश्रूषा सर्व यथायोग्य झाली हें खरें. अशा रीतीनें असा हा शरीरानें कणखर, बुद्धीनें कणखर, भावनेनें कणखर, विचारानें कणखर, अभ्यासानें कणखर, लेखनानें कणखर, विरागी, निष्ठावंत कार्यकर्ता पुरुष गेला. असे पुरुष नेहमीं होत नाहींत. आज श्राद्धतिथीच्या निमित्तानें त्यांच्या पुण्यस्मृतीस नमन असो!

अशीं माणसें राष्ट्रांत कालान्तरानेंच निर्माण होतात. राष्ट्रांतील दैन्य पाहूनच राष्ट्रोत्थापनाची स्फूर्ति त्यांना होते. तेंच आपल्या उभ्या आयुष्याचें ध्येय ठरवून त्याच्या संपादणींत ते आपलें सर्व आयुष्य वेचतात. सतराव्या शतकांतील व पूर्वीच्या लगतच्या काळांतील परकीय महमदी आक्रमणानें मराठा समाजाची हलाखीची अवस्था पाहून त्या समाजाला सावरण्याची स्फूर्ति शिवाजीमहाराजांना झाली, व त्या स्फूर्तीच्या बळावर त्यांनीं राष्ट्रोत्थापनाचा प्रयत्न केला. तेंच वैचारिक दैन्य समर्थांनीं पाहिलें. दैन्य तेंच, स्फूर्ति तीच व राष्ट्रोत्थापनाचा प्रयत्नहि तसलाच. सर्व मराठा समाजाला ह्या दोघांनीं उभें केलें. समाजहि उत्स्फूर्त होऊन आक्रमक शत्रूपुढें ठाम उभा राहिला. कर्दमांतून राष्ट्र वर निघालें व तेजानें तळपूं लागलें. एकोणिसाव्या शतकांत पुनः अवस्था तशीच झाली. त्याच भौतिक व वैचारिक दैन्यानें राष्ट्राला पुनः पछाडलें. पाश्चात्य भड़क संस्कृतीच्या पुढें राष्ट्राचें तेज फिकें पडलें. राष्ट्रांत पराभूत वृत्ति पसरली. हीनगंड निर्माण झाला. जो तो विचारवंत त्याचीं कारणें व त्यावर उपाय शोधूं लागला. आपापल्या मगदुराप्रमाणें जो तो प्रयत्न करूं लागला. निरनिराळे उपाय अवलंबिले गेले. वैचारिक व सांस्कृतिक

बाजू कांहीं विचारवंतांनीं सावरण्याचा प्रयत्न केला. लोकहितवादी, ज्योतिराव फुले, विष्णुबुवा ब्रह्मचारी, शास्त्रीबुवा, माधवरावजी रानडे, लोकमान्य टिळक, आगरकर इत्यादि महनीय व्यक्तींनीं राष्ट्राला हीनगंडाच्या गर्तेतून वर काढून पूर्वीच्या सांस्कृतिक वैभवांत प्रतिष्ठित करण्याची हाव धरली.

अशा ह्या महनीय व्यक्तींच्या परंपरेंतीलच राजवाडे होत. ह्यांनीं आपल्या प्रयत्नाचें क्षेत्र, वैचारिक व सांस्कृतिक क्षेत्र निश्चित केलें. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं दुसऱ्या क्षेत्रांत तशीच वेळ जर आली असती तर ते कमी पडले असते. ·हा गृहस्थ खरा क्रांतिवादीच होता. इंग्रजाला हाकललें पाहिजे हें त्यांचें नेहमींचें पालुपदच असे. ह्यासाठीं ज्यांनीं ज्यांनीं प्रयत्न केले व जे जे प्रयत्न करीत आहेत त्यांचें ते नेहमीं बोलतांना आदरानें कौतुकच करीत. इंग्रजाला हाकलण्याचा मार्ग एकच आणि तो म्हणजे त्याच्यासारखीं शस्त्रें तयार करून त्यांच्याशीं रणक्षेत्रांत सामना द्यावयाचा. त्यांच्यासारखींच यंत्रें तयार करूनच त्याच्याशीं औद्योगिक क्षेत्रांत सामना द्यावयाचा. त्याच्यासारखीच विद्या व संस्कृति पैदा करूनच त्याच्याशीं सांस्कृतिक क्षेत्रांत सामना द्यावयाचा. शस्त्रें व शास्त्रें निर्माण करणें फार कठिण. त्याला बुद्धि जरी असली तरी पैसा कोठला आणावयाचा ? पण तेंहि त्यांनीं केलें. तो त्यांचा प्रयत्न पाहिला म्हणजे आतां आपल्याला हसूं येतें. महादेव मोरेश्वर कुंटे हेहि त्याच मताचे, परंतु ते पडले सरकारी नोकर. तरी पण आंत सारखी तळमळ इंग्रजाला हाकलून द्यायची. मुंबई विद्यापीठाचे ते एक आद्य पदवीधर. त्या काळांतील एक नामवंत जाणकार, त्या काळच्या पदवीधरांत तेच सर्वांत वडीलधारे. त्या काळचे बुद्धिवान् व तळमळीचे सुशिक्षित तरुण त्यांच्याकडे नेहमीं जात येत. तेहि त्यांना सल्ला देत, राष्ट्रकार्याची स्फूर्ति देत. त्यांना एक नाद असे. इंग्रजाशीं औद्योगिक क्षेत्रांत सामना द्यायचा. त्याच्यासारखीं यंत्रें चालविल्या-खेरीज हें कांहीं होणार नाहीं. तेव्हां कुंट्यांच्या डोक्यांत एक कल्पना आली. त्यांनीं काड्यांच्या पेट्यांचा एक छोटासा कारखाना काढला. त्याचें एक यंत्र आणलें. तें आपल्या घरीं ठेवलें. लाकडाचे तुकडे व त्याच्या लहान लहान काड्या करायचें एक भलें मोठें चाक होतें. तें चाक कुंटे स्वतः फिरवीत. रोजच्या फुरसतीच्या वेळांतला कार्यक्रमच हा. आपण स्वतःच चाक फिरवायचें, इतकेंच नव्हे तर इतर जीं मुलें त्यांच्याकडे येत त्यांनाहि तें चाक फिरवायला लावीत. कां तर इंग्रजासारखीं आपणहि यंत्रें हाताळलीं पाहिजेत. राजवाडे हे कुंट्यांच्याकडे नेहमीं

जात. ते शरीरानें चांगले धट्टेकट्टे होतें. तेहि तें चाक नेहमीं फिरवीत बसत. सकाळचा हा एक नित्याचा उद्योगच. आंतील तळमळ ही कीं इंग्रजाशीं औद्योगिक क्षेत्रांत सामना द्यायचा. हें चाक फिरविणें बरेच दिवस चाललें. पुढें कुंटेहि थकले. राजवाडेहि थकले. अशानें का कुठें इंग्रजाची बरोबरी होणार? कुठें इंग्रजाचें यंत्रसामर्थ्य व कुठें हें चाक. उद्योग फसला पण त्या दोघांची तळमळ ह्यावरून दिसून येते.

शस्त्राच्या साहाय्यानें इंग्रजांविरुद्ध सामना देणें कठिण. शास्त्राच्या साहाय्यानेंहि सामना देणें कठिण. सामना देण्याचीं हीं दोन क्षेत्रें गेलीं. मग राहिलें तिसरें विद्येचें व संस्कृतीचें क्षेत्र. तेंच राजवाड्यांनीं आपल्या आयुष्याचें ध्येय ठरविलें. तोच ध्येयाचा तारा दृष्टीपुढें ठेवून त्यांनीं आपल्या आयुष्याचें तारूं वल्हविलें, व त्यांत त्यांनीं त्यांच्या सर्व प्रयत्नांची एकुणात पाहतां पल्ला बराच गांठला असें म्हणावयास हरकत नाहीं.

ह्या सांस्कृतिक क्षेत्राचा पहिला टप्पा म्हणजे राष्ट्राचा इतिहास. कोणत्याहि राष्ट्राला आपला इतिहास समजल्याखेरीज त्याला पुढचें पाऊल कसें टाकावें हें समजत नाहीं. राष्ट्राच्या जीवनांत इतिहासाला फार महत्त्व आहे. जसा खरा इतिहास असतो तसा खोटाहि इतिहास असतो. किंवा तसा तो नसला तर बनवितातहि. जेते लोक एखादें जित राष्ट्र आपल्या ताब्यांत राहावें म्हणून त्या जित राष्ट्राचा इतिहास तसा बनवितात. एखादें पराक्रमी राष्ट्र आपल्या अहंगंडाच्या समाधानासाठीं आपला खोटा इतिहास तयार करतें. भारताचा काय किंवा महाराष्ट्राचा काय, तसा इतिहास अव्वल इंग्रजींत थोडाबहुत तयारहि झाला. तेव्हां खरा इतिहास आहे तरी काय हें पाहण्याची जिज्ञासा त्या काळांत कांहीं विद्वानांना झाली. कांहींनीं इंग्रजकृत इतिहासांतील चुकांचें माप त्यांच्या पदरांत टाकलें. परंतु एवढ्यानें काम भागत नाहीं. अमुक एक इतिहास खोटा ठरविल्यानंतर खरा इतिहास सांगण्याची जबाबदारी सांगणारावर पडते. इतिहास ठरवावयाचा झाला तर त्याला साधनें गोळा करावीं लागतात. तत्कालीन कागदपत्र-साधनें हा तर इतिहासाचा आत्मा. हीं साधनें गोळा करण्यासाठीं राजवाड्यांनीं कंबर बांधली. साधनें मिळविण्यासाठीं त्यांनीं प्रवास काय केला, दप्तरें काय धुंडाळलीं! अक्षरशः पोट बांधून हें काम करण्यांत उभी हयात खर्चली. पूर्वी बुद्धाच्या काळीं त्याच्या जीवनाचीं रहस्यें समजावीं, त्याच्या धर्मांतील कोडीं उकलावीं व निर्वाणाचा टप्पा गांठतां यावा म्हणून कांहीं बौद्धधर्मीयांनीं अत्यंत परिश्रम केले. आपला आणि चीनचा काय संबंध? परंतु कित्येक निष्ठावंत चिनी बुद्धभिक्षूंनीं बौद्धग्रंथ मिळ-

विण्यासाठीं काय प्रवास केला, काय कष्ट सोसले. फा हैन हुएन त्सँग, इत्सिंग, ह्यांचे प्रयत्न पाहिले म्हणजे मन आश्चर्यानें थक्क होतें. राजवाड्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें गोळा करण्यासाठीं असेच प्रयत्न केले, महाराष्ट्रांत असाच प्रवास केला. असेच कष्ट सोसले. साधनें गोळा करण्यांत ते इतके रमले कीं साधनें आणि ते एकरूप झाले. पुढें पुढें तर असें झालें कीं, साधनांच्या पाठीमागें शोधत राजवाडे जाण्याच्याऐवजीं तीं साधनेंच राजवाड्यांच्या मागें त्यांचा शोध करीत येऊं लागलीं. साधनांच्या पहिल्या खंडांत छापिलेलीं सर्व पत्रें एका ठिकाणीं एका गटानें एरव्हीं त्यांच्या हाताशीं येतीं ना. अस्सल ऐतिहासिक साधनांचे तेवीस खंड प्रसिद्ध केले. प्रत्येक कागदाची त्याच्या आंतील मजकुराच्या संदर्भावरून तिथि. ठरविली. तीं सर्व कालक्रमानें लाविलीं. त्यांतील आशय समजून घेतला. तो इतर उपलब्ध छापील मजकुराशीं ताडून पाहिला. त्यांतील कमीअधिक मजकुराची नोंद केली. ज्या विशिष्ट कालखंडांतील व ज्या विशिष्ट ऐतिहासिक प्रसंगाचीं तीं साधनें असत त्या कालखंडाचा व प्रसंगाचा ऐतिहासिक चित्रपट आपल्या मनाशीं उभा करून त्यांतील खाम्या ह्या प्रस्तुत साधनांनीं कशा भरून जातात हें दाखविलें. इतिहास-साधनांचें संपादन करावयाचें म्हणजे फार कष्टाचें काम आहे. त्यांचा तिथिनिश्चय करावयाचा म्हणजे कोण जिकिरी! त्यांचा हा कष्टसाध्य परिष्कार करणें हेंहि एकवेळेस परवडेल परंतु त्यांच्यावर आधारलेली प्रस्तावना लिहिणें हें फारच दुष्कर. पत्रांमधील विषय त्यांच्या डोक्यांत सारखा घोळत असावयाचा. त्यावर त्यांचें सारखें मनन, चिंतन चाले. निवडलेले कागद खालीं कालवार मांडून ठेवायचे. त्यांतील प्रसंगांचे धागे जुळवायचे. ते एकापुढें एक नोंदायचे. अशा रीतीनें ती प्रस्तावना सजायची.

अशा प्रस्तावना राजवाड्यांनीं पुष्कळ खंडांना लिहिल्या. त्यांच्या मराठ्यांच्या इतिहासाची सूत्रबद्ध संगतवार प्रथमपासून शेवटपर्यंत मांडणी त्यांच्या हातून झाली नाहीं हें खरें. असा संगतवार इतिहास लिहायची वेळ अद्याप आली नाहीं असें ते म्हणत. अद्याप साधनें अपुरीं आहेत. तीं प्रथम उजेडांत आणिलीं पाहिजेत. साधनांशिवाय इतिहास लिहिला तर तो पुरा इतिहास होणार नाहीं. मराठी इतिहाससंशोधकांचें अद्यापहि हेंच मत आहे. इतिहाससाधनांचीं पन्नास हजारांवर छापील पृष्ठें उपलब्ध असलीं तरी कोणा महाराष्ट्रीय संशोधकाकडून मराठ्यांचा नवा संपूर्ण, सांगोपांग, स-तत्त्वज्ञान असा इतिहास आजपर्यंत जो झाला नाहीं त्याला हें कारण आहे.

सरदेसाई ह्यांनीं एक लिहिला आहे हें खरें. परंतु महाराष्ट्रांत गिब्बन अद्याप निर्माण व्हायचा आहे, एखादा मोमूसेन अद्याप निर्माण व्हावयाचा आहे हें तितकेंच खरें आहे. संपूर्ण इतिहासच काय, पण मराठा स्वराज्याचे निर्माते एवढे शिवाजी महाराज ना? त्यांचेंहि प्रमाणभूत चरित्र आजवर मराठ्यांकडून निर्माण झालें नाहीं. ह्यासाठीं आपणास अद्याप परप्रांतीयांच्या तोंडाकडे बघावें लागत आहे. असा इतिहास राजवाड्यांच्या हातून जरी निर्माण झाला नाहीं तरी ह्या त्यांच्या प्रस्तावना म्हणजे त्रुटित कां होईना, पण एक इतिहासच आहे. पहिल्या, तिसऱ्या, सहाव्या, आठव्या वगैरे खंडांच्या प्रस्तावना म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाचें व भाषेचें तें एक तत्त्वज्ञानच आहे. साधनांवर प्रदीर्घ व तत्त्वविवेचक प्रस्तावना राजवाड्यांनींच लिहाव्या. राधामाधवविलास चंपू, महिकावतीची बखर, व हे साधनखंड ह्या सर्वांच्या प्रस्तावना हेंच राजवाड्यांच्या प्रयत्नांच्या मुळाशीं असलेलें तत्त्वज्ञान. ह्या प्रस्तावना लिहितांना त्यांची जशी कांहीं त्या विषयांत समाधि लागत असे. अष्टौप्रहर दुसरा विषय डोक्यांत नसे. ते अंगमोजक्या बांकावर उताणे निजून वर आढ्याकडे दृष्टि लावून लेख्य विषयाचा विचार करीत. अशी एखादी प्रस्तावना लिहून झाली म्हणजे मग त्याचा त्यांना शिणोटा येई व तो घालवण्यासाठीं मग ते कुठें तरी विश्रांतीसाठीं जात. ते नेहमीं म्हणत कीं श्रमानें झालेली झीज मला भरून काढली पाहिजे.

इतिहासाचीं साधनें व त्यांच्या प्रस्तावना ह्यांची ही अशी हकीकत आहे. तशा प्रस्तावना व तत्त्वज्ञान हें त्यांच्यानंतर त्यांचे आवडते व विद्वान् शिष्य दत्तोपंत आपटे ह्यांनींच लिहिल्या. ‘शिवभारत’ व ‘मुधोळकर घोरपड्यांचीं फर्मानें’ ह्यांच्यावरील त्यांच्या प्रस्तावना त्या स्वरूपाच्या व त्या तोलाच्या आहेत. इंग्रजी नाटकावरील बर्नार्ड शॉच्या जशा प्रस्तावना तशा राजवाड्यांच्या ह्या प्रस्तावना आहेत.

मराठ्यांच्या इतिहासावरून त्यांचें लक्ष मराठी भाषेच्या इतिहासाकडे वळलें. ह्या क्षेत्रांतीलहि त्यांचें कार्य फार उच्च आहे. सुबंतविचार, तिङन्तविचार, ज्ञानेश्वरी-संपादन, ज्ञानेश्वरीचें व्याकरण, संस्कृत भाषेचा उलगडा, गुण व वृद्धि विचार, मराठी धातुकोश व नामादिकोश हे त्यांच्यापैकीं कांहीं उल्लेखनीय प्रयत्न होत. हें सर्व मौलिक लिखाण आहे. सुबन्त व तिङन्त विचार हे दामले ह्यांच्या शास्त्रीय मराठी व्याकरणावरील टीकालेख होत. परंतु त्यांतील नामसाधनिका व क्रियापद-साधनिका ह्यांवरील विचारसरणी फार सूक्ष्म आहे.

ज्ञानेश्वरीच्या संपादनानें तर भाषिक विचारांत क्रांति केली. ह्या ग्रंथाची प्रस्तावना अशीच विस्तृत आहे. त्यांत संस्कृत-प्राकृत भाषांचीं परस्पर साम्यें व कालनिश्चिति केली आहे. त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणानें मराठी ऐतिहासिक व्याकरणाचा पाया घातला. 'संस्कृत भाषेचा उलगडा' ह्या ग्रंथांतील विवेचन त्याहिपेक्षां सूक्ष्म व मौलिक आहे. त्यांत राजवाड्यांनीं संस्कृत भाषेचें तर स्वरूप उकललें आहेच, परंतु पाणिनीच्या सूत्रांच्या व त्यावरील वार्तिकांच्या आधारें पाणिनिपूर्व संस्कृत, आद्य आर्यभाषा ह्यांचेंहि स्वरूप अजमाविलें आहे. वेदपूर्वकालीन आर्यभाषा पाश्चात्य संशोधकांनीं कल्पिली आहे. ती सर्व उपलब्ध प्राचीन आर्योद्भव भाषांच्या तौलनिक संशोधनानें ठरविली आहे. ह्या प्रयत्नासारखाच राजवाड्यांचा हा प्रयत्न आहे. तुमन्त, ल्यबन्त, लिट्, लुङ्, लुङ्‌ वगैरे त्या भाषांतील आख्यात रूपें त्यांनीं अनुमानिलीं आहेत. हें त्यांचें भाषिक संशोधन इतर पाश्चात्य संशोधकांच्या संशोधनाशींहि जुळतें. ही झाली त्या प्राचीन भाषेच्या रूपसिद्धीची बाब. परंतु ह्याच्याहिपेक्षां सूक्ष्मतर बाब म्हटली म्हणजे त्या प्राचीन वेदपूर्वकालीन आर्यभाषेच्या वर्णप्रक्रियेची. आणि हीहि राजवाडे ह्यांनीं आपल्या 'गुण व वृद्धि' ह्या प्रबंधांत विशद केली आहे. भाषेमध्यें स्वरांच्या उच्चारांत गुणवृद्धीचे फरक जे होतात ते शब्दाच्या अर्थाच्या दृष्टीनें होतात. भाषेचा आणि समाजाचा अन्योन्य संबंध असतो. समाजांतील कुटुंबाच्या संततींत वृद्धि झाली कीं ती तत्संबंधीं शब्दाच्या उच्चारांत बदल करून दाखविली जाई. वृद्धि, बहुत्व, आतिशयित्व, अनेकत्व इत्यादि गोष्टी गुण, वृद्धि, अभ्यास इत्यादि वर्णप्रक्रियांच्या मुळाशीं कशा असतात हें त्यांनीं स्पष्ट केलें आहे. हें सर्व भाषिक संशोधन मौलिक स्वरूपाचें आहे.

पण ह्याच्याहिपेक्षां सूक्ष्म व अफाट असा प्रयत्न त्यांचा मराठी धातु, नामें वगैरे ह्यांच्या व्युत्पादनासंबंधींचा होय. आणि हा त्यांचा प्रयत्न सन १९०१ पासून सतत आयुष्यभर चालला होता. धर्मादाय पेटींत पै पैसा टाकून टाकून तींत जसा नकळत हळुहळु धनसंचय होतो व त्या धनसंचयावर एखाद्या देवालयाचा जीर्णोद्धार केला जातो तसेंच राजवाड्यांच्या व्युत्पत्तीचें असे. ते नेहमीं एखाद्या शब्दाची व्युत्पत्ति सांपडली कीं ती लगेंच एका चिठ्ठीवर लिहून पेटींत टाकीत. व्युत्पत्ति आढळली रे आढळली कीं लगेंच ती पेटींत गेलीच. असा हा क्रम अव्याहत चाले. ह्या रोजच्या अखंड व्यवहारानें तो चिठ्यांचा खजिना वाढत वाढत खूप वाढला. आणि त्याची मोजदाद करतात तों त्यांतील नुसत्या धातूंची

संख्या तीस हजारांवर गेली. चिठी दोन बोट रुंदीची तावाची असे. तीवर प्रथम ते मराठी धातु लिहीत. त्याच्यापुढें संस्कृत धातु नंतर जुन्या मराठी ग्रंथांतील अवतरण अशी त्यांची मांडणी असे. नंतर त्यांनीं त्यांपेक्षां जरा जाड चिठ्या तयार केल्या व त्यांवर ते सर्व धातु लिहिले. एखाद्या धातूचा परिष्कार फार मोठा असला तर ते तो मोठ्या कागदावर लिहीत. कांहीं कांहीं चिठ्यांतील सदरें सत्तावीसपर्यंत गेलीं होतीं. मराठी धातु ( संस्कृत धातु, गण, अर्थ, णिच्, अभ्यस्त, चर्करित, यङ्लुङन्त, उतारे ) मराठी अर्थ, प्राचीन मराठी अवतरणें इतकी सामग्री तर बहुतेक चिठ्यांत असे. ह्या तीस हजार धातूंच्या संभारांत आवृत्तिपुनरावृत्ति झाली असल्यास नवल नाहीं. परंतु हें त्यांचें संशोधन प्रसिद्ध होण्याच्या पूर्वी राजवाडे ह्यांचें देहावसान झालें. तें काम नंतर प्रस्तुत लेखकानें आपल्या मगदुराप्रमाणें पुरें केलें. हाच त्यांचा मराठी धातुकोश. ह्या ग्रंथाच्या परिष्कारास राजवाडे ह्यांच्या संशोधनबुद्धीच्या व प्रयत्नांच्या परिपाकाचा लाभ होऊं शकला नाहीं हें दुर्दैवच म्हणावयाचें.

राजवाडे ह्यांच्या इतिहास व भाषा ह्यासंबंधींच्या प्रयत्नांची येथवर हकीकत थोडक्यांत सांगितली. त्यांनीं समाजशास्त्रासंबंधींहि प्रयत्न केले. त्यासाठीं एक मंडळहि काढलें. शहरसफाई करण्यासाठींहि एक मंडळ काढलें. हे त्यांचे इतर प्रयत्न तर आहेतच. पण केवळ सांस्कृतिक प्रयत्नाबद्दलच फक्त बोलावयाचें म्हटलें तर महाराष्ट्रसंबंधीं पुरातत्त्वशास्त्रांपैकीं अशी एकहि बाब शिल्लक नाहीं कीं तिजसंबंधीं राजवाडे ह्यांनीं कांहीं लिहिलें नाहीं. त्यांचें विधान माना अगर न माना, त्यांचा सिद्धांत तुम्हांला पटो अगर न पटो, त्यांचें संशोधन अव्याप्त असो अगर अतिव्याप्त असो—कांहींहि असो परंतु त्याबाबत केलेल्या कार्यांची प्रत्येक संशोधकाला दखलगिरी घ्यायलाच हवी.

# ७. राष्ट्रोत्थापनी लेखक व संशोधक लोकमान्य टिळक

गेलीं पंचवीस वर्षें हिंदुस्थानांत राष्ट्रोत्थापनाचें कार्य मोठ्या अद्वितीय व अभूतपूर्व अशा रीतीनें चाललें आहे. सबंध जगाच्या इतिहासांत हिंदुस्थानांत चालविलेल्या राष्ट्रोत्थापनाच्या ह्या प्रयत्नासारखा दुसरा प्रयत्न सांपडणें कठिण आहे. ह्याच्यासारखा हाच. पूर्वींहि तसा दुसरा झाला नाहीं, व पुढेंहि तसा दुसरा होईल किंवा नाहीं ह्याविषयीं शंकाच आहे. राजकारण किंवा राष्ट्रोत्थापन हे आधिभौतिक तत्त्वज्ञानाचे विषय आहेत. ह्यांत आधिदैविक तत्त्वज्ञानाला तर वाव नाहींच नाहीं, परंतु आध्यात्मिक तत्त्वज्ञानालाहि वाव फारसा नाहीं. आजवर पुष्कळ राष्ट्रें उदयास आलीं, पुष्कळ साम्राज्यें चाललीं, परंतु त्यांच्या उत्थापनाच्या बाबत आध्यात्मिक तत्त्वज्ञानाचा उपयोग झाल्याचीं उदाहरणें फारच क्वचित् आळढतील. हिंदुस्थान मात्र तसें एक उदाहरण आहे. हिंदुस्थानांत अध्यात्मशास्त्राचा विकास झाला व त्यानें आध्यात्मिक स्वातंत्र्यहि मिळवून दिलें. पण त्याचा राजकारणाशीं प्रत्यक्ष संबंध आला नाहीं. तो गेलीं पंचवीस वर्षें सारखा येत आहे; इतकेंच नव्हे, तर त्या अध्यात्म तत्त्वज्ञानानें राजकारण अगदीं व्यापून टाकलें आहे. अद्याप त्याचें यश मोजण्याची योग्य वेळ आली नाहीं. इतकें मात्र खास, कीं तें यशाच्या मार्गावर आहे. राष्ट्रोत्थापनाचें जें ध्येय आधिभौतिक स्वातंत्र्य त्याचा ध्रुवतारा अद्याप आटोक्यांत आला नाहीं तरी दृष्टीच्या टप्प्यांत आला आहे, हें खास.

परंतु ही तरी तयारी येथवर कशी करतां आली ? ह्या सध्यांच्या राजकारणाला तरी अधिष्ठान कोणतें लाभलें ? कोणी म्हणतील, राष्ट्रसभेनें आरंभिलेल्या व त्याच्यापूर्वीं सतत चाळीस वर्षें चालविलेल्या कार्याचें हें पर्यवसान आहे. नाहीं, सुतराम् नाहीं. ह्यूम्, वेडरबर्न, दादाभाई, रानडे, बानर्जी, मेथा, गोखले ह्यांपैकीं कोणीं राजकारणांत आत्मिक मूल्यें घुसडलीं ? कोणींहि नाहीं. ह्या आत्मिक मूल्यांचें मुख्य अधिष्ठान महात्मा गांधी हेच होत. परंतु त्यांच्याहि आत्मिक मूल्यांना हिंदी राजकारणांत अवसर कसा मिळाला ? त्यांची शक्यता कोणीं निर्माण केली ? त्यांच्यापूर्वीं रूढ असलेल्या टिळकराजकारणांत ही शक्यता निर्माण केलेली दिसून येते काय ? लोकमान्य टिळक ह्यांच्या राजकारणावरच गांधी ह्यांनीं आपलें राजकारण उभारलें.

सध्यां जरी राजकारणांत आत्मिक मूल्यांचें प्राधान्य बेसुमार वाढलें असलें तरी, व सर्व हिंदी राजकारण एकजात अध्यात्मीकृत (spiritualized) झालें असलें तरी, कधीं कधीं टिळकी राजकारण मधून मधून डोकें वर काढतेंच. आणि तें इतकें जोरानें डोकें वर काढतें कीं, किंचित् काल कां होईना, पण सर्व लोक त्या उसळीसरशीं चकितच्च होतात. इतकेंच नव्हे तर आध्यात्मिक राजकारणाचे मुरब्बी देखील त्या आंदोलनाची मुक्तकंठानें स्तुति करतात. टिळकांच्या राजकारणाचा हा खरोखरच्च मोठा विजय होय. खरें पाहिलें तर १९४२ चें आंदोलन, 'चलेजाव'चा प्रस्ताव वगैरे बाबी, गांधींच्या आध्यात्मिक राजकारणी तत्त्वज्ञानाच्या चौकटींत बसण्यासारख्या नाहींत.

गांधीवादी राजकारणास योग्य अशी भूमि टिळकांनीं तयार केली. ती तशी तयार करण्याचें कार्य सतत तीस पस्तीस वर्षें केलें. सर्व बाजूंनीं त्यांनीं प्रयत्न केला. जो जो उपाय त्यांना योग्य व उपकारी वाटला तो तो त्यांनीं अवलंबिला; जी संधि सांपडली ती पकडली; जी व्यक्ति साहाय्यभूत झाली तिला त्या कार्यांत राबवून घेतलें; त्यासाठीं लेख लिहिले; त्यासाठीं लोकांना जागृत केलें; त्यासाठीं खडतर तुरुंगवास पत्करला; त्यासाठीं कोर्टकचेऱ्या केल्या; त्यासाठीं दौरे काढले व परदेशचा प्रवासहि केला. कर्तबगारीचीं जीं कांहीं त्यांना पस्तीस वर्षें लाभलीं त्या सर्व वर्षांत त्यांचा आपला हा झगडा चाललाच होता. राज्यकर्त्यांशीं तर हा झगडा चाललाच होता, पण कित्येक वेळां हा झगडा त्यांना स्वकीयांशींहि करावा लागला. आयुष्याच्या ऐन उमेदीच्या कालांत मोठ्या उदात्त हेतूनें आरंभिलेलें शाळेचें कार्यहि त्यांना सोडावें लागलें; कॉलेजमधील अध्यापनाचें कार्यहि सोडावें लागलें. डेक्कन कॉलेजच्या जवळच्या टेकडीवर कित्येक रात्रीं तन्मयतेनें केलेल्या ध्येयसंलापानें हृदैक्य झालेल्या मित्राचा कायमचा वियोग पत्करावा लागला. कित्येक हालअपेष्टा झाल्या, मानखंडना झाल्या, परंतु टिळकांनीं आपल्या समोरच्या ध्येयताऱ्यावरील दृष्टि तिळमात्र चळूं दिली नाहीं. एकदां आपल्या ध्येयाचा तारा निश्चित केल्यानंतर तो साध्य होण्यासाठीं त्यांनीं लोकांचें चहूं बाजूंनीं उत्थापन केलें.

टिळकांच्या राजकारणी जीवनाचे तीन मुख्य टप्पे आहेत. त्याचे मुख्य तीन भाग पडतात. पहिला भाग १८८१ मध्यें केसरी-मराठा सुरू झाल्यापासून १८९७ सालीं त्यांच्यावर राजद्रोहाचा पहिला खटला होऊन त्यांना दीड वर्षाची सश्रम कैदेची शिक्षा होईपर्यंतचा होय. दुसरा भाग ह्या शिक्षेनंतर सुरू होतो; व

त्याचा आरंभहि त्यांनीं स्वतःच "पुनश्च हरिः ॐ" केला. ह्या दुसऱ्या भागाचा शेवट १९०८ सालीं झाला. ह्याहि वर्षीं त्यांच्यावर राजद्रोहाचा दुसरा खटला होऊन त्यांना सहा वर्षांची शिक्षा झाली. तिसऱ्या भागास कैदेंतून सुटून आल्यानंतर म्हणजे १९१४ मध्यें सुरुवात झाली. १९१४ सालापासून तों त्यांच्या देहावसानापर्यंतचा म्हणजे १९२० पर्यंतचा हा तिसरा भाग होय. पहिल्या भागाच्या आरंभीं आरंभीं जसें त्यांना आगरकरांचें साह्य झालें तसें तिसऱ्या भागाच्या आरंभीं प्रामुख्यानें त्यांना केळकरांचें साह्य झालें. 'केसरी'स आरंभींची प्रतिष्ठा जशी आगरकरांनीं मिळवून दिली तशी १९०८ च्या नंतरची प्रतिष्ठा केळकरांनीं मिळवून दिली. शेवटच्या तिसऱ्या भागांत टिळकांनीं 'केसरी'चें संपादन प्रत्यक्ष जरी केलें नाहीं, तरी त्यांचा त्यावर एकंदरींत दबदबा होता. तीस-पस्तीस वर्षांच्या त्यांच्या राजकारणी जीवनापैकीं मधील वीस वर्षांचें जीवन हें महत्त्वाचें आहे. टिळक-राजकारण म्हणून जें कांहीं म्हणतां येईल तें १८८७ पासून १९०८ च्या दरम्यानच्या काळांत सिद्ध झालें. राष्ट्रांत युयुत्सु वृत्ति निर्माण करण्याचा प्रयत्न त्या काळांतच झाला. राजकारणांतील खरा टिळकपंथ ह्या काळांत निर्माण झाला. ह्या कालखंडांतील टिळकांच्या राजकीय विचारप्रणालींत आगरकरी विचारप्रणालीचा जसा स्पर्श नव्हता तसा केळकरी विचारप्रणालीचाहि स्पर्श नव्हता. ह्या दोन्ही विचार-प्रणालींपासून टिळकांची राजनैतिक विचारप्रणालि अलिप्त होती. टिळकांचें अथवा टिळकपंथाचें खरें राजकारण ह्याच कालखंडांतील त्यांच्या विचारप्रणालींत व आचार-प्रणालींत दिसून येतें. १९१४ पासून १९२० पर्यंतच्या तिसऱ्या कालखंडांतहि टिळकांनीं राजकारण केलें. त्यांची तीच झुंझारवृत्ति होती. तीच त्यांची धडाडी होती. असें सर्व जरी खरें असलें तरी केळकरी राजकारणाची छाया कोठें दाट तर कोठें पुसट पडलेली दिसते. तीच छाया पुढें घनदाट होऊन पुढचा टिळकपंथ निराळ्या स्वरूपाचा झालेला दिसतो. जसे प्रकाशानें तसे छायेनें रंग पालटतात असें म्हणतात. छायेनें राजकारणाच्या स्वरूपांतील रंगाचें पृथक्करण झालें. टिळकांच्या विचार-प्रणालीचेंहि पृथक्करण झालें. प्रचलित राजकारणासंबंधीं झुंझारवृत्ति व स्वधर्म, स्वसंस्कृति व स्वेतिहास ह्यांसंबंधींचा जाज्वल्य अभिमान हे जे टिळक विचारप्रणालींतील मुख्य घटक ते अलग झाले; व त्यांपैकीं स्वधर्म, स्वसंस्कृति व स्वेतिहास ह्यांसंबंधींच्या अभिमानाचें फक्त राजकारण बनलें. हें राजकारण अर्थात् हिंदुमहासभेच्या राज-कारणाच्या जवळ जवळ सारखें झालें. एके काळचे आग्रही टिळकपंथी लोक सध्यांचे

आग्रही हिंदुसभावादी जे झालेले दिसतात त्याचें कारण हें आहे. टिळकांच्या राजकारणांतील दुसरा जो झुंझार वृत्तीचा घटक त्याचेंहि स्वरूप वरील छायेनें पालटलें. ह्या बदललेल्या स्वरूपाचा परिणाम असा झाला कीं, टिळकवादी राजकारणांतून जो लोकशाही स्वराज्य पक्ष निघाला तो हिंदुसभावादी राजकारणांतील एक उपपक्ष ठरला. लोकशाही स्वराज्य पक्षाचें राजकारण हें टिळकवादी राजकारण आहे असें न वाटतां दादाभाई, रानडे, मेथा, वाच्छा, गोखले ह्यांच्या राजकारणाचें पर्यवसित रूप आहे असें वाटतें. 'चले जाव'चा प्रस्ताव व १९४२ चें आंदोलन हीं जशीं गांधीवादी राजकारणाच्या चौकटींत बसत नाहींत, तसेंच लोकशाही स्वराज्य पक्षाचें राजकारण हें टिळकवादी राजकारणाच्या चौकटींत बसत नाहीं. टिळकवादी राजकारणाचे खरे वारस कोण ह्यासंबंधीं जे नेहमीं वाद माजतात त्याचें खरें कारण म्हणजे वरील राजकारणी पृथक्करणाकडे दुर्लक्ष होय.

टिळकांना राष्ट्रोत्थापनी लेखक असें आम्हीं आरंभीं म्हटलें. राष्ट्राचें उत्थापन टिळकांनीं कसें कसें केलें ? शाळा काढली व लोकांना शिक्षण दिलें, वर्तमानपत्रें सुरू केलीं व लोकांमध्यें स्वत्वासंबंधीं जाणीव निर्माण केली, कॉलेज स्थापिलें व उच्च शिक्षणानें बुद्धिमत्तेची प्रतिष्ठा सिद्ध केली, संस्थानिक हे आपलेच राजे आहेत असें मानून त्यांचा कैवार घेतला व आपणावर कारावास ओढवून घेतला. क्रॉफर्ड प्रकरणांत नेटिव्ह मामलेदारांची बांजू घेतली व क्रॉफर्डसारखा कमिशनरच्या हुद्दयावर असलेला इंग्रज अधिकारीहि लांच खातो हें दाखवून नोकरशाहीची इभ्रत उघडी केली. शेतकऱ्यांची केविलवाणी स्थिति १८९२ सालांतील लेखांत जितकी चांगली मांडली आहे तितकी पुढेंहि ती मांडली गेली नाहीं. शेतकरी कमिशननें सुचविलेल्या उपायांवर टीका करून हिंदुस्थानांतील शेतकरी लोकांस खरोखरच बंड करावें लागेल काय, ह्या प्रश्नाचा ऊहापोह केला. राजकारणावर जसे स्पष्ट व सडेतोड लेख ह्या कालांत आले तसेच सोन्याचांदीचा प्रश्न, रुपये व पौंड, मुंबई इलाख्याचें बजेट, सरकारी जमाखर्चाचा तक्ता वगैरे आर्थिककारणावरहि सडेतोड लेख त्या आरंभींच्या काळांत आले. ज्यूरीची मागणी करून समानतेचा हक्क न्यायदानांत मान्य करून घेतला. ह्या असल्या लेखांनीं सामान्य जनतेस राजकारणांतील मुख्य मुख्य बाबींचें स्थूल शिक्षण देऊन त्यांची चौकस बुद्धि जागृत केली. जातीय दंग्यांसंबंधींची कारणमीमांसा अगदीं मुळापर्यंत करून त्याबद्दलच्या जबाबदारीच्या मर्मावरच बरोबर बोट ठेविलें. ह्या कालखंडांतील लेखांत जगांतील आंतर-

राष्ट्रीय राजकारणावर लेख आलेले दिसत नाहींत. ह्याचें कारण, एक तर आंतर-राष्ट्रीय राजकारण व त्यामधील हिंदुस्थानच्या राजकारणाचा संबंध ह्या बाबीसंबंधीं सध्यां जशी जाणीव उत्पन्न झाली आहे तशी त्या काळीं नव्हती. आणि दुसरें कारण म्हटलें म्हणजे खुद्द आंतरराष्ट्रीय राजकारणहि सध्यां जसें महत्त्वाचें समजलें जातें, तसें त्या काळीं तें समजलें जात नव्हतें. हिंदी राजकारणांत प्राधान्यानें त्या काळीं दोनच गोष्टी येत असत. एक म्हटली म्हणजे प्रत्यक्ष हिंदुस्थानांतील राज्य-कारभार व दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांचे परस्परसंबंध. ह्या दोनच गोष्टींना महत्त्व असे. ह्या दोन गोष्टींत कोठें वैगुण्य दिसलें, व कोठें कोठें अन्याय दिसला, कीं टिळकांनीं त्यावर लिहिलेंच व चव्हाट्यावर आणिलेंच. तें उजेडांत आणून त्याचें खरें स्वरूप उघडें करून ते दाखवीत.

टिळकांच्या पस्तीस वर्षांच्या राजकारणी जीवनाचे आपण तीन भाग केले व ते त्यांना झालेल्या शिक्षांच्या अनुरोधानें केले. परंतु शिक्षा तरी कां झाल्या? पहिली कोल्हापूर प्रकरणांतील शिक्षा ही मामुली होय. परंतु पुढें ज्या दोन शिक्षा झाल्या त्यांचें टिळकवादी राजकारणांत महत्त्व आहे. दोन्ही शिक्षा राजद्रोहाबद्दल. दोन्ही शिक्षा राजकारणी लेखांबद्दल. पहिल्या शिक्षेच्या अगोदर महाराष्ट्रांत सांथीच्या तापानें कहर करून सोडला होता. सरकारनें क्वचित् प्रजेच्या आरोग्याच्या दृष्टीनें कांहीं उपाय अमलांत आणण्याचे प्रयत्न केले. पण त्यांत लोकांचे अनन्वित हाल झाले. लोक चहूं बाजूंनीं गांजले गेले. दैवी आपत्ति आली, व त्याबरोबर भौतिक आपत्तीहि आली. ह्या गांजणुकीला टिळकांनीं वाचा फोडली आणि आपल्यावर शिक्षा ओढवून घेतली ! दुसऱ्या शिक्षेच्या अगोदर सर्व हिंदुस्थान वंगभंगाच्या राजकारणानें हादरून गेलें होतें. वंगभंगाच्या अनुषंगानें स्वदेशी व बहिष्कार ह्या दोन प्रखर उपायांचा प्रचार जिकडे तिकडे झाला. प्लेगची गांजणूक महाराष्ट्रा-पुरतीच होती. परंतु वंगभंगाचा प्रतिकार, स्वदेशी व बहिष्कार ह्यांनीं सर्व हिंदुस्थान व्यापलें. वंगभंगाची आपत्ति बंगालवर, परंतु महाराष्ट्र टिळकांच्या लेखानें व चळ-वळीनें इतकें जागृत झालें, कीं त्यानें सर्व हिंदुस्थानचें व इंग्लंडचेंहि लक्ष आपल्या-कडे खेचलें. राजकारणांतील नेतृत्वासाठीं हिंदुस्थान महाराष्ट्राकडे पाहूं लागलें. पुण्याहून राजकारणाचीं सूत्रें हलूं लागलीं. प्रत्यक्ष राजकारणाची चळवळ करणारी राष्ट्रीय सभा ही ह्या चळवळीपुढें निष्प्रभ झाली. ह्या सर्वांचें पर्यवसान टिळकांच्या दुसऱ्या शिक्षेंत झालें. ह्या कालखंडांत वंगभंग, स्वदेशी व बहिष्कार ह्यांसंबंधीं

चळवळी १९०८ च्या पूर्वीच्या अगदीं लगतच्या काळांत झाल्या. टिळकांच्या ह्या राजकारणाचें स्वरूप लढाऊ वृत्तीचें होतें. क्रियेला प्रतिक्रियेच्या स्वरूपाचें होतें. ह्या कालखंडांतील ह्या लढाऊ राजकारणाखेरीज कायमच्या स्थायी स्वरूपाचें असें दुसरें राजकारण चालू होतेंच. राष्ट्रीय शिक्षण, राष्ट्रीय उत्सव, पैसा फंड, मद्यपाननिषेध इत्यादि बाबी त्या स्थायी राजकारणांत मुख्य होत्या. शिवाजी-उत्सव, गणपति-उत्सव, नाना फडणीस उत्सव ह्या उत्सवांना राष्ट्रीय व सार्वजनिक स्वरूप दिलें. ह्या उत्सवांनीं स्वधर्म व स्वेतिहास ह्यांसंबंधीं अभिमान तर जागृत केलाच, परंतु त्यांच्या मूळ हेतूंत असलेलें राजकारण समाजांतील निरनिराळ्या थरांत नेऊन पोहोंचविलें.

टिळकवादी राजकारणाचा तिसरा कालखंड म्हणजे १९१४ पासून १९२० पर्यंतच्या सहा वर्षांचा. पूर्वीच्या दोन्ही कालखंडांतील राजकारण युयुत्सु वृत्तीचें होतें. तें किंचित्सें स्थानिक व बरेंचसें राष्ट्रीय स्वरूपाचें होतें. तिसऱ्या कालखंडांतील राजकारणास मात्र केवळ राष्ट्रीय नव्हे तर आंतरराष्ट्रीय स्वरूप—मग तें किंचित्सें कां होईना—पण प्राप्त झालें. ही चळवळ म्हणजे होमरूलची चळवळ होय. एखादा दुरदेशी, मुरब्बी लोकनायक जसें राजकारण करील तसें राजकारण टिळकांनीं ह्या काळांत केलें. चळवळ खूप केली, दौरे खूप काढले, फंडहि पुष्कळ गोळा झाला. लोकांत जागृतीहि मनस्वी झाली. इतकें जरी खरें असलें, तरी ह्या सर्व आंदोलनांत पूर्वीची त्यांची झुंझारवृत्ति दिसून येत नाहीं. ह्या दुरदेशी राजकारणांत त्यांच्यावर एक खटला झालाच, परंतु त्यांना शिक्षा झाली नाहीं. थोडक्यांत निभावलें, नाहीं तर 'पुनश्च हरिः ओम्' करण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला असता व तोहि त्यांच्या उतारवयांत आला असता.

हें टिळकांचें राजकारणी जीवन झालें. सध्यां राजकारणाचें स्वरूपच बदललें आहे. त्याचें एक तंत्रच झालें आहे. ह्या नव्या तंत्रानें टिळकवादी राजकारण पारखणें जरा अयोग्य होईल. ह्या निकषालाहि तें उतरेल. नाहीं असें नाहीं. त्याचें महत्त्व पटण्यास त्या त्या काळाची परिस्थिति लक्षांत घेतली पाहिजे, व त्या दृष्टीनें तें पारखलें पाहिजे. न्यायमूर्ति रानडे ह्यांना देशाच्या सर्वंकष राजकारणाची पूर्ण कल्पना होती. ती अमलांत आणण्याचे त्यांनीं आपल्या परीनें प्रयत्नहि केले. परंतु रानड्यांच्या विचारप्रणालींतच असलेली ही सर्वंकष राजकारणाची कल्पना टिळकांनीं प्रत्यक्ष आपल्याच आचारप्रणालींत आणली, इतकेंच नव्हे तर राष्ट्राच्याहि आचारप्रणालींत आणिली. त्यासाठीं राष्ट्रास त्यागवृत्ति शिकविली;

त्यासाठीं राष्ट्रास युयुत्सु वृत्ति शिकविली; त्यासाठीं राष्ट्रास लोकसंग्रहवृत्ति शिकविली; त्यासाठीं राष्ट्रास कृतिप्रवणता शिकविली. असा एक मोक्याचा प्रसंग नाहीं कीं, ज्याचा पुरेपूर फायदा आपल्या राजकारणासाठीं त्यांनीं करून घेतला नाहीं. राजकारणाच्या सिद्धीसाठीं कालाला राबविलें व राष्ट्रालाहि राबविलें. जसें रघुराजाच्या परिचयांत आलेला प्रजेंतील प्रत्येक मनुष्य 'अहमेव मतो महीपतेः' ('माझ्यावरच राजाची मर्जी आहे') असें म्हणत असे, तसें टिळकांच्या परिचयांत आलेला प्रत्येक मनुष्य 'टिळकांना माझाच उपयोग आहे' असें मानी. इतका लोकसंग्रह टिळकांनीं केला. शिवाजीच्या वेळेस महाराष्ट्र हें Krieg-Stat—युयुत्सु राष्ट्र—होतें असें इतिहासकार म्हणतात. टिळकांच्या वेळेसहि महाराष्ट्र हें युयुत्सु राष्ट्र झालें. टिळकांनीं राष्ट्रामध्यें आपल्या राजकारणाची केवळ वैचारिकाच निर्माण केली नाहीं तर 'आचारिका'हि त्याबरोबर निर्माण केली. अव्वल इंग्रजीच्या काळापासून लोकांना पछाडीत असलेला न्यूनगंड किंवा पराभूत वृत्ति नाहींशी केली. त्यांना स्वत्वाची जाणीव दिली. त्यांचा स्वाभिमान जागृत केला. पूर्वेतिहासांतील व पूर्व संस्कृतींतील त्यांचा मोठेपणा त्यांच्या नजरेस आणला. राष्ट्रांतील राज्यकारभारांतील निरनिराळ्या बाबी त्यांच्यापुढें विशद केल्या. राज्यसंस्था ही स्खलनशील असते ह्याचा पडताळा लोकांना आणून दिला. राजा व प्रजा ह्या दोन संस्थांचे परस्परसंबंध, त्यांचीं कर्तव्यें व त्यांचे हक्क ह्यासंबंधीं स्पष्ट अशी कल्पना त्यांनीं लोकांना दिली आणि तीहि पाश्चात्य लोकशाही राजकारणी तत्त्वांना अनुसरून दिली. थोडक्यांत म्हणजे पाश्चात्य लोकशाही राजनैतिक तत्त्वज्ञानाचें शिक्षण त्यांनीं महाराष्ट्रास दिलें. टिळकांनीं राष्ट्राचें उत्थापन केलें असें आम्ही जें म्हणतों तें ह्यामुळेंच.

टिळकांचें राजकारण विषयाच्या दृष्टीनें सर्वंकष झालें, परंतु समाजांतील भिन्न भिन्न थरांच्या दृष्टीनें सर्वंकष झालें नाहीं. त्यांनीं राज्यव्यवहारांतील सर्व बाबींचा समाचार घेतला, परंतु समाजांतील सर्व थरांचा समाचार घेतला नाहीं. कामगार, शेतकरी वर्गासंबंधीं त्यांनीं लिहिलें, परंतु तें आर्थिक व राजकारणी दृष्टीनें लिहिलें; सामाजिक घटक ह्या दृष्टीनें लिहिलें नाहीं. त्यामुळें त्यांच्या राजकारणाची हाक समाजांतील सर्व थरांना त्यांच्या वेळेसहि पोहोंचली नाहीं व सध्यांहि टिळकवादी राजकारणाची हाक समाजांतील सर्व थरांना पोहोंचत नाहीं. राजकारणाच्या क्षेत्रांत सर्व थरांवरील लोकांना 'एकमुखी' करण्यासाठीं दुसऱ्या कोणत्या तरी क्षेत्रांत त्यांना

अगोदर एकमुखी करावें लागतें. पूर्वीच्या वारकरी संतांनीं मोक्षकारणांत सर्व थरांवरील लोकांना धर्मक्षेत्रांत व जातिक्षेत्रांत एकमुखी करण्याचा प्रयत्न केल्याचें इतिहास सांगतो. शिवाजीमहाराजांनींहि स्वराज्याच्या उद्योगांत सर्व लोकांना एकमुखी करण्यासाठीं अगोदर समाजांतील ब्राह्मण-क्षत्रियांना, वैश्यशूद्रांना, पंचम-अंत्यजांना व महमदी सल्तनत्‌चे सरदारांना देखील हिंदुपदपादशाहीच्या क्षेत्रांत 'एकमुखी' केलें. सामाजिक क्षेत्रांत जर सर्व थरांवरील लोक एकमुखी झाले असते तर सध्यां हिंदी राजकारणाचें स्वरूप दिसतें आहे तेंच स्वरूप १९०८ च्या वंगभंगस्वदेशी-बहिष्काराच्या आंदोलनांत दिसलें असतें; तेंच स्वरूप १९१४ च्या नंतरच्या होमरूलच्या आंदोलनांत दिसलें असतें. परंतु सामाजिक क्षेत्रांत सर्व थरांवरील लोकांना एकमुखी करण्याचें कार्य राहून गेलें. त्यामुळें टिळकवादी राजकारण हें बुद्धिजीवी मध्यम-वर्गीयाचेंच राजकारण ठरून गेलें. त्यामुळेंच तें बिराट्‌स्वरूपी समाजाकडून उपेक्षिलें गेलें असें जरी न म्हणतां आलें, तरी आत्मसात्‌ केलें गेलें नाहीं हें खास. टिळक-आगरकरांचा जर बेबनाव झाला नसता तर किंवा केळकरांना पूर्ण वाव मिळाला असता तर महाराष्ट्रांतील राष्ट्रवादी राजकारणास निराळेंच आणि तेंहि इष्ट व प्रभावी असें स्वरूप प्राप्त झालें असतें.

समाजांतील सर्व थरांवरील लोकांचें सामाजिक क्षेत्रांत एकमुखीकरण कां झालें नाहीं ? मिल्ल, स्पेन्सर, लॉक ह्यांचा बुद्धिवाद शंभर टक्के आत्मसात्‌ झाला नाहीं हें कारण असेल का ? टिळक हे कर्मनिष्ठ धार्मिक परंपरेंत वाढले हें कारण असेल का ? वैदिक संस्कृतीचा त्यांचा अभिमान हें कारण असेल का ? त्यांच्या भोंवतालीं नेहमीं गराडा घालून बसणाऱ्या कडव्या धर्मनिष्ठ लोकांच्या मुर्वतीसाठीं तर हें झालें नसेल ना ? हजारों वर्षे चालत आलेल्या व रोमरंध्रीं खिळलेल्या नाजुक धर्मभावनांना कशाला विनाकारण दुखवा व त्यांचा विरोध पत्करा हा तर विचार मुळाशीं नसेल ना ? आगर-करांशीं आपण ज्या कारणानें भांडलों त्या कारणांशीं आतां आपणास इमान राखलें पाहिजे हें तर कारण नसेल ना ? टिळकांच्या जबरदस्त व्यक्तिमत्त्वांत केळकरांचें व्यक्तिमत्त्व विरून गेल्यामुळें तर हें झालें नसेल ना ? झालें तें झालें खरें. सामाजिक क्षेत्रांत सर्व थरांवरील लोकांचें एकमुखीकरण टिळकांच्या हातून झालें नाहीं खरें.

टिळकांचें हें समाजकारण झालें. आतां त्यांचें वाङ्मयकारण राहिलें. टिळक-आगरकर ही जोडी डेक्कन कॉलेजमध्यें एकत्र आली नसती तर व कित्येक रात्रीं डेक्कन कॉलेजच्या जवळ असलेल्या टेकडीवर त्यांच्यामध्यें ध्येयसंलाप झाले नसते तर व

ह्या जोडीचा संबंध चिपळूणकरांशीं आला नसता तर टिळक हे जे पुढें लोकमान्य राष्ट्रपुरुष झाले त्याच्याऐवजीं विद्वन्मान्य विद्यापुरुष झाले असते. विलक्षण बुद्धिमान् विद्यार्थी म्हणून कॉलेजमध्यें प्राध्यापकांच्याजवळ त्यांची प्रतिष्ठा होती. महाराष्ट्रांत गेल्या शंभर वर्षांत जीं बुद्धिमान् माणसें झालीं त्यांच्यांतील अग्रगण्यांपैकीं टिळक हे होत. बाळशास्त्री जांभेकर, महादेवराव कुंटे, काशिनाथपंत तेलंग, वामनराव आपटे, चिंतामणराव वैद्य, विश्वनाथपंत राजवाडे, श्रीधरपंत केतकर, रघुनाथराव परांजपे इत्यादि मंडळी बुद्धिमान् खरी, परंतु त्यांपैकीं कोणांत कांहीं तर कोणांत कांहीं वैगुण्य आढळतें. बुद्धीचें सूक्ष्मत्व व बहुसाचित्व टिळकांच्याइतकें इतरांत आढळून येत नाहीं. असा बुद्धिमान् पुरुष शतकामध्यें एखादाच निर्माण होतो. बुद्धिमत्ता असणें व तिच्या प्रकटनास योग्य वाव मिळणें हें सर्वच बुद्धिमंतांच्या नशिबीं नसतें. हें सुदैव टिळकांना मात्र लाभलें. विद्येच्या क्षेत्रांत बुद्धिमत्ता चालविण्याची जी संधि मिळाली तिचा त्यांनीं बरोबर उपयोग करून घेतला. राजकारणाच्या धकाधकींत अशी संधि मिळणें हें दुरापास्तच. राजकारणी जीवनांत जर त्यांना कारावासाच्या शिक्षा झाल्या नसत्या तर तशी संधीहि मिळाली नसती. विद्याप्रसादाच्या दृष्टीनें कारावास हा एक प्रकारचा अनुग्रहच. त्यांत पुनः लिहिण्या-वाचण्याची परवानगी हा आणखी दुसरा अनुग्रह. हे दोन्ही अनुग्रह त्यांनीं सत्कारणीं लावले व राजकारणांत जसें त्यांनीं आपलें नांव सर्वतोमुखीं केलें तसें किंवा त्याच्याहिपेक्षां अधिक विद्याकारणांत त्यांनीं आपलें नांव सर्वतोमुखीं केलें. त्यांनीं लिहिलेल्या राजकारणी वाङ्मयांत त्यांच्या बुद्धिमत्तेचा प्रकर्ष तितकासा दिसून येत नाहीं. वर्तमानपत्राचा संपादक हा सर्वज्ञ असतो हें जरी खरें असलें तरी तो पोषाखी सर्वज्ञ असतो—तो एक देखावा असतो. आंतर दृष्टीनें तो स्वतःहि स्वतःला सर्वज्ञ समजत नाहीं, व इतरहि पण त्याला समजत नाहींतच नाहींत. तो एक 'ताकापुरत्या रामायणा' सारखा भाग असतो. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं टिळकांनीं जें राजकारणी लिखाण केलें तें पांडित्यहीन होतें. त्याचा अर्थ इतकाच कीं, त्यांच्या इतर ग्रंथांच्या मानानें त्यांतील पांडित्य कमी दर्जाचें आहे.

टिळकांच्या बुद्धिमत्तेचा प्रकर्ष दाखविणारे त्यांचे ग्रंथ तीन : एक 'ओरायन', दुसरा 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज', व तिसरा 'गीता-रहस्य'. पैकीं पहिले दोन इंग्रजी व तिसरा मराठी भाषेंत लिहिले आहेत. ह्याशिवाय वेदांगज्योतिष, खाल्डियन वेद व सांख्यकारिकांतील तुटलेला दुवा हे प्रबंध-निबंध आहेत. ह्या सर्व लिखाणानें

त्यांच्या सूक्ष्मभेदी बुद्धिमत्तेची साक्ष पटविली व सर्व जगांतील विद्वानांत त्यांना प्रतिष्ठा मिळवून दिली. वेदविद्येचे चिकित्सक संशोधक म्हणून त्यांचें नांव विद्वन्मुखीं झालें. जगांतील प्राच्य पंडितांमध्यें त्यांना मानमान्यता मिळाली. मॅक्समुल्लरशीं पांडित्याचें सौहार्द निर्माण झालें. वेदविद्या व वेदान्तविद्या ह्या दोन विद्यांतील त्यांचा व्यासंग प्रत्ययास आला. संस्कृतमधील पारंगतत्वाच्या बाबत हिंदुस्थानांतील पांडित्य इतर देशांतील पांडित्यापेक्षां काहीं कमी नाहीं ही गोष्ट सिद्ध झाली. पुरातत्त्वाच्या संशोधनांत कुंटे, भांडारकर, तेलंग, वैद्य, राजवाडे ही मंडळी होती. परंतु अव्वल दर्जाचें राजकारण करून पुनः पुरातत्त्व विद्येंत त्यांच्या बरोबरीचें कार्य टिळकांनीं करून दाखविलें.

संशोधनकार्यांत साधनें गोळा करणें, त्यांचें वर्गीकरण करणें, त्यांवरून अनुमानें बांधणें व सिद्धप्राय सिद्धांत काढणें ह्या चार बाबी मुख्य असतात. कुंटे, भांडारकर ह्यांच्या संशोधनांत पहिल्या तीनच प्रामुख्यानें दिसून येतात. वैद्यांच्या संशोधनांत पहिल्या बाबीसंबंधीं ढिलाई दिसून येते. राजवाड्यांच्या संशोधनांत शेवटच्या बाबीचा प्रकर्ष आढळून येतो. टिळकांच्या संशोधनांत चारी बाबी जरी सारख्याच तोलाच्या दिसून आल्या तरी चौथीच बाब प्राधान्यानें दिसून येते. टिळकांच्या संशोधनांत बुद्धीचा प्रकर्ष आहेच, परंतु त्याहिपेक्षां प्रतिभेचा विलास आहे. त्यांच्या बुद्धीचा प्रकर्ष पाहावा ‘ओरायन’ ग्रंथांत व प्रतिभेचा विलास पाहावा ‘आर्क्टिक होम’ ह्या ग्रंथांत किंवा त्यांच्या ‘खाल्डियन वेद’ व ‘सांख्यकारिके’ संबधाच्या छोट्या प्रबंधांत. सिद्धप्राय सिद्धांत (Hypothesis) फेकणें हा प्रतिभेचा विलास होय व त्याचें वरील लिखाण हें नमुनेदार उदाहरण आहे. ‘गीतारहस्य’ हा दर्शनस्वरूपाचा ग्रंथ आहे. ‘सांख्यदर्शन’, ‘पातंजलदर्शन’, ‘जैनदर्शन’ इत्यादि जशीं दर्शनें आहेत तसें ‘गीतारहस्य’ हें खरें म्हटलें म्हणजे ‘टिळकदर्शन’ आहे. त्यांचें अंतरंगहि तसेंच सिद्धांतन स्वरूपाचें आहे. ‘गीतारहस्य’ हेंच टिळकांचें जीवितध्येय व तोच त्यांचा जीवनसंदेश होय.

‘ओरायन’ ग्रंथ टिळकांनीं १८९३ सालीं लिहिला, व तो वेदांचें प्राचीनत्व सिद्ध करण्यासाठीं लिहिला. पाश्चात्य पंडितांनीं वेदांचा काल साधारणपणें खिस्तपूर्व बाराशें हा ठरविला होता. त्यांची गणना शास्त्रीय नव्हती. प्राचीन-प्राच्य इतिहासांतील सर्व प्रसंगापैकीं गौतम बुद्धाच्या निर्वाणप्रसंगाचा काल निश्चित समजतात व तो खिस्त-पूर्व पांचवें शतक हा होय. ह्याच्या मागें जात जात वेदकालाची गणना खिस्तपूर्व

बारारों ही येते. वैदिक कालाचे त्यांच्या मताप्रमाणें चार कालखंड पडतात. पहिला छंदकाल, दुसरा मंत्रकाल, तिसरा ब्रह्मकाल व चौथा सूत्रकाल. ह्यांपैकीं चौथा सूत्रकाल हा बौद्धनिर्वाणाचा समकालीन आहे. त्याच्यामागें प्रत्येक कालखंडाचीं दोनरों वर्षें ही मर्यादा समजून गणना करीत मागें मागें गेलें म्हणजे छंदोकाल हा खि. पू. बारारों हा ठरतो. ही कालगणना प्रो. मॅक्समुल्लरनें ठरविली. डॉ. हॉग व विल्सन ह्यांनीं ही कालगणना खि. पू. चौवीसरों–दोन हजारपर्यंत मागें नेली व तिला आधार प्राचीन चिनी वाङ्मयांतील कालखंडांचा दिला. मॅक्समुल्लर काय किंवा हे दोघे डॉक्टर काय, दोघांची पद्धत एकच होती. तिला प्रत्यक्ष आधार कशाचाच नव्हता. टिळकांनीं प्रथम आधार देऊन ही कालगणना खिस्तपूर्व चार हजार पांचरोंपर्यंत मागें नेली. टिळकांच्या संशोधनाचें अपूर्वत्व हेंच आहे. युरोपियन पंडित जें अनुमानावर विसंबून म्हणत होते तें टिळक ह्यांनीं ज्योतिषशास्त्रांतील प्रत्यक्ष आधार देऊन निश्चित केलें. अनुमानाला व तर्काला कांहीं जागाच त्यांनीं ठेविली नाहीं. ऐतरेय ब्राह्मण (१·७) व तैत्तिरीय संहिता (६·१·५·१) वगैरे ठिकाणचे ज्योतिषविषयक उल्लेख काढून त्यांचा गणितशास्त्रानें ठोकताळा बसविला व वेदकाल निश्चित केला. वैदिक काळांतील आर्य लोक हे यज्ञयाग करीत असत. त्यासाठीं त्यांना कालगणना करावी लागे. ही कालगणना ते आर्य लोक अर्थात् नक्षत्रें, चंद्र, सूर्य ह्यांच्यावरून ठरवीत. सूर्य व चंद्र कोणकोणत्या नक्षत्राजवळ आहेत हें पाहूनच ते आपली दिनचर्या चालवीत. "अदिति देवता ही पुनर्वसु नक्षत्राची स्वामिनी आहे व तिच्यापासून सर्व सवनकर्मांना आरंभ केला पाहिजे व तिच्यांत शेवटहि केला पाहिजे," ह्या विधानावरून टिळकांनीं वेदाच्याहि पूर्वींचा कालखंड निश्चित केला. ह्याची मर्यादा खिस्तपूर्व सहा ते चार हजार ही होय. हा अदितिकाल किंवा आग्रहायणपूर्व (Pre-Orion) काल होय. ह्याच्या पुढचा ओरायनकाल (आग्रहायण) होय. ह्या कालांत वसंत संपात हा आर्द्रा नक्षत्रांत असतो. ह्या कालाची मर्यादा खिस्तपूर्व चार ते अडीच हजार ही होय. हाच वेदकाल होय. वेदांतील सर्व मंत्र ह्या कालांत झाले. ह्याच्या पुढचा काल म्हणजे वसंत संपात आर्द्रा नक्षत्रापासून ढळत ढळत कृत्तिका नक्षत्रापर्यंत येतो तो काल होय. ह्या कालाची मर्यादा खिस्तपूर्व अडीच हजार ते चौदारों ही होय. ह्याच कालांत तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण ग्रंथ निर्माण झाले. ह्याच्या पुढचा कालखंड खिस्तपूर्व चौदारों ते पांचरोंपर्यंतचा होय. हा सूत्रकाल होय. अशा रीतीनें ज्योतिषशास्त्राच्या आधारानें वसंत व शरद् ह्या दोन

संपातबिंदूंचा व मृगशिरस् व कृत्तिका ह्या नक्षत्रांशीं उल्लेखिलेला संबंध उकलून दाखवून टिळकांनीं वेदांचें प्राचीनत्व तीन चार हजार वर्षें मागें नेलें. संशोधनाच्या बाबतींत पाश्चात्य पंडितांवर टिळकांनीं मात केली.

परंतु पांडित्याच्याबाबत झालेली ही मात सहजासहजीं कोण कबूल करणार? वेबर, मॅक्समुल्लर, बेंटले वगैरेनीं ह्या पुराव्याबद्दल साशंकताच प्रकट केली. टिळकांनीं जरी आपला पुरावा आग्रहानें व आधारानें मांडला तरी ही बाब आकाशांतील गोलांसंबंधीं होती. त्यांच्या गति अनिश्चित, गतींची कालगणना अनिश्चित, त्यांच्या उल्लेखाच्या अर्थाबद्दल मतभेद वगैरे गोष्टी गणनेंतील अनिश्चित घटक होते. तेव्हां टिळक जरी स्वतः निश्चित मताचे असले तरी इतर संशोधक साशंक होत असत. परंतु टिळकांच्या ह्याच बिधानाला पोषक असे तीन पुरावे स्वतंत्र रीतीनें तीन निराळ्या ठिकाणांहून आले. प्रो. जाकोबी ह्यांच्या संशोधनानें तोच काळ निश्चित केला. शंकर बाळकृष्ण दीक्षित व व्यंकटेश बापूजी केतकर ह्यांनीं वेदांगज्योतिषांतील कांहीं कूट श्लोकांचा अर्थ उकलून गणितशास्त्राच्या आधारानें टिळकांच्या कालगणनेस पुष्टि दिली. अशा रीतीनें तात्पुरता फेकलेला सिद्धांत पुराव्यानिशीं सिद्ध झाला.

संशोधकाला ह्याच्यासारखा दुसरा आनंद नाहीं. तो आनंद टिळकांना झाला व या आनंदाच्या भरांत टिळकांनीं 'आर्क्टिक होम' हा ग्रंथ लिहिला. ओरायन ग्रंथानें वेदांचा व वेदकालीन आर्यांचा काल ठरविला, परंतु स्थान ठरविलें नाहीं. तें 'वेदकालीन' आर्यांचें वसतिस्थान ह्या दुसऱ्या ग्रंथांत त्यांनीं ठरविलें. पहिल्या ग्रंथांत ज्योतिषाचा आधार घेतला तर ह्या ग्रंथांत टिळकांनीं भूगर्भशास्त्राचा आधार घेतला. पहिल्या ग्रंथांत त्यांच्या बुद्धीचा विलास दिसतो तर ह्या दुसऱ्या ग्रंथांत त्यांच्या प्रतिभेचा विलास दिसतो. पहिल्या ग्रंथांतील संशोधनास यश लाभल्यामुळें ह्या दुसऱ्या ग्रंथासंबंधीं त्यांना आत्मविश्वास आला. 'आर्क्टिक होम' ह्या ग्रंथांत त्यांचा आत्मविश्वास पदोपदीं दिसतो. आर्यांचें मूळ वसतिस्थान मागें खेचत खेचत त्यांनीं उत्तर ध्रुवाजवळ नेलें, व तें वेदांतील सूक्तांच्या, विशेषतः उषादेवताविषयक सूक्तांच्या आधारानें नेलें. खिस्तपूर्व पांच सहा हजार वर्षांपूर्वी उत्तर ध्रुवाजवळील हवामान हल्लींच्या सारखें नव्हतें. मानववसति त्या प्रदेशांत शक्य होती. भूगर्भशास्त्र, ज्योतिषशास्त्र, वेदांतील ऋचा, इतर वैदिक वाङ्मय, झार्तुष्ट्री अवेस्ती गाथा, पौराणिक कथा ह्या सर्वांचा आधार त्यांनीं घेतला. तौलनिक भाषाशास्त्र, स्पयीतिशास्त्र, धर्मशास्त्र व सर्व प्राचीन देशांतील जुनें कथावाङ्मय

ह्यांतील परस्परांवर प्रकाश टाकणाऱ्या प्रमेयांनीं त्यांनीं आपले निर्णय सिद्ध केले.

ह्या दोन ग्रंथांतील प्रमेयांना आणखी आधार त्यांना खाल्डियामधील इष्टिका-लेखासंबंधीं झालेल्या संशोधनानें मिळाला, व तो त्यांनीं 'खाल्डियन वेद' ह्या इंग्रजी लेखांत 'भांडारकरस्मृतिग्रंथां'त प्रसिद्ध केला. मेसापोटेमियामध्यें सांपडलेल्या जुन्या विटांवरील लेखांचें वाचन करून त्यांचा काळ जो युरोपीय पंडितांनीं ठरविला तो टिळकांनीं आपल्या दोन्ही ग्रंथांत ठरविलेल्या वेदकाळांशीं जुळला. टिळकांनीं दोहोंतील आणखी शब्दसाम्यें, कल्पनासाम्यें व देवतासाम्यें विशद केलीं व दोन्ही काल कसे सम-सामायिक आहेत हें दाखविलें. सिंधु (रेशमी तलम कापड), मण (वजन), तैमात, आलिगी, विलिगी, उरुगुलाय, ताबुव वगैरे परकी शब्द अथर्ववेदांत कसे आढळतात, त्यांतील सिनीवाली, अफजू (अप्सुजित्), मारदुक (मरुद्वत्), इतु (ऋतु) इत्यादि शब्दसाम्यें कशीं पडताळा देतात व त्यांतील जारण, मारण, अभिचारण, वशीकरण वगैरे मंत्रविद्या अथर्ववेदांतील मंत्रविद्येशीं कशी सारखी आहे हें त्यांनीं स्पष्ट केलें.

ईश्वरकृष्णाच्या सांख्यकारिकांतील गळलेल्या कारिकेसंबंधीं टिळकांचें संशोधनहि असेंच त्यांच्या बुद्धिमत्तेची साक्ष देतें. एकंदर सत्तर कारिका. टीकाकारांत संख्येसंबंधीं गोंधळ झालेला. आद्य शंकराचार्यांच्या गुरूंनीं—गौडपादाचार्यांनीं—त्यांवर टीका लिहिली. कारिका एकसष्ट व बासष्ट ह्या दोहोंत मेळ जमेना. कांहीं तरी मजकूर गळून गेल्यासारखें दिसत असे. टीका ग्रंथ, पुढचा मागचा संदर्भ, स्वतःची प्रतिभा ह्यांच्या जोरावर टिळकांनीं गळलेली कारिका रचिली व ईश्वरकृष्णाचा सांख्य तत्वज्ञानावरील सर्वांत जुना पण अपुरा पडलेला ग्रंथ पुरा केला.

टिळकांचा शेवटचा ग्रंथ 'गीतारहस्य' हा होय. हा मराठींत आहे. हा तुरुंगांत लिहिला गेला. तुरुंगांत लिहिलेलें आजपर्यंतचें सर्वांचेंच वाङ्मय मोठें तेजस्वी झालें आहे. तसा हाहि ग्रंथ आहे. ह्यांत भगवद्गीतेचें तात्पर्य सांगितलें आहे. गीता हा ग्रंथ प्रस्थानत्रयींमधील असल्यामुळें सर्व आचार्यांनीं व पंथप्रवर्तकांनीं त्यावर भाष्यें, टीका लिहून त्यांतील तत्त्वज्ञानाचा अर्थ आपापल्या पंथांच्या विचारसाणीप्रमाणें लाविला आहे. जो तो म्हणतो मी सांगतों तोच अर्थ गीतेंत आहे. टिळकांचें सर्व आयुष्य कर्मयोगांत गेलेलें. सर्व आयुष्य झगड्यांत गेलेलें. खाजगी जीवनांत झगडे, सार्वजनिक जीवनांत झगडे. अशा संघर्षमय व कर्ममय जीवनाच्या तत्त्वज्ञान्याला इतरांनीं गीतेंतून काढलेला संन्यासमार्ग, ज्ञानमार्ग किंवा भक्तिमार्ग कसा पटावा ?

गीताग्रंथ टिळकांच्या वाचनांत त्यांच्या सोळाव्या वर्षापासून साठाव्या वर्षापर्यंत होता. त्याचा अर्थ त्यांच्या मनांत सारखा घोळतच असे, व तो त्यांनीं कर्मयोगपर लाविला आहे. ज्ञान्यानें ज्ञानप्राप्तीनंतरहि कर्म केलें पाहिजे व तें निष्काम कर्म केलें पाहिजे हा त्यांचा सिद्धांत आहे. ह्या ग्रंथानें महाराष्ट्रांत फार खळबळ उडवून दिली, त्याचा पुरस्कारहि फार झाला व प्रतिकारहि फार झाला.

ह्या ग्रंथांत टिळकांनीं गीतेच्या अनुसंधानानें सर्व तत्त्वज्ञानाचा परामर्श घेतला आहे. कर्मवाद, कर्मविपाक, पुनर्जन्म, सुखदुःखविवेक, क्षेत्रक्षेत्रज्ञविचार, अध्यात्म, संन्यासमार्ग, भक्तिमार्ग, सिद्धावस्था व त्यानंतरचा व्यवहार वगैरे सर्व तत्त्वें पाश्चात्य व पौर्वात्य विचारसरणींनीं तपासून घेऊन त्यांची त्यांनीं संगतवार मांडणी केली आहे. विवेचनांत आग्रह आहे, आवेश आहे, कर्मयोग्याचा अभिनिवेश आहे. इतर भाष्यकारांनीं गीतेचें तात्पर्य काढण्यांत ज्याप्रमाणें आपापल्या पंथपरंपरेच्या तत्त्वज्ञानाचा निकष लावला त्याप्रमाणें टिळकांनींहि तात्पर्य काढण्यांत आपल्या जीवित-तत्त्वज्ञानाचा निकष लावला आहे. हा ग्रंथ खरें म्हटलें म्हणजे ‘कर्मयोगदर्शन’ आहे. गीता ही केवळ निमित्तमात्र आहे. ‘सत्याचे प्रयोग’ हा ग्रंथ जसा गांधींच्या जीवनाचें तत्त्वज्ञान, तसा ‘गीतारहस्य’ हा ग्रंथ टिळकांच्या जीवनाचें तत्त्वज्ञान आहे. म्हणूनच आम्ही त्या ग्रंथाला ‘कर्मयोगदर्शन’ अथवा ‘टिळक जीवनदर्शन’ असें म्हणतों.

ह्या ग्रंथांतील विषय जसा टिळकांचें व्यक्तिमत्त्व दाखवितो तशी त्यांतील लेखनशैलीहि त्यांचें व्यक्तिमत्त्व दाखविते. त्यांच्या राजकारणी लिखाणांतील सडेतोडपणा, रोखठोकपणा, प्रत्यक्षता ( directness ) वगैरे गुण ह्या ग्रंथांत दिसून येतात. त्यांचा आवेश, त्यांचा जोरदारपणा, त्यांचा शब्दांचा व अर्थाचा अभिजातपणा येथेंहि आढळतो. राजकारणी लिखाणांतील लेखनशैली जरी प्रसंगवशात् वाचकाच्या भावनांना स्पर्श करीत असली तरी ह्या ग्रंथांतील लेखनशैली वाचकांच्या बुद्धीलाच प्रामुख्यानें स्पर्श करते. टिळकांची लेखनशैली एकंदरींत बुद्धिस्पर्शीच अधिक. तितकीशी भावनास्पर्शी नाहीं. त्यामुळें नादमाधुर्य, पदसालित्य, कांति, सौंदर्य वगैरे शैलींतील भावनिक गुण तिच्यांत आढळत नाहींत. अगोदर बुद्धीला हाक द्यायची व मग ती देतांना किंवा दिल्यानंतर जर भावनेला हाक मिळाली तर मिळाली. रोखठोक विचार व तो रोखठोक रीतीनें सांगायचा. अर्थगांभीर्य सोडायचें नाहीं. अर्थाची अभिजातता सोडायची नाहीं. कोठें फारसा नर्मविनोद नाहीं किंवा कोणाचा

वर्मविनोदहि नाहीं. असलाच तर प्रहार असायचा. असलाच तर प्रतिपक्षाचा धिक्कार असायचा. तिच्यांत कोणाचा आर्जव नाहीं, पण त्यांचा स्वतःचा आग्रह आहे. त्यांचा स्वतःचा करारी स्वभाव आहे. असें हें लेखनशैलीचें प्रभावी शस्त्र सारखें तीस-पसतीस वर्षें वापरून लोकांचें चहूंबाजूंनीं त्यांनीं उत्थापन केलें.

टिळक गेले. पंचवीस वर्षें होऊन गेलीं. ह्या पंचवीस वर्षांत महाराष्ट्रांतील लोकांनीं ती त्यांची सावळी मूर्ति स्मरणांत ठेविली. तो त्यांचा किंचित्सा उग्र चेहरा, ती त्यांच्या डोळ्यांतील बुद्धिमत्ता, त्यांच्या ओठांतील निश्चयीपणा, तो त्यांच्या पावलां-तील ठामपणा लोकांच्या स्मरणांतून कसा जाईल? त्यांची तांबडी पुणेरी पगडी, त्यांचा लांब आंगरखा, त्यांचा पुणेरी जोडा, त्यांची हातांतील काठी ह्या गोष्टी नेहमीं पुढें उभ्या राहणार! ती त्यांची शरीरयष्टि, मध्यम उंचीची, पण सरळ व कणखर, तो त्यांचा देसूर, उमदा व उदार स्वभाव सदैव लोक आठवणार. खरें पाहिलें तर त्यांचें शरीर ताईमहाराज प्रकरण व चिरोल प्रकरण ह्या दोन काळज्यांनीं बरेंच पोखरलें गेलें होतें. निराशेची छटाहि त्यांच्या मुद्रेवर दिसे. परंतु आधिभौतिक प्रपातांनीं उफाळणारे कांहीं स्वभाव असतात. तसा टिळकांचा स्वभाव होता. त्याचें लोकांना कधींहि बिस्मरण व्हायचें नाहीं. परंतु हें सर्व स्मरणच केवळ आज पंचवीस वर्षें आपण करीत आहोंत. पंचवीस वर्षांत टिळक-गोखल्यांचें महाराष्ट्र हें हिंदी राज-कारणांत पोरकें व पारखें झालें आहे. दुसऱ्याच्या राजकारणी गाड्याला नळा म्हणून चिकटून बसण्याची अवस्था महाराष्ट्रास आली आहे. राजकारणी पुरुषांची संसद् भरली तर महाराष्ट्रास निमंत्रणाची वाट पाहात बसण्याची पाळी आली आहे. हें सर्व अभ्रांचें कस्याळ नाहींसें होऊन महाराष्ट्रास मित्रागमाचा सुदिन लवकर येवो अशीच इच्छा ह्या टिळकपुण्यस्मरणाच्या निमित्तानें कुणीहि करील.

# ८. गोपाळ गणेश आगरकर

प्रि. गोपाळरावजी आगरकर जाऊन आज अर्धशतकाचा काळ लोटला. १८९५ सालीं जून महिन्याच्या सत्रा तारखेस त्यांनीं आपला देह ठेविला. आज त्याला पन्नास वर्षें होऊन गेलीं. दोन पिढ्यांचा काळ गेला. मानववंशशास्त्राप्रमाणें तिसऱ्या पिढींत पहिल्या पिढींतील गुणसंक्रमण होतें असें म्हणतात. पहिल्या पिढींतील व्यक्तींच्या गुणदोषांची स्मृति पुसट पुसट कां होईना, पण तिसऱ्या पिढीपर्यंत टिकते. तिसऱ्या पिढीच्या शेवटीं मात्र तिचा लोप होतो आणि पुढें पहिल्या पिढींतील व्यक्ति इतिहासांत जमा होण्याच्या मार्गास लागतात. त्यांच्या गुणदोषांच्या संक्रमणाचेंहि असेंच आहे. मूळ पहिल्या पिढींतील अर्जकाचे गुण दुसऱ्या पिढींत बरोबर उतरतात. दुसऱ्या पिढींतील व्यक्ति पहिल्या पिढींतील व्यक्तींच्या सान्निध्यांत वाढते. तिसऱ्या पिढींतील नातवंडें मात्र आपल्या आजोबाच्या गुणांपासून दुरावतात. गुणांच्या संक्रमणांतहि एक व्यवधान अधिक आल्यामुळें त्यांत पातळाई उत्पन्न होते. पुढच्या पिढींत तर त्यांची स्मृतीच फक्त राहते. आगरकर होऊन गेले ह्या विसाव्या शतकाच्या आरंभीं, त्यांच्या कार्याची थोरवी मागील एक-दोन पिढ्यांना जशी प्रत्यक्ष अनुभवायला मिळाली, तशी सध्यांच्या पिढीला मिळाली नाहीं. त्यांना ती सांगायलाच हवी. त्यांची सध्यांची जी बौद्धिक किंवा वैचारिक उंची वाढली ती कोणामुळें वाढली हें सांगितल्याशिवाय त्यांना ती कळणार कशी? त्यांचें नेत्रक्षितिज वाढलें खरें, पण तें कोणाच्या खांद्यावर बसून वाढलें? आपण सध्यां खूप म्हणतों कीं, समाजकारणांत हें बरें आणि तें वाईट, राजकारणांत हें अगोदर आणि तें नंतर, धर्मकारणांत हें मनाला पटतें आणि तें पटत नाहीं, शिक्षणांत हें इष्ट आणि तें अनिष्ट, असा निरनिराळ्या विषयांत जो साधक-बाधक विचारप्रणालींचा पुरस्कार करतों, त्या सर्व विचारप्रणालींत मुख्य गोष्ट विचार करणें व विचार करावयास लावणें ही आहे; आणि ही विचार करावयास लावण्याची महत्त्वाची गोष्ट जर महाराष्ट्रास कुणीं शिकवली असेल, तर ती आगरकर ह्यांनींच होय—निदान ज्या कोणी महनीय व्यक्तींनीं शिकविली त्यांत आगरकर हे अग्रेसर होत!

आगरकरांच्या नंतर जसा आजपर्यंत दोन पिढ्यांचा काळ गेला, तसा इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून आगरकरांपर्यंत दोन-तीन पिढ्यांचा काळ होऊन गेला होता. अव्वल इंग्रजीपासून तों थेट आतांपर्यंतच्या काळाच्या मध्याच्या सुमारास

आगरकर होऊन गेले. त्यांच्या पूर्वीच्या तीन पिढ्यांपैकीं पहिली पिढी बापुशास्त्री शुक्ल, थत्ते, जांभेकर ह्यांची होय. ही पिढी जरी बुद्धिवान् व कर्तृत्ववान् होती, तरी इंग्रजी सुधारणा, इंग्रजी शास्त्रीय ज्ञान ह्यांच्या श्रेष्ठत्वानें भारली गेल्यामुळें हीनगंडामध्येंच गुरफटली गेली. तिच्या हातून शालेय कामगिरीशिवाय इतर भरीव अशी कामगिरी झाली नाहीं. ह्या पिढीच्या थोड्याशा पुढच्या काळांत मात्र एक लोकोत्तर व्यक्ति होऊन गेली. त्या व्यक्तीनें संरकारी नोकरी व ह्यासंबंधीं बंधनें असूनसुद्धां महाराष्ट्रीयांमध्यें स्वत्वाची जाणीव निर्माण केली. ही व्यक्ति म्हणजे लोकहितवादी देशमुख ही होय. हीनगंड व पराभूतवृत्तीची झापड आलेली नाहींशी करून दृष्टि साफ करून तिला आपलें खरें स्वरूप दाखविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. चिपळूणकर, आगरकर, टिळक ह्या पुढील काळांतील व्यक्तींच्या लेखनांतील स्पष्टवक्तेपणा, जोर, वगैरे गुणांचा आरंभ लोकहितवादींच्या शतपत्रांत दिसून येतो. ह्यांच्यानंतरची दुसरी पिढी रानडे, भांडारकर, तेलंग ह्यांची. ह्यांत तेलंग अत्यंत बुद्धिमान्, रानडे हे चौफेर दृष्टीचे व भांडारकर हे संशोधक असले तरी रानडे ह्यांनीं राष्ट्राच्या प्रगतीचा सर्वांगीण बिचार करून महाराष्ट्रामध्येंच केवळ नव्हे, तर सर्व हिंदुस्थानांत एक प्रकारचा 'नेमस्त सर्वांगीण सुधारणावाद' निर्माण करून पुष्कळ तरुण बुद्धिमान महाराष्ट्रीयांना स्फूर्ति दिली. ह्यानंतरची तिसरी पिढी म्हटली म्हणजे चिपळूणकर, टिळक, आगरकर ह्यांची. ही तिन्ही मंडळी बुद्धिमान् व कर्तृत्ववान् होती. तिघांनीं तीन उज्ज्वल असे विचार-प्रवाह राष्ट्रांत निर्माण केले. त्यांनीं महाराष्ट्रांत चैतन्य निर्माण केलें, स्वाभिमान व राष्ट्राभिमान उत्पन्न केला. लोकांना जागें केलें. सन १८८० च्या सुमारास आजन्म लोकसेवेची दीक्षा स्वतः घेऊन त्यागी, स्वाभिमानी व निःस्पृह आजन्मसेवकांचा एक स्वतंत्र पंथ निर्माण केला. बिचारसरणी व आचारसरणी ह्यांतील जहालपणांत तिघेहि सारखेच होते. चिपळूणकर-टिळकांनीं आपल्या जहाल वृत्तीच्या प्रसाराला राजकारण हें क्षेत्र मुक्रर केलें, तर आगरकर ह्यांनीं आपल्या जहाल वृत्तीच्या प्रसाराला सर्वांगीण सुधारणेचें क्षेत्र मुक्रर केलें. चिपळूणकर-टिळकांनीं समाजस्वातंत्र्य व देशस्वातंत्र्य ह्यांचा विशेष पुरस्कार केला, तर आगरकरांनीं त्याच्याबरोबर व्यक्तिस्वातंत्र्याचा विशेष पुरस्कार केला. विचार, विवाह व व्यवसाय ह्या तिहींबाबत व्यक्तीचें स्वातंत्र्य हें ध्येय आपणापुढें ठेविलें. चातुर्वर्ण्य, जातिभेद, धर्म, ह्यासंबंधीं नवीन विचारप्रवाह सुरू केले. सत्ता व संपत्ति ह्यांची समविभागणी पुरस्कारली. पुनर्जन्म अमान्य केला, धर्म म्हणजे मनुष्यतेचें

ऐहिक सुखवर्धनाचें साधन ठरवून परलोकाशीं त्याचा संबंधच तोडला. समाज, धर्म, तत्त्वज्ञान, राजकारण ह्या सर्व बाबतींत महाराष्ट्राला स्वतंत्र विचार करावयास आगरकर ह्यांनीं लावला.

आणि हें करण्यांत—महाराष्ट्राला स्वतंत्र विचार करायला लावण्यांत—त्यांनीं आपलें आयुष्य वेंचलें. प्रत्यक्ष कर्तबगारीचें असें आयुष्य आगरकरांना फार थोडेंच—उणींपुरीं पंधरा वर्षेंच लाभलें. परंतु त्यांत त्यांनीं हा एक हव्यास धरला आणि आपल्या मगदुराप्रमाणें शेवटास नेला, व तें करण्यांत त्यांनीं कांहीं पाहिलें नाहीं. आपलें कुटुंब पाहिलें नाहीं कीं आपला समाज पाहिला नाहीं. आपला धर्म पाहिला नाहीं कीं आपली रूढि पाहिली नाहीं. आपला मित्र पाहिला नाहीं कीं संस्था पाहिली नाहीं. स्वतंत्र विचाराच्या, बौद्धिक सचोटीच्या व नैतिक अधिष्ठानाच्या आड म्हणून ज्या व्यक्ति आल्या, जे प्रसंग उभे राहिले, त्या सर्वांना निर्दयतेनें दूर सारून आपल्या सदसद्विवेकबुद्धीची प्रतिष्ठा कायम केली. आपल्या स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीची प्रतिष्ठा निश्चित ठाम करणें व दुसऱ्यासहि तशी करावयास लावणें ही गोष्ट ह्या सध्यांच्या जगांत आणि तेंहि नेहमीं प्रत्येक गोष्टींत 'सुवर्णमध्य' साधणाऱ्या जगांत फार कष्टाची आहे. हें असिधाराव्रत आहे. हें करतांना आपत्ति येतात, इतकेंच नव्हे, तर त्या ओढवून घ्याव्या लागतात. व तशा आपत्ति आगरकरांनीं ह्या असिधाराव्रताचें आचरण करण्यांत आपल्यावर ओढवून घेतल्या असें त्यांचें सर्व आयुष्य सांगतें. 'आपला मुलगा मोठा होईल, तो मोठ्या हुद्दयावर जाईल व आपला पांग फिटेल—' अशा आशेनें आपल्या मुलाच्या शेवटच्या परीक्षेकडे टक लावून बसणाऱ्या आईला 'एम्. ए. झाल्यावर आपला मुलगा श्रीमंत होईल,' अशी अपेक्षा न करण्याबद्दल त्यांनीं विनंति केली व आमरण गरिबी पत्करली. सरकारी नोकरी पत्करण्यानें आपल्या मनाला पटलेलें राष्ट्राच्या व समाजाच्या उद्धाराचें ध्येय आपणांस साध्य करतां यावयाचें नाहीं असें वाटल्याबरोबर सरकारी नोकरीचा आणि श्रीमंतीचा मोह टाळला. आपल्या मनाला पटलेली समाजहिताची व देशहिताची गोष्ट केसरीच्या द्वारा करतां येत नाहीं असें दिसल्याबरोबर आवडता व स्वसंवर्धित केसरी तोडला. आपल्या मनाची नेकी अमुक एका स्नेह्याच्या सहवासांत शुद्ध राहात नाहीं, असें वाटल्याबरोबर टिळकांबरोबरचा चिरस्नेहहि त्यांनीं सोडला. स्फटिकासारखे शुद्ध भावनेचे न्यायमूर्ति माधवरावजी रानडे ह्यांनाहि एकदोन बाबतींत त्यांनीं बाजूस सारलें; परंतु आपल्या मनाची नेकी त्यांनीं

बाधित होऊं दिली नाहीं. मनाची नेकी, बुद्धीची नेकी व आचरणाची नेकी आगरकरांनीं आपल्या जीवनांत आणिलीच, परंतु इतरांच्या जीवनांतहि ती यावी ह्यासाठीं त्यांनीं आपलें आयुष्य वेंचलें. आयुष्याचें ध्येयच हें कीं, स्वतंत्रपणें विचार करायचा, तो धैर्यानें बोलून दाखवायचा व बोलून दाखविल्यानंतर तो क्रियेंत आणावयाचा. "मननाच्या देवडींतून जी कल्पना जोरानें निसटते, ती वाचेच्या किंवा कायेच्या देवडीवरील रखवालदारांस फारशी डगणारी नसते," हा त्यांचा सिद्धांत असे. "एकांतांत बसायचें, स्वच्छ उदकाप्रमाणें किंवा आरशाप्रमाणें मनाचें दर्पण पुढें मांडायचें, त्यांत प्रतिबिंबित झालेल्या विचारांचें व कल्पनांचें हुबेहूब स्वरूप अवलोकायचें, व आचरणांत बरोबर उतरायचें" हा त्यांचा बाणा असे ('गुलामाचें राष्ट्र').

ह्याला दोन गोष्टींची अवश्य जरूरी लागते. एक म्हणजे आपलें मन नितांत शुद्ध आहे, नितांत स्वच्छ आहे, ह्याची खात्री असावी लागते. आपल्या मनांत वाईट म्हणून विचारच येणें शक्य नाहीं, असत् म्हणून कल्पनाच त्याला शिवणार नाहीं, अंतःकरणांत प्रवृत्ति जर आली, तर ती चांगलीच प्रवृत्ति असली पाहिजे, ती वाईट असणेंच शक्य नाहीं, ह्यासंबंधीं आपली बालंबाल खात्री असावी लागते. ही एक गोष्ट आणि ह्या अशा नितांत शुद्ध मनांत जी कल्पना एकदां आली, जो विचार एकदां स्फुरला, जें मत एकदां बनलें, त्याबद्दल खंबिरी असणें ही दुसरी गोष्ट. नितांत शुद्ध व सात्त्विक अन्तःकरणाला एकदां जर का एखादी गोष्ट पटली, तर तिच्याबद्दल खंबिरी ही दुसरी गोष्ट. ह्या दिसतात दोन गोष्टी; परंतु ह्या आत्मसात् होणें फार कर्मकठिण आहे. ह्या आत्मसात् होण्यास आयुष्याचा किती अनुभव यायला लागतो. नुसता पुष्कळ अनुभव येऊनच भागत नाहीं. तो अनुभव खराखुरा असा यावा लागतो. जीवनाचें खरें जें मर्म त्याची प्रतीति यावी लागते. जीवनांत झगडा झाल्याशिवाय हें मर्म समजत नाहीं. सुखशायनिकांच्या जीवनांत हा झगडा नसतो. सुखभोजनिकांच्या जीवनांत हा झगडा नसतो. अशांना जीवनाचें मर्महि पण कळत नाहीं व त्यांच्या हातून कार्यहि पण कांहीं होत नाहीं.

असा हा झगडा आगरकरांना त्यांना त्यांच्या सर्व हयातीभर करावा लागला. त्यांचा जन्म बंडाच्या अगोदरच्या एक वर्षातील म्हणजे १८५६ मधील. जन्मानंतर अर्भकावस्थेंतील पहिल्या दोनचार वर्षांत सातारा म्हणा किंवा कऱ्हाड म्हणा किंवा त्यांचें स्वतःचें गांव टेंभू म्हणा, ह्या प्रत्येक ठिकाणीं बंडखोरांचे अत्या-

चार, त्यावर सरकारनें योजलेले कडक उपाय ह्यासंबंधींच्या बातम्या लोकांना फार अस्थिर करीत असत. शिपायांचें बंड झालें उत्तरेंत, परंतु त्याच्या झळा खालीं व विशेषतः सातारसारख्या एके काळच्या छत्रपतीच्या गादीच्या ठिकाणीं आल्याखेरीज कशा राहाव्या? त्यांचा कांहीं थोडा उपद्रव झाला असणारच. शिवाय, कऱ्हाड हा प्रांतच जरा कणखर, जरा दांडगट लोकांचा आहे. कृष्णा-कोयना नद्यांचें पाणी जरा तिखट आहे. मस्त केल्याशिवाय राहात नाहीं. दोन्ही नद्यांच्या संगमावर पोहण्यानें अंगांत रग आल्याशिवाय राहात नाहीं. आगरकर ह्यांचें बालपणचें आयुष्य कऱ्हाड व टेंभू ह्या ठिकाणीं ह्या परिस्थितींत गेलें. घरची गरिबी फार, सर्व आधार आजोळच्या घराचा. आजोळचें भागवतांचें घराणें मात्र चांगलें संपन्न होतें व चांगलें सुसंस्कृतहि होतें. पारंपरिक श्रीमंती व पढिक विद्वत्ता ह्या दोन्ही गोष्टी भागवत कुटुंबांत होत्या व त्या पर्वोपर्वांपर्यंत होत्या. भागवतांच्या मुलांच्याबरोबर ह्या आगरकर मुलाचेंहि मराठी शिक्षण व कांहीं दोनतीन इयत्ता इंग्रजी शिक्षण झालें; पण प्रत्येक वेळीं पुढें काय, ही विवंचना दत्त म्हणून उभी राहायची. मग कोठें मुन्सफ कचेरींत उमेदवारी कर, कोठें दवाखान्यांत काम्पाउंडरी कर, कोठें आताच्या घरीं राहा व वारानें जेव; पण आपलें शिक्षण कसेंबसें रुकुटुकु कर! असें ह्या आगरकर मुलाला करावें लागे. एक गोष्ट मात्र खरी. ह्याला जीं माणसें भेटलीं तीं सामान्यतः बरीं, आस्थेवाईक अशीं भेटलीं. रोघे मास्तर, नागपूरकर मुन्सफ, जोशी मामलेदार, आगरकर डेप्युटी, महाजनी हेडमास्तर, व ह्या सर्वांत आस्थेवाईक व आपुलकीचे दत्तोपंत भागवत किंवा दत्तुमामा, ह्या सर्वांच्या आस्थेमुळें व प्रोत्साहनामुळें ह्या आगरकर मुलाला शिकण्यांत हुरूप येई. सकाळीं दोनप्रहरीं रोघे मास्तरांच्या शाळेंत शिकणें, थट्टा-मस्करी करणें, शाळा सुटल्यानंतर कृष्णा नदींत खूप डुंबणें, घाटावर हूडपणा करणें, कधीं कोठें सभा भरली, तर सभेंत बोलून मुन्सफ-मामलेदारांची वाहवा मिळविणें, कधीं एखादा निबंध लिहून त्यांना वाचून दाखविणें, त्यांनीं कुणाचा उष्टा निबंध घेतलास असें म्हटल्याबरोबर लगेच त्यांच्या समक्ष दुसरा तितक्याच तोलाचा निबंध लिहिणें वगैरे क्रम कऱ्हाडास शाळेंत असतांना ह्या आगरकर मुलाचा चाले. परंतु इतकें केलें तरी पुढें काय, पुढचें शिक्षण कसें करायचें हा प्रश्न नेहमीं असायचाच! नागपूरकर मुन्सफांनीं कोर्टांत उमेदवारी दिली. परंतु ती पांच-दहा रुपड्या देणारी खर्डेघाशी मानवणार कशी? व त्यावर शिक्षणाची गुजराण होणार कशी? ती सोडून त्यांनीं रत्नागिरीची वाट धरली व दीडशें मैलांची वाट म्हणे पायीं तुडविली. तेथें

त्यांचे एक चुलते आगरकर डेप्युटी होते. परंतु चुलत्याच्या घरीं नीट थारा मिळाला नाहीं. दुसऱ्याच्या इथें वारहि लाविले; परंतु कांहीं जुळेनाच. परत पुनः कऱ्हाडला यावें लागलें व काम्पांउंडरची नोकरी धरावी लागली. जिथें पूर्वी उमेदवाराची खर्डेघाशी मानवली नाहीं, तिथें आतां ही औषध मिसळामिसळी कशी मानवावी? मामींना पोंचविण्याच्या निमित्तानें ह्या आगरकर मुलाला अकोल्यास जावें लागलें. तेथें मात्र पुढचा शिक्षणक्रम पुरा होण्याची परिस्थिति लाभली. मामांचें घर, दत्तुमामां-सारखे संवगडी, महाजनींसारखे शिक्षक, वर्गांत दहापांचच मुलें, ह्यामुळें शिक्षणहि चांगलें झालें. रावबहाद्दूर महाजनींच्या शिकवणीचे संस्कारहि चांगले झाले. मुलाची तरतरीहि चांगली दिसून आली; आणि हा आगरकर मुलगा १८७५ सालीं मॅट्रिकची परीक्षा पास झाला.

पुढें कॉलेजमध्यें जायचें, पण जायचें कसें? कॉलेजचा नाद सोड असें आप्तेष्ट म्हणूं लागले, तर "मी डिग्री घेतल्याशिवाय राहणार नाहीं," असें हा मुलगा म्हणूं लागला. अखेर शाळेंतल्या मास्तर मंडळींनींच आपसांत वर्गणी गोळा करून, कॉलेजमधील तीन महिन्यांच्या खर्चाची तरतूद करून मग पुढें स्कॉलरशिपवर भिस्त ठेवायला सांगून, मुलाची रवानगी पुण्यास डेक्कन कॉलेजमध्यें केली. 'वऱ्हाड समाचार' पत्रामध्यें कांहीं मजकूर लिहिण्याबद्दल दरमहा पांच एक रुपयेहि मिळत. दत्तुमामाहि आपल्याला येणाऱ्या पैशांतून कांहीं तरी पुरवणी जोडीत. परिस्थिति एकंदरींत हलाखीची. कधीं सद्रा एकच असायचा तो धुवून वाळवून त्यानें लाज राखायची! कुठें चढाओढ असली, तर निबंध लिही अथवा व्याख्यान दे व बक्षिस मिळव, असें करून खर्च कसाबसा भागवीत. एक वर्ष असेंच कष्टांत गेलें. परंतु पुढें मात्र चांगल्या शिष्यवृत्ति मिळाल्या. प्रोफेसरच्या जवळ बोज वाढला. विद्यार्थ्यांच्यामध्यें प्रतिष्ठा मिळाली. प्रोफेसरांमध्यें सेल्बी, ऑक्सनहॅम, चॅटफील्ड, डॉ. भांडारकर, केरोपंत छत्रे व समकालीन विद्यार्थ्यांच्यामध्यें टिळक, आपटे, भागवत, गोविंदराव कानिटकर, श्रीधरपंत उपासनी ही मंडळी होती. सेल्बीची शिस्त, ऑक्सनहॅमचें इंग्रजीचें-प्रभुत्व, भांडारकर व छत्रे ह्यांचें विद्याव्यसन, आपट्यांची व टिळकांची तीव्र बुद्धिमत्ता व भागवत-कानिटकर ह्यांचें सौहार्द ह्या सर्वांचा त्यांच्या जीवनावर परिणाम झाला. ग्रीस-रोमचा इतिहास, प्लेटो, आरिस्टॉटल्, हर्बर्ट स्पेन्सर, जॉन स्टूअर्ट मिल्ल ह्यांचें तत्त्वज्ञान ह्या सर्व ग्रंथांचें अध्ययन चांगलें झालें. १८७५ सालीं जो हा आगरकर मुलगा कॉलेजमध्यें आला तो पांचसहा वर्षांच्या तेथल्या

राहण्यानें आत्मविश्वासी, प्रौढ, विचारी, बुद्धिवान्, पंडित, कार्यकर्ते गोपाळरावजी आगरकर म्हणून बाहेर पडला.

ह्या पांच-सहा वर्षांच्या अवधींत जसें त्यांचें आंतर बुध्द्यंतर झालें तसें बाह्य देहांतरहि झालें. आगरकरांचा मूळ पिंड चांगला कसलेला, कऱ्हाडच्या काळ्या जमिनींत वाढलेला, कृष्णाकांठच्या वाळवंटांत उनाडलेला, परंतु दारिद्र्यामुळें हेळसांडलेला असा होता. तो ह्या कॉलेजीय वातावरणानें किंचित् सुखावला. तो त्यांचा मध्यम उंचीचा देह, भाग्य दाखविणारें तें त्यांचें विशाल कपाळ, निश्चय दाखविणारी ती त्यांची तीक्ष्ण दृष्टि, कर्तबगारी दाखविणारी ती त्यांची नासिका, पोक्तपणा व भारदस्तपणा दाखविणाऱ्या त्यांच्या भुंवया व मिशा, व आत्मविश्वास दाखविणारा तो त्यांचा एकंदर चेहरा, स्वाभिमानाचें प्रतीक तें त्यांचें दक्षिणी पागोटें, ज्ञानाचें गांभीर्य दाखविणारा तो त्यांचा लांब अंगरखा, व व्यक्ति-वैशिष्ट्य दाखविणारा त्यांचा 'आगरकरी' वळणाचा पायांतील जोडा, अशा ती सरंजामानिशीं जी ही मूर्ति कॉलेजीय वातावरणामधून १८८० सालीं बाहेर पडली, ती पुढें पंधरा वर्षें सारखी महाराष्ट्रांत प्रामुख्यानें विविध क्षेत्रांत वावरली व आपल्या कर्तबगारीनें विचारवंत महाराष्ट्रीयांच्या हृदयकोंदणांत तिनें कायमचें अढळ स्थान मिळविलें. कॉलेजमधून निघतांना आपण सर्वच 'ज्ञानाची पिशवी' घेऊन बाहेर पडतों. लाक्षणिक अर्थानें तें आपणा सर्व इतरांच्या बाबतींत खरें आहे. परंतु रानडे, तेलंग, भांडारकर, चिपळूणकर, आपटे, टिळक, आगरकर ह्यांच्याबाबत तें वास्तव अर्थानें खरें होतें. इतकाच त्यांच्यांत आणि आपणा सर्वांत फरक !

अभ्यासक्रम संपल्यानंतर काय करायचें हें अगोदरच ठरलेलें होतें. टेंभूच्या घाटावर मामाभाचे एकदां शिळोप्याच्या गप्पा मारीत बसले असतां 'तूं आतां काय करणार' असें एकमेकांस विचारूं लागले. गोपाळरावांनीं त्याच वेळेस आपल्या पुढील जीवनाची त्यांना कल्पना दिली. "आपले लोक अज्ञान आहेत, तेव्हां त्यांना शहाणे करून सोडण्याचा प्रयत्न करावा," हा आपला उद्देश असल्याचें त्यांनीं सांगितलें. दुसऱ्या एका प्रसंगीं कोडोपंत मास्तर, रामभाऊ मामा व स्वतः गोपाळ-राव फराळ करीत वाड्यांत बसले असतां मास्तर विचारते झाले कीं, गोपाळराव आतां काय करणार ? रामभाऊमामा लागलेच उद्गारले, "ह्याला सबजज्जाची जागा योग्य आहे. कारण ह्याला लिहिण्याची तशीच बोलण्याची हौस आहे. त्या साऱ्या हौशी त्या जाग्यावरच साधतील...शाळाखातें काय ! तें रडवें खातें ! त्यास

विचारतो कोण !" गोपाळरावांनीं लगेच हसून त्यांचेंच वाक्य त्यांच्यावर उलटविलें. "कर्णाला छपरावर ठेवून कर्णाचें दातृत्व वर्णन करण्यासारखेंच (राम) भाऊ म्हणत आहेत." त्यांच्या म्हणण्याचा आशय हा होता कीं मुन्सफ, मामलेदार हे सर्व शिक्षणखात्यामुळेंच निर्माण होतात. मग तें खातें रडवें कसें ? कांहीं दोष असले तर ते आपण दूर केले पाहिजेत. एम्. ए. झाल्यानंतर त्यांनीं आपल्या मातुश्रीला जी विनंति केली, तिचा उल्लेख वर आलाच आहे. एकंदरींत काय, त्यांनीं आपल्या आयुष्याचें ध्येय निश्चित केलें होतें आणि तें ध्येय म्हणजे समाजाची सेवा किंवा 'लोकसेवा' हें होय.

जीवनाचें ध्येय निश्चित केलें व तें सिद्धीस नेण्याची संधीहि पण चालून आली. चिपळूणकर त्या वेळीं सरकारी नोकरीच्या पाशांतून नुकतेच मोकळे होऊन चांगली शाळा काढण्याच्या विचारांत होते. त्यांना हे दोघे, टिळक आणि आगरकर, जाऊन मिळाले. आणखीहि उत्साही व विद्वान् नामजोशी, भागवत, करंदीकर, आपटे वगैरे तरुण मंडळी येऊन मिळाली. ह्यांत कोणाला स्फूर्ति कोणापासून झाली हें शोधण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ही मंडळी एकत्र झाली खरी. स्वाभिमान, स्वदेशप्रीति आपल्या ऐतिहासिक पुरुषांबद्दल आदर वगैरे उच्च मनोवृत्ति ह्या सरकारी शाळेंत मिळत नाहींत. त्या ह्या आपल्या शाळेंत विद्यार्थ्यांच्यामध्यें निर्माण करायच्या ही मुख्य सर्वांची प्रेरणा होती. हे खंदे वीर मिळाल्यावर एक साधें हायस्कूल तें काय ? चांगलें भरभराटीनें चाललें असल्यास नवल नाहीं.

लोकसेवेचा हा एक उद्योग झाला. परंतु ह्यानें समाधान होईना. सर्वांची विद्वत्ता, तारुण्य, धडाडी व स्वदेशाबद्दलची आंच त्यांना स्वस्थ बसूं देईना. चिपळूणकर काय, टिळक काय किंवा आगरकर काय, आपटे काय, ह्यांपैकीं प्रत्येकजण लेखणीचा मोठा खंबीर होता. तेव्हां मतप्रचारासाठीं म्हणून त्यांनीं शाळेचें काम संभाळून केसरी व मराठा हीं दोन वर्तमानपत्रें काढण्याची योजना मुक्रर केली. न्यू इंग्लिश स्कूल निघालें १-१-१८८० ला व केसरी, मराठा हीं दोन वर्तमानपत्रें पुढच्या वर्षी जानेवारींत निघालीं. शाळा काय किंवा हीं दोन वर्तमानपत्रें काय, इतकी जूट चांगली मिळाल्यानंतर चांगल्या जोमानेंच तीं चालणार ! त्यांत मालाकार चिपळूण-कर होते. त्यांत 'किरण'कार नामजोशी होते. त्यांत संस्कृत पंडित वामनराव आपटे होते. त्यांत इंग्रजीवर प्रभुत्व असणारे केळकर होते. शिवाय, संपादनाचा सर्व भार वाहण्यास आगरकर आणि टिळक हे होतेच. सर्वच विद्वान्, सर्वच फर्डे लेखक,

र्वेच स्वार्थत्यागी व सर्वेच निःस्पृह व निश्चयी. थोड्याच काळांत हीं वर्तमानपत्रें र्वांच्या वाचनांत येऊं लागलीं. 'केसरी'नें तर त्यांतल्या त्यांत विशेषच प्रतिष्ठा मेळविली. त्यांतील तेजस्वी बिचारांनीं व ओजस्वी भाषेनें लोकांना विशेषच ोहिनी घातली. त्यांच्यापूर्वी 'प्रभाकरदर्पण' वगैरे पुष्कळ वर्तमानपत्रें निघालीं. ज्ञानप्रकाश', 'इंदुप्रकाश' हीं त्या काळीं होतींच. परंतु ह्या केसरीनें मराठी र्तमानपत्रांत एक नवीन युग निर्माण केलें. पहिल्या सहासात वर्षांत जी कांहीं तिष्ठा ह्या पत्रानें मिळबिली, त्याचें सर्व श्रेय गोपाळरावजींना आहे. ही प्रतिष्ठा मेळबितांना क्लेशहि पुष्कळ झाले. अगदीं आरंभालाच भावनेच्या व नीतीच्या दृष्टीनें त्पक्ष म्हणून करवीर छत्रपतींचा कैवार घेतल्यामुळें बर्वे कारभाऱ्याची तोहमत ायद्यानें अंगावर आली आणि आगरकर व टिळक ह्या दोघांना डोंगरीचा कारावास ोगावा लागला, व एका वर्तमानपत्रीय दिव्यांतून चांगले सुलाखून मोठ्या उज्ज्वलतेनें दोघे बाहेर पडले. केसरी फार जोमानें पुढें चालला. सामान्य लोकांत त्यानें ाचनाची गोडी तर निर्माण केलीच, परंतु त्यानें त्यांना विचार करावयास शिकविलें. ांना आपल्या देशाची जाणीव उत्पन्न करून दिली, आपल्या ऐतिहासिक विभूतीं-द्दलचा त्यांचा आदर दुणावला, त्यांना बिबिध बिषयांची माहिती करून दिली. ोडक्यांत म्हटलें म्हणजे केसरीनें सामान्य लोकांना साक्षर केलें, शहाणे केलें, ्राभिमानी केलें. ह्याचें आरंभाचें श्रेय आगरकरांचें आहे! नंतरचें बरेंचसें श्रेय टळकांचें आहे!! सध्यांचें सर्व श्रेय केळकरांचें आहे!!!

टिळक-आगरकरांचा खरा घनिष्ठ संबंध ह्या वर्तमानपत्राच्या बाबतींत आला. ागरकर 'केसरी'चे संपादक तर टिळक 'मराठ्या'चे संपादक. शाळा, संस्था व पुढें ॉलिज ह्या तिहींसंबंधीं आपलीं कामें योग्य रीतीनें बजावून, ते दोघे हें संपादकाचें ाम एकोप्यानें करीत. दोघेहि विद्वान्, दोघेहि अभिमानी, दोघेहि निश्चयी, ोघेहि करारी, दोघेहि आग्रही, दोघेहि भावनांनीं व बिचारांनीं कणखर, दोघेहि मेल्ल-स्पेन्सरचे अनुयायी, दोघेहि दंभाचे शत्रु, दोघेहि देशोन्नति व समाजोन्नतीबद्दल ातुर, दोघेहि युयुत्सुवृत्तीचे, दोघेहि आत्मविश्वासी. अशा रीतीनें बिचारांची, ावनांची, वृत्तींची बैठक बरीचशी सारखी होती. तरी पण कांहीं कांहीं वेळां कुठें ुठें खटकत असे. इतकी जरी वृत्ति समस्वरूपी झाली तरी कांहीं वेळां प्रत्येकाचा ्वभावधर्म वर डोकें काढीतच असे.

तो त्या प्रत्येकाचा स्वभावधर्म डोकें वर काढीत असे तरी कसा? आगरकरांच्या

अंतःकरणाला एकदां एखादी गोष्ट पटली म्हणजे मग काय वाटेल तें झालें तरी ती कृतींत उतरल्याखेरीज राहत नसे. ते केवळ आपल्या अंतःकरणप्रवृत्तीस मान देत. टिळकांचें थोडेंसें निराळें असे. जरी एखादी गोष्ट पटली तरी भोंवतालची परिस्थिति ते विचारांत घेत असत व त्याप्रमाणें पटलेली गोष्ट कृतींत उतरवतांना अवलंबावयाच्या उपायांना व साधनांना कधीं कधीं ते मुरड घालीत. "समाज हा अचल गोळा आहे; त्यांत तुम्हीं आपल्या विचारांचें जीवन ओतून त्यांत चैतन्य निर्माण केलें पाहिजे; समाज स्वतः कधींच विचार करणार नाहीं. त्याला विचार करायला लावलें पाहिजे. प्रसंगविशेषीं आपल्या विचारांचा प्रतोद हातीं घेऊन समाजाला आपल्यापुढें हाकललें पाहिजे," अशी आगरकरांची विचारसरणी होती. उलट, टिळक असें म्हणत कीं, समाज ही एक जिवंत संस्था आहे, प्रगतीची त्याची एक गति आहे. त्या गतीप्रमाणें समाजाबरोबर आपण गेलें पाहिजे. समाजाला पुढें ढकलून नेण्यांत अर्थ नाहीं. असा दोघांच्या विचारसरणींत भेद होता. शिवाय, सामाजिक सुधारणा करवून आणण्याच्या बाबतींत सरकारच्या मदतीची याचना कधींच करायची नाहीं हा टिळकांचा बाणा होता. राजकीय सुधारणा अगोदर झाल्यानंतर समाज-सुधारणा तेव्हांच अमलांत आणतां येतील, हें त्यांचें म्हणणें असे. असा ह्या दोघांच्या विचारसरणींतील भेद होता.

भेद यायचा कोठें ? भेद तर दोघांत होताच व तो जबर होता. तो इतका जबर होता कीं, आगरकरांना स्वतः जोपासलेला 'केसरी' सोडावा लागला व टिळकांना डी. ई. सोसायटीचा राजीनामा द्यावा लागला. भेद दोघांत होता तो दोघांच्या भावनाप्रकर्षांत होता. आगरकर हे टिळकांच्यापेक्षां अधिक भावनाप्रधान होते. ते भावनामय होतेच, परंतु भावनावशहि ते पुष्कळ वेळां होत असत. भावनांची तीव्रता व आर्तता आगरकरांची अधिक होती. भोंवतालच्या समाजांतील अनिष्ट रूढी, अन्याय, दुःखें ह्यांचा परिणाम आगरकरांच्या मनावर तेव्हांच होई. दलितांची दलितांच्यापेक्षां करुणा त्यांना विशेष येई. सामाजिक अन्याय त्यांना दिसत, पण ते जवळचे दिसत. सुसंस्कृत समाजांतील दिसत. मध्यम वर्गांतील दिसत. देशाच्या सर्वंकष उन्नतीच्या पटाच्या चौकटींत सामाजिक अन्यायाचें महत्त्व व स्थान कोणतें, व खरे सामाजिक अन्याय कोणते, ह्याचें तारतम्य भावनांच्या भरांत त्यांच्या ध्यानांत तितकें स्पष्ट येत नसे. त्यामुळें त्यांच्या सामाजिक तत्त्वप्रणालींत ब्राह्मण-स्त्री, तिचें शिक्षण, तिचा विवाह, तिच्यावरील बंधनें, तिला

होणारे अन्यय, ब्राह्मण-धर्म, त्यांतील थोतांडें, त्यांतील अनिष्ट आचार ह्या विषयांनाच प्राधान्य असे. संमतिवय, प्रौढविवाह, स्त्रीशिक्षण, स्त्री-स्वातंत्र्य, विधवांची करुणस्थिति, त्यांचें वपन इत्यादि गोष्टींवर त्यांनीं विशेष भर दिला. ह्यासंबंधीं सुधारणा घडवून आणण्यांत सरकारची मदत जरी घ्यायला लागली, तरी हरकत नाहीं. इतकेंच नव्हे तर, सरकारी कायद्यानेंच ह्या सुधारणा घडवून आणाव्या असेंहि त्यांचें सांगणें असे. भोंवतालीं सदासर्वकाळ होणारे हे अन्याय त्यांचा मनःप्रक्षोभ उत्पन्न करीत व हे अन्याय नाहींसे केल्याखेरीज त्यांना चैन पडत नसे.

हे अन्याय खरे, परंतु ह्याला महत्त्व किती द्यायचें व त्यांच्यांत पौर्वापर्य कसें ठरवायचें, हा मुख्य टिळक-आगरकर ह्या दोघांमधील वादाचा खरा मुद्दा होता. मतभेद झाला तो येथेंच झाला. केसरीच्या आरंभीं हा मतभेद इतका दिसून आला नाहीं. त्याचें सूक्ष्म मूळ होतेंच; पण पुढें मलबारी ह्यांच्या संमतिवयाच्या बिलाच्या वेळीं तो मतभेद एकदम उपटला आणि त्याच्या क्षोभांत ही भीम-अर्जुनाची जोडी दुभंगली व आजवर एका दिशेनें जाणारे दोन वीर दोन भिन्न दिशांनीं जाऊं लागले. एका दिलाचे हे दोन मित्र जसे बेदिल झाले, तसे अनुयायीही पण बेदिल झाले. महाराष्ट्रांतील दोन विचार-प्रवाह दोन भिन्न दिशांनीं वाहूं लागले. एकाचा अग्रणी केसरी झाला व दुसऱ्याचा सुधारक झाला.

१८८८ सालीं दसऱ्यास सुधारक निघाला तो "इष्ट असेल तें बोलणार व साध्य असेल तें करणार" ह्या ईर्षेनें निघाला. जरी ही घोषणा प्रत्यक्ष सुधारकाच्या बाबत एका अग्रलेखाच्या शीर्षकाच्या रूपानें उद्घोषिली गेली, तरी आगरकरांच्या राजकीय किंवा सामाजिक सर्व लिखाणाचें मर्म त्यांतच असल्यामुळें पूर्वीच्या केसरीमधील त्यांच्या लिखाणाबाबत ती घोषणा प्रच्छन्न अवस्थेंत नव्हती असें थोडेंच होतें. आगरकरांचा बाणाच हा होता. इष्ट असेल तेंच आगरकर बोलले व साध्य असेल तेंच आगरकरांनीं केलें; व ह्याच मताच्या पुरस्कारक मित्रांनीं त्यांना ह्या कामांत मदत केली. सितारामपंत देवधर, गोपाळराव गोखले वगैरे मंडळींचें त्यांना साह्य असे. केसरीनें जसें नांव मिळविलें तसें सुधारकानेंहि नांव मिळविलें. केसरी काय किंवा सुधारक काय, हीं मतपत्रें होतीं. विशिष्ट मतप्रणालीचा प्रसार करणें हें त्यांचें ध्येय. ह्या ध्येयाच्या सिद्धीसाठीं त्यांना सर्व साधनांचा उपयोग करावा लागे. टिळक-आगरकर हे दोघे नाणावलेले लेखक असल्यामुळें त्यांच्या लेखनांत वाङ्मयीन व भाषिक असें दोन्ही प्रकारचे गुण उतरत असत. कोटिक्रम करण्यांत टिळक

तरबेज असत, तर भावनांच्या जोरावर वाचकांच्या अन्तःकरणालाच हात घालण्यांत आगरकर तरबेज असत. ' केसरी ' द्वारां जशी आगरकरांनीं राजकीय, औद्यागिक, सांस्कृतिक, धार्मिक व सामाजिक अशा निरनिराळ्या विषयांवर लिखाण लिहून महाराष्ट्राची सेवा केली तशीच ' सुधारका ' च्या द्वारां केली. प्रत्येक विषयावर लेहितांना त्या विषयाचें सोपपत्तिक विवेचन यायचेंच परंतु त्या विषयाचा आपल्या महाराष्ट्रीय समाजस्थितीशीं संबंध कसा आहे ह्याचें स्पष्टीकरण विशेष यायचें. प्रत्येक विषयाला सामाजिक दृष्टीचा निकष लावून ते त्याची तपासणी करीत. त्यामुळें त्यांच्या लिहिण्यांत जिवंतपणा येत असे. सुधारकांत ' धर्मविचार, तरुणांस विज्ञापना, सोंवळ्याची मीमांसा, व्यापारवृद्धि, विवाहनिराकरण, प्रियाराधन, वल्लभोपासना, स्वातंत्र्याच्या वृथा वल्गना, सामाजिक स्थित्यंतरें, करून कां दाखवीत नाहीं ? जात का करीत नाहीं ?, सामाजिक सुधारणेस अनुकूल काल, गुलामांचें राष्ट्र, शिक्षणसक्ति, मुलामुलींचें शिक्षण, वडीलपणाचे हक्क ' वगैरे निरनिराळ्या विषयांवर आगरकरांनीं आपले विचार प्रदर्शित केले. ह्या सर्व लेखांत लेखकाच्या मनाची सुधारणेबद्दलची तळमळ दिसून येते. स्पष्ट विचार, शुद्ध भावना, सात्त्विक वृत्ति, सडेतोड प्रतिपादन व आदर्श भाषाशैली ह्या गोष्टी आगरकरांच्या लेखनांत पदोपदीं दिसतात. कांहीं गौप्य नाहीं, वा कुठें पडदा नाहीं. जें हृदयांत तेंच मनांत व जें मनांत तेंच लेखणींत असा त्यांचा क्रम असे.

मराठींतील एक उत्तम निबंधकार व उत्तम भाषांतरकार म्हणून आगरकर ह्यांचें नांव मराठी वाङ्मयांत कायमचें राहील. निबंधवाङ्मय म्हणजे बौद्धिक वाङ्मय होय. तें भावनिक वाङ्मय नव्हे. त्याची हाक बुद्धीला पोहोंचते, अंतःकरणाला पोहोंचत नाहीं. निबंध हा बुद्धीचा विलास आहे, तो विचाराचें वैभव आहे. तो हृदयाचा प्रक्षोभ नव्हे, तो भावनांचें वैभव नव्हे. त्यामुळें निबंधवाङ्मयांत पांडित्य असतें, त्यांत व्यवहारज्ञान असतें; त्यांत उपयुक्तता असते, त्यांत वास्तवता असते, आगरकरांच्या निबंधवाङ्मयांत हे सर्व गुण तर आहेतच, परंतु भावनिक गुणहि तितकेच आहेत. आगरकरांचे निबंध हें बौद्धिक वाङ्मय असून भावनिक वाङ्मयहि आहे. त्यांची हाक बुद्धीला जाते व अन्तःकरणालाहि जातें. त्यांत विचाराचें वैभव आहे व भावनांचेंहि वैभव आहे. त्यांत पांडित्य आहे व भावनाप्रकर्षहि आहे. त्यांचें लिखाण व्यवहारालाहि पटतें आणि न्यायबुद्धीलाहि पटतें. त्यांच्या लेखनशैलींत शब्दसौंदर्य, अलंकारयोजना, विनोद, कोटी, श्लेष, सुभाषितें इत्यादि शैलीचे बाह्य

गुणांबरोबर ओज, प्रसाद, कान्ति, आवेश हे तिचे आंतर गुणहि आढळतात. दर्दुरानुकारी वैदिक, गेंड्या लढवय्या, गांवढळ अर्थशास्त्री, पारधीवृत्ति, मनोलाघव, नर्मसाचिव्य, श्रेष्ठायत्त कुटुंब, झगेदार बायका, सनदी स्वेच्छाचारी, क्रियाप्रवृत्ति असे किती तरी आगरकरी ठशाचे शब्द उल्लेखण्यासारखे आहेत. त्यांच्या वाक्यांत संस्कृतप्राचुर्य भारदस्तपणा येण्याइतकें माफक असे. वाक्येंहि अर्थवाही, कधीं लहान तर कधीं पल्लेदार असत. समतेचीं किंवा सारख्या तोलाचीं वाक्यें लिहिण्याकडे त्यांचा कल विशेष असे. आंतील विचाराच्या व भावनेच्या ओघाप्रमाणें त्यांचें वाक्य हळूहळू लांबत जात असे. वाचकांच्या वृत्तींना चालना देणें हा त्यांचा मुख्य कटाक्ष असे.

आगरकरांच्या पूर्वी निबंधवाङ्मय पुष्कळांनीं लिहिलें व नंतरहि पुष्कळांनीं लिहिलें. जांभेकर, भाऊमहाजन, ज्योतिबा फुले, विष्णुबुवा, बाबा पदमनजी, विष्णुशास्त्री पंडित, महाजनी व सर्वश्रेष्ठ विष्णुशास्त्री चिपळूणकर हे आगरकरांच्या पूर्वींचे कांहीं निबंधलेखक होत. टिळक हे त्यांचे समकालीन. परांजपे, खाडिलकर, केळकर, अच्युतराव कोल्हटकर, माडखोलकर हे त्यांच्यानंतरचे कांहीं निबंधलेखक होत. ह्या सर्व निबंधकारांत आगरकरांचें एक विशिष्ट स्थान आहे. त्यांचे निबंध हे भावनामय निबंध आहेत. असेच्च भावनामय निबंध शिवरामपंत परांजपे व अच्युतराव कोल्हटकर ह्यांचेहि आहेत. परंतु त्यांच्या निबंधांत वास्तवतेपेक्षां कल्पकता अधिक व भावनामयतेपेक्षांहि कल्पकता अधिक असते. वास्तवता, भावनामयता व कल्पकता हे तीन जर निबंधवाङ्मयाचे प्रधान आंतर घटक समजले, तर लोकहितवादींच्या निबंधांत वास्तवता अधिक, परांजपे-कोल्हटकरांच्या निबंधांत कल्पकता अधिक, केळकरांच्या निबंधांत वास्तवता अधिक आढळते. आगरकरांच्या निबंधांत भावनामयता अधिक आढळते. चिपळूणकर हे असे एकच्च निबंधकार दिसतात कीं, त्यांच्या निबंधवाङ्मयांत वास्तवता, भावनामयता व कल्पकता ह्या तिन्ही घटकांचें योग्य मिश्रण किंवा मधुर मीलन आढळतें.

'केसरी व सुधारक' ह्या दोन नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाखेरीज आगरकर ह्यांनीं विकारविलसित (हॅम्लेटचें भाषांतर), आमचे डोंगरीवरील १०१ दिवस व वाक्यमीमांसा हीं पुस्तकें लिहिलीं. त्यांचें निबंध-वाङ्मय विपुलच्च आहे. कांहीं तरी सातशें-आठशें निबंध सबंध पंधरा वर्षांतील निघतील. ही इतकीच त्यांची भाषेची सेवा धरली, तरी ती पुष्कळच व भरदार आहे. 'विकारविलसित' हें

भाषांतरित नाटक असलें तरी मराठी नाट्यवाङ्मयांत त्याला गणनीय असें स्थान आहे. भाषांतर मुळाबरहुकूम असून पुनः मराठी भाषेच्या स्वभावाबरहुकुम आहे. भाषांतरांत ‘गोळकी मराठी’ येत नाहीं ह्याबद्दल त्यांनीं विशेष खबरदारी घेतली आहे. भाषांतरासंबंधीं त्यांनीं आपलीं कांहीं मतें ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत मांडली आहे. ‘आमचे डोंगरीवरील १०१ दिवस’ ह्या पुस्तकांत तुरुंगांतील अनुभवांचें वर्णन आहे, व तें यथातथ्याचें आहे. ‘वाक्यमीमांसा’ हें पुस्तक व्याकरणावरील आहे. हा विषयच अगदीं सर्वांनीं आणि त्यांतहि पुनः सुशिक्षितांनीं दुर्लक्षिलेला, त्यांत पुनः संस्कृत व इंग्रजी ह्या भाषांचा पगडा अधिक. अशा परिस्थितींत आगरकरांनीं ‘वाक्यमीमांसा’ हा ग्रंथ लिहायला घ्यावा हें त्यांच्या मराठी भाषेवरील प्रेमाचें व अभिमानाचें द्योतक आहे. संस्कृतीची भाषा म्हणून संस्कृत भाषेचा अभ्यास करा. राज्यकर्त्यांची भाषा म्हणून इंग्रजी भाषेचाहि अभ्यास करा. पण मराठी भाषेची आबाळ करूं नका! हीच कळकळ ह्या ग्रंथलेखनाच्या मुळाशीं आहे.

आगरकर गेले, एक महापुरुष नाहींसा झाला! आज पन्नास वर्षें झालीं. सुधारक गेला, एक स्फूर्ति नाहींशी झाली; पण आगरकरांनीं व सुधारकानें आरंभिलेल्या कार्याची जाणीव महाराष्ट्रास आहे. त्यांनीं पुरस्कारलेलें सामाजिक सुधारणेच्या कार्याचें महत्त्व आजच्या पिढीस आकलन होणार नाहीं. सामाजिक स्थित्यंतरें आज मोठ्या झपाट्यानें होत आहेत, व तीं कधीं आर्थिक परिस्थितीनें तर कधीं जागतिक आंदोलनानें तर कधीं आपोआप होत आहेत. परंतु ज्या काळीं आगरकरांनीं तीं सामाजिक स्थित्यंतरें पुरस्कारिलीं व प्रचारिलीं, त्या काळीं त्यांचें महत्त्व विशेष होतें. हें करतांना महाराष्ट्रांत जो आत्मविश्वास निर्माण केला, जी स्वतंत्र विचार करण्याची शक्ति आणून दिली त्याबद्दल महाराष्ट्र त्यांचें ऋणीच राहील. त्यांचें एक कार्य अद्याप मागें आहे व तें चांगल्या सुस्थितींत आहे. त्यांचें न्यू इंग्लिश स्कूल, डी. ई. सोसायटी, फर्ग्युसन कॉलेज ह्या संस्था त्यांचीं उत्तम स्मारकेंच होत. ह्या संस्थांना जे नेते लाभले, त्यांत आगरकर हे अग्रगण्य होते. फर्ग्युसन् कॉलेजचे प्रिन्सिपॉल म्हणून कांहीं वर्षें आगरकर हे काम पाहात होते. फर्ग्युसन् कॉलेजचें नशीब खरेंच चांगलें कीं, त्याला असे प्रिन्सिपॉल मिळाले कीं ज्यांच्या हेतूंबद्दल, ज्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल, ज्यांच्या बौद्धिक सचोटीबद्दल, ज्यांच्या वर्तनांतील नेकीबद्दल कोणाला कधींच संशय आला नाहीं. प्रत्यक्ष त्यांच्या शत्रूंना देखील कधीं हा संशय आला नाहीं. आगरकरांचीं मतें जरी पसंत नसलीं, तरी त्यांच्या हेतूंबद्दल

व नेकीबद्दल कधींहि संशय नसे. प्रिन्सिपॉल परांजपे ह्यांचीं कांहीं मतें तितकीशी पसंत नसून देखील परांजप्यांना कौतुकानें निहाळण्यासाठीं आम्ही धाव घेत असूं व अद्यापहि धाव घेतों. प्रिन्सिपॉल महाजनींचीं मतें सध्यांच्या पिढींतील तरुणांना पसंत आहेत, ह्याची जाणीव आम्हांस नाहीं. परंतु त्यांना कौतुकानें न्याहाळण्यास आजचे विद्यार्थीहि धाव घेतात हें आम्हीं पाहिलें आहे. ह्या सर्वांच्या मुळाशीं गोष्ट एकच आहे. त्यांच्या हेतूबद्दल कुणाला कधींहि संशय तिळमात्र नसतो. बौद्धिक सचोटीबद्दल सर्वांना खात्री असते.

आगरकरांच्या देहावसानाला आज पन्नास वर्षें झालीं. ह्या निमित्तानें त्यांच्या आत्म्यास आज ही आमची निवापांजलि अर्पण करीत आहों. *

* ह्या निबंध तयार करतांना केसरींतील निवडक निबंध, सुधारकांतील निवडक निबंध, प्रो. आळतेकरांचें आगरकर चरित्र, अर्वाचीन वाङ्मयसेवक, जावडेकर ह्यांचें आधुनिक भारत, इत्यादि पुस्तकांचा उपयोग झाला. लेखक आभारी आहे.

# १. कै. डॉ. माधव त्र्यंबक पटवर्धन

डॉ. माधवराव पटवर्धन गेले! आज बारा दिवस झाले. (गेल्या बुधवारच्या मागच्या बुधवारीं) रात्रीं बाराच्या सुमारास आपल्या आयुष्याच्या ध्येयाची पूर्ति आपल्या मगदुराप्रमाणें करून त्यांनीं आपली जीवितयात्रा संपविली. जीवित-ध्येयाच्या पूर्तीचें समाधान मिळाल्याखेरीज कोणी प्राणी कालवश होत नाहीं असें म्हणतात. ईश्वराची योजना तशी असल्याचेंही कोणी सांगतात. परंतु ही भोळी समजूत आहे व अशीं माधवरावजींच्या निधनासारखीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे त्यांच्यावर विश्वासच बसत नाहीं. आयुष्याच्या ऐन भरांत त्याची दोरी तुटली जातांना त्या बिचाऱ्याला ध्येयपूर्तीचें कितपत समाधान मिळालें असेल! उशिरां सुरू केलेला संसार जरासा कोठें स्थिरावत जात आहे तोंच तो सोडून जातांना त्यांच्या मनाला काय वाटलें असेल! आपली पत्नी व दोन लहान अर्भकें ह्यांच्या तोंडाकडे बघत त्यांना सोडून जातांना दुःखाची किती परमावधि झाली असेल! काय माधवरावांनीं आपल्या कार्यांचे मनोरथ रचले, अमुक काव्यानंतर अमुक एक दुसरें काव्य रचावयाचें, नकुलालंकारानंतर मधुलहरी लिहावयाच्या; फार्सी-मराठी कोशानंतर सर्व इतिहाससाधनें वाचावयाचीं; छंदोरचनेनंतर रसचर्चा करावयाची, भाषाशुद्धीनंतर लिपिशुद्धि करावयाची; असे किती मनोरे रचलेले होते. एक ग्रंथ हस्तलेखाच्या स्वरूपांत तर दुसरा ग्रंथ छापखान्यांत प्रुफाच्या स्वरूपांत, तर तिसरा विक्रीच्या स्वरूपांत असें अखंड लेखन करावयाचें अशी पद्धत आंखलेली. परंतु कालाच्या निर्घृणपणानें तें जेथल्या तेथेंच विरून गेलें.

माधवरावांना पंचेचाळीस वर्षांची हयात लाभली. परंतु त्याच हयातींत त्यांनीं कार्य अमूप व अनुपम केलें. हें जें कार्य त्यांना करतां आलें त्याचें कारण त्यांनीं आपल्या आयुष्याचें ध्येय प्रथमपासून निश्चित केलें होतें हें होय. आपणांपैकीं पुष्कळांना अगोदर आयुष्याला कांहीं ध्येय असतें ह्याची कल्पनाच नसते व कल्पना जर असली, तर तें ध्येय निश्चित करतां येत नाहीं व निश्चित केलें तर त्याचा पिच्छा पुरवितां येत नाहीं. महत्त्वाच्या संपादनाची गोष्ट दूरच राहिली. परंतु माधवरावांनीं हें ध्येय निश्चित करून त्याच्या प्राप्तीसाठीं आपल्या शक्तीप्रमाणें प्रयत्न केले व आतां त्यांच्या कार्याकडे पाहिलें तर बऱ्याच अंशानें तें साध्य झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. ऐन पंचविशींत एका मुख्य कॉलेजांत प्रोफेसरी व डे. ए. संस्थेचें सदस्यत्व,

ऐन तिशींत प्रतिभासंपन्न कवि म्हणून गौरव, ऐन चाळिशींत चिकित्सक संशोधक व विद्वान् म्हणून म. सा. संमेलनाचें अध्यक्षपद आणि मराठी वाङ्मयाचे पहिले डी. लिट् ह्या बिरुदाची प्राप्ति—इतके मानसन्मान इतक्या हयातींत फार थोड्यांच्या वांट्याला येतात. वाईट जे वाटतें तें ह्याचेंच कीं असा हा उत्कर्षाचा पेला ओंठाला लागून ज्ञानपिपासेचें समाधान होतें न होतें तोंच तो नाहींसा झाला !

माधवरावांचा स्वभाव आनंदी असे. वृत्ति नेहमीं आशावादी व हसतमुख. कोणाच्याही संगतींत ते तेव्हांच एकरूप होत. थोड्या थोडक्याशा मित्रपरिवारांत तर लगेंच रंगत, व सर्व मित्रांनाही रंगवून टाकीत. खेळीमेळीला लागलीच सुरुवात होई. त्यांच्या आठवणी चटकदार असत. ते आपलें काव्य ठेकदार म्हणत. कांहीं फार्शी भाषेंतील कविता ते अगदीं थेट वेदघोषाप्रमाणें म्हणतांना तर फारच मजा येई व हा आधुनिक फार्शी पंडित आवळसकर पटवर्धन एखाद्या दशग्रंथी पढीक विद्वानाप्रमाणें वाटत असे. माधवरावांच्या संगतींत ज्यांचे ज्यांचे क्षण गेले, त्यांना ह्या सर्वांची आठवण झाल्याखेरीज राहणार नाहीं. त्यांचें व्यक्तिमत्त्व तर तेव्हांच प्रतीत होत असे इतकें तें निश्चित होतें. त्यांची आनंदी वृत्ति इतरांना आनंदी करीत असे. त्यांच्या सभ्य विनोदांत सर्व मिसळून जात. त्यांच्या प्रेमळ वात्सल्यांत लहान मुलें समरस होत. आईच्या अंगाईनें एखादे वेळीं लहान मूल रडावयाचें थांबायचें नाहीं, परंतु तें माधवरावांच्या अंगाई गीतानें थांबावें. विरोधक असला तर माधवरावां-सारखा असावा असें त्यांचे प्रतिपक्षी म्हणतांना आढळतात. आपल्या पुस्तकावरील विरुद्ध अभिप्राय व परीक्षणें छापून प्रसिद्ध व्हावीं म्हणून ते त्या लेखकासाठीं आपलें वजन खर्च करीत. वादविवादांत किंवा चर्चेंत विरोधकाला चर्चेनंतर मिठी मारीत. इतका उमदा स्वभाव त्यांचा होता. न्यायाचा जसा ते पुरस्कार करीत, तशी त्यांना अन्यायाचीहि चीड असे. “ पराभूतांचे कैवारी ” म्हणून त्यांचे स्नेही त्यांना कधीं कधीं विनोदानें म्हणत असत. त्यांच्या स्वभावांत दोष नव्हते किंवा त्यांच्याकडून प्रमाद होत नसत असें नाहीं. परंतु ज्या ज्या वेळीं असें कांहीं होई, त्या त्या वेळीं आपला दोष व आपला प्रमाद कबूल करण्याचा उदारपणा त्यांच्यांत होता.

एक प्रेमळ स्नेही म्हणून, एक उमदा विरोधक म्हणून व एक आक्रमणशील प्रचारक म्हणून माधवरावांची योग्यता आहेच; परंतु त्याहिपेक्षां अधिक योग्यता त्यांची अव्वल दर्जाचा कवि व संशोधक म्हणून आहे. उत्तम दर्जाचें काव्य किंवा उत्तम दर्जाचें संशोधन ह्या गोष्टी कांहीं सवंग पैदा होत नाहींत. ह्या चिजा फार

दुर्मिळ आहेत. कष्टसाध्य आहेत. प्रतिभेच्या जोपासनेंत तपें घालावीं लागतात. प्रतिभा अगोदर फार थोड्यांना असते. असली तर तिला सुसंस्कृत करणारे फार विरळा. प्रतिभा किंवा प्रज्ञा ह्यांचें संस्करण प्रयत्नाशिवाय साध्य होत नाहीं. ह्याला तपश्चर्या लागते. माधवरावांनीं गेलीं दीड-दोन तपें सारखे परिश्रम करून प्रतिभा व प्रज्ञा ह्यांना विशिष्ट वळण दिलें होतें. ह्या परिणत प्रतिभेचीं व प्रज्ञेचीं फळें नुकतींच कोठें मिळत चाल्लीं होतीं.

'मधु माधव' ह्या संग्रहांतील काव्यांत स्फूर्तीचे व भावनांचे जे अंकुर उद्भवले, त्यांची परिणति सुधारक, विरहतरंग, द्राक्षकन्या, गज्जलांजलि, स्वप्नरंजन, तुटलेले दुवे इत्यादींमधील अवस्था घेत घेत नकुलालंकारांत किंवा रामद्वारीं ह्या काव्यांत झाली. तरुणपणाच्या स्वाभाविक भावनांचे उद्रेक आरंभींच्या काव्यांत यावेत हें साहजिकच आहे. प्रेमाचा अनुनय, अनुनयाचा प्रतिकार किंवा झिटकार, त्यापासून उत्पन्न झालेला मनाचा उद्वेग आणि उद्वेगाचें निराशेंत होणारें रूपांतर इत्यादि प्रकार ह्या काव्यांत सांपडले तर त्यांत नवल नाहीं. बडोद्यास असतांना त्यांच्या पहिल्या भावनापूर्ण आयुष्यांत त्यांच्यावर चंद्रशेखर, तांबे, दत्त कवि ह्यांच्या काव्याचा विशेष परिणाम झाला. विश्वामित्रीचा कांठ व परिसर हा मराठी काव्यक्षेत्रांत खरोखरच महत्त्वाचा दिसतो. ह्या परिसरानें दत्तांना स्फूर्ति दिली, त्यानें चंद्रशेखरांना स्फूर्ति दिली, त्यानेंच माधवरावांना स्फूर्ति दिली. माधवरावांची कविपरंपरा कोणती होती हें सांगणें कठिण आहे. परंपरेचें नातेंच जर जुळवायचें झालें, तर तें चंद्रशेखरांच्याशींच अधिक जुळेल. चंद्रशेखरांच्या सान्निध्याचा परिणाम त्यांच्या संस्कारक्षम अशा प्रतिभेवर झाला असला पाहिजे. तांबे, दत्त, कांहीं फारसी काव्य, ह्यांचेहि परिणाम आढळून येतात. "कुंभ इराणी घाटाचे मीं घडिले" असें माधवराव स्वतःच सांगतात. इष्काचा उन्माद व त्याच्या परिपूर्तीच्या अभावीं झालेला उद्वेग हे प्रकार फारसी वाङ्मयाचे परिणाम होत. स्फूर्ति कोणापासूनहि मिळाली असो किंवा तिच्यावर परिणाम कोणाच्याहि काव्याचे झालेले असोत. प्रतिभेची जोपासना व वाढ जी त्यांनीं केली ती मात्र स्वतंत्र आहे. ह्यांत त्यांनीं कोणाचेंहि ऋण घेतलें नाहीं. त्याच प्रतिभेच्या सामर्थ्यावर त्यांनीं मराठी काव्याच्या क्षेत्रांत यशही पुष्कळ मिळविलें. केशवसुतांनीं आपलें युग निर्माण केलें. त्यानंतर गोविंदाग्रजांनीं आपलें युग निर्माण केलें. ह्या दोघांनंतर त्यांच्यासारखेंच माधवरावांनीं आपलें युग निर्माण केलें. आपल्या लेखनसरणीचा व विचारसरणीचा ज्यांनीं आपल्या कालांतील काव्यावर ठसा उठ-

वेला, तेच युगप्रवर्तक कवि होत. ह्या दृष्टीनेंच "माधवराव हे एक युगप्रवर्तक कवि आहेत" असे उद्गार एका प्रसिद्ध साहित्यिकानें काढले. सध्यांच्या काव्ययुगाला 'माधव तूल्यिन युग' असें म्हणतां येईल. आपल्या लेखनसरणीचा आणि विचारसरणीचा ठसा उठविणें ही एक प्रकारची क्रांति आहे. शब्दांची घटना, उच्चार, अर्थ, योजना, वाक्प्रयोग, त्यांची बांधणी इत्यादि बाबतींत अलीकडील दहा-बारा वर्षांत बराच बदल झाला आहे; इतकेंच नव्हे, तर ह्यापेक्षांही महत्त्वाच्या वैचारिक क्षेत्रांत, विचार-निर्मितींत व विचारांच्या प्रकटीकरणाच्या पद्धतींत बराच बदल झाला आहे, व ह्याचें सारेंच श्रेय माधवरावांच्या प्रयत्नांना आहे.

ही क्रांति माधवरावांच्या बहुतेक कवितेंत दिसते. त्यांत त्यांचें स्वतःचें व्यक्तिमत्त्व दिसतें. ह्या दृष्टीनें त्यांचीं प्रसंगोपात्त लिहिलेलीं भावगीतें किंवा वैनकें उल्लेखनीय आहेत. सुधारक, नकुलालंकार वगैरे खंडकाव्यांत आणखी एका निराळ्या तत्त्वाचा आविष्कार झालेला आढळतो. हें तत्त्व म्हणजे 'कालतत्त्व' होय. स्वप्नरंजन, तुटलेले दुवे, गज्जलांजलि इत्यादि संग्रहांत गोवलेल्या त्रुटित काव्यांत आणखी एका तिसऱ्या तत्त्वाचा आविष्कार केला आहे. हें तत्त्व पहिल्या दोन्ही तत्त्वांपेक्षां निराळें आहे. हें चिरंतन तत्त्व होय. ह्या तीन तत्त्वांचा आविष्कार हाच त्यांच्या काव्याचा विशेष आहे. आपण कोणत्या विशिष्ट तत्त्वासाठीं जगत आहों, आपण कोणत्या जगांत जगत आहों व ज्या कालांत जगत आहों त्या कालाचें विशिष्ट तत्त्व कोणतें आहे हें दाखविणें, आणि जर तत्त्व नसलें तर तें दाखविणें हें कार्य प्रतिभावान् कवि करतो, व ही कामगिरी माधवरावांनीं आपल्या काव्यानें मर्यादित स्वरूपांत कां होईना, पण केली आहे हें खास. भावनोत्कट काव्याच्या पहिल्या अमदानींत त्यांनीं तरुणांना वेडें केलें इतकेंच नाहीं, तर विचारवंत प्रौढांनाही आपल्या काव्याकडे ओढलें. भावनोत्कट काव्य हें भावनामय जीवित असल्याशिवाय निर्माण केलें जात नाहीं. माधवरावांचें आयुष्य असें भावनामय होतें म्हणूनच त्यांना तें शक्य झालें. बालपणीं शिक्षणासाठीं धडपड, तरुणपणीं प्रेमासाठीं धडपड, प्रौढपणीं नोकरीसाटीं धडपड, व पुढच्या कालांत उच्च विद्येसाठीं धडपड, अशी त्यांच्या सर्व आयुष्यांत धडपड होती. सर्वांशीं झुंज करूनच आपलें स्वत्व प्रस्थापित करण्याची ईर्षा त्यांना बाळगावी लागली. म्हणून त्यांच्या काव्यांत जें भावनांचें प्रकटीकरण आहे तें स्वानुभूत भावनांचें आहे. ह्यामुळेंच त्यांच्या काव्यांत जिवंतपणा आढळून येतो. ही झाली त्यांच्या भावगीतांची गोष्ट.

'सुधारक' हें एक चटकदार खंडकाव्य आहे. खरेंखुरें कथानक, खरींखुरीं पात्रें, परंतु त्यांच्याभोंवतीं काव्यमय, अद्‌भुतरम्य असें वलय उत्पन्न केल्यामुळें तें फार हृदयंगम उतरलें आहे. वृत्ताची योजनाही प्रसंगाला साजेशी आहे. घोडेस्वार ज्याप्रमाणें टपटप असा टापांचा आवाज करीत भरधाव जातो, तशासारखी गत वाचकांची तें काव्य वाचतांना होते. जीवनावर टीका सर्वच कवि करतात. केशव-सुतांनीं तुतारी लिहून केली. गोविंदाग्रजांनीं स्मशानगीत लिहून केली. माधव-रावांनीं तीच टीका सुधारक काव्य लिहून केली. टीकेंत उपरोध मोठ्या चातुर्यानें मिसळून सोडला आहे. त्यांतील संवाद, संभाषणें गतिमान् असल्यामुळें कथानक वेगानें भराभर पुढें सरकतें व वाचकही त्यांत रंगून जातो. रावबहादूर के. व्ही. ठोसर, सुशीलादेवी, मेजर गोखले, श्यामा वेंगुर्लेकर, डॉ. ओंकार इत्यादि पात्रें चालतींबोलतीं, आपणाभोवतीं वावरणारीं वाटतात. कोणी आपलें व्यक्तिमाहात्म्य सांगतो तर कोणी विवाहसुधारणा सुचवितो. प्रेम व विवाह ह्या प्रश्नांच्या निरनिराळ्या बाजू विशद केल्या आहेत. ह्या काव्यानें आपण महाराष्ट्रधर्माची प्राणप्रतिष्ठा, रूढि आणि संस्था ह्या दोहोंत क्रांति करीत आहों असें माधवराव स्वतःच सांगतात.

असेंच दुसरें उपरोधिक काव्य अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेलें 'नकुला-लंकार' हें होय. ह्यामध्यें त्यांनीं पुष्कळांची हजेरी घेतली आहे. ह्यांतील नकुलशास्त्री, डॉ. पंडितराव, शेषोपंत चिवटे, माधवराव सुकाळे, राधाबाई, संजीवनी, लक्ष्मी इत्यादि पात्रें काल्पनिकत्वाच्या अवगुंठनांत कितीही गुरफटून ठेविलीं असलीं, तरी अवगुंठन थोडेंसें बाजूला सरल्याबरोबर त्यांची ओळख तेव्हांच पटते. गज्जलांजलि, स्वप्नरंजन, तुटलेले दुवे वगैरे संग्रहांत त्रुटित काव्य आहे. त्यांत भावनांच्या सूक्ष्म छटा पुष्कळच आहेत. "रानकिशोरी, तेथें चलराणी, भ्रांत तुम्हा कां पडे, प्रेम क हेम, वनबाला" व इतर स्वाभिमान उत्पन्न करणारीं कवनें त्यांत पुष्कळच आहेत

'बिरहतरंग' हें अव्वल दर्जाचें आत्मनिष्ठ काव्य आहे. ह्या तरंगांवर कांहीं रसिक तर विशेष खुष आहेत. उदात्त कल्पनांचा बराच उत्कर्ष झाला आहे. कालिदासाच्या मेघदूताच्या तोडीला ह्या तरंगांना कांहीं रसिक बसवितात. जगन्नाथ पंडितानें ज्य आपल्या प्रतिभासामर्थ्यानें गंगेच्या पाण्यांत लहरी उत्पन्न करून त्यांना आपल्य पायांपर्यंत चढवून आपणास पुनीत केलें, तशा प्रकारचें प्रतिभासामर्थ्य ह्या तरंगांत असल्याची ग्वाही कांहीं रसिक टीकाकार देतात.

उमरखय्यामच्या रुबायानें त्यांना वेड लावलें होतें. त्याच्या भरांतच त्यांनी

त्याचीं दोन भाषांतरें केलीं; एक मुळावरून, दुसरें फिट्झेराल्डच्या इंग्रजी भाषांतरावरून; ईर्षा ही होती कीं फिट्झेराल्डच्या भाषांतरापेक्षां आपलें भाषांतर सरस व अधिक मुळाबरहुकूम व्हावें.

ही माधवरावांची काव्यक्षेत्रांतील कामगिरी झाली. परंतु ह्याहिपेक्षां अधिक महत्त्वाची त्यांची कामगिरी संशोधनक्षेत्रांतील आहे. ह्या क्षेत्रांत काम करण्याची हौस त्यांना कशी उत्पन्न झाली हें सांगणें कठिण आहे. व्यवसायानिमित्त झालेल्या पुण्याच्या वास्तव्यानें कदाचित् ही स्फूर्ति त्यांना झाली असावी. राजवाडे, केतकर, इत्यादि संशोधकांचा उद्योग त्यांच्यासमोर चाललेला त्यांना दिसला असेल. परंतु संशोधनशास्त्राचे प्रत्यक्ष असे धडे कोणापासून न घेतां त्यांनीं आपण होऊनच हें शास्त्र आत्मसात् केलें. संशोधनक्षेत्रांत तीन गोष्टी महत्त्वाच्या आहेत. एक साधनें गोळा करणें ही; दुसरी गोष्ट त्या साधनांच्या आधारावर तर्कशुद्ध अशीं अनुमानें बांधणें ही; आणि तिसरी गोष्ट साधनें मिळेनाशीं झाल्यानंतर केवळ आपल्या कल्पनाशक्तीच्या जोरावर सिद्धप्राय सिद्धांत मांडून दाखविणें ही; अशा ह्या तीन गोष्टी मुख्य आहेत. साधनें गोळा करणें हें मोठ्या प्रयासाचें, चिकाटीचें काम आहे; ह्याला अखंड व विस्तृत वाचन, चौफेर आणि चौरस अशी दृष्टि असावी लागते. बौद्धिक सचोटी असावी लागते. 'छंदोरचना' व 'फार्शी-मराठी कोश' ह्या ग्रंथांकडे पाहिलें म्हणजे साधनें गोळा करण्यासाठीं त्यांनीं केलेल्या श्रमांची कल्पना येते. साधनांवरून योग्य तीं अनुमानें काढतां येण्यासाठीं त्या सर्व साधनांचें योग्य वर्गीकरण करावें लागतें; तसें जर तें झालें नाहीं, तर तीं अनुमानांना बाधा करतात. फार्शी-मराठी कोशांत दिलेलीं अवतरणें शोधून काढतांना त्यांना सर्व उपलब्ध ऐतिहासिक पत्रसंभार वाचावा लागला असेल. ह्या अवतरणांमुळेंच तो कोश जरी क्वचित् अपुरा वाटत असला, तरी मनोरंजक वाटतो. छंदोरचनेंत तर साधनें गोळा करण्याची परमावधि केली आहे. साधनें इतकीं गोळा झालीं कीं त्यांचें वर्गीकरण करणें त्यांच्या आवाक्याबाहेरचें झाल्याचें क्वचित् ठिकाणीं दिसतें व म्हणूनच कीं काय, पारंपरिक वर्गीकरण सोडून त्यासंबंधीं आपलें स्वतःचें 'तंत्र' त्यांना निर्माण करावें लागलें. हळुहळू त्याला विद्वन्मान्यता मिळेल अशी खात्री आहे.

माधवरावांच्या संशोधनाचीं क्षेत्रें दोन : एक शब्द आणि दुसरें वृत्त किंवा छंद. हीं वाङ्मयाचीं दोन प्रधान अंगें होत. माधवरावांनीं ज्याप्रमाणें स्वतंत्र वाङ्मय निर्माण केलें, त्याप्रमाणें त्यांनीं वाङ्मयाच्या अभ्यासाचीं हीं साधनेंही निर्माण

केलीं. वैदिक वाङ्मय हें जसें एक स्वतंत्र वाङ्मय आहे व त्याच्या अभ्यासासाठीं जशीं पूर्वीच्या ऋषींनीं वेदांगें रचिलीं तशीं माधवरावांनींहि मराठी वाङ्मयरूपी वेदांचीं वेदांगें रचिलीं व अशा दृष्टीनें माधवरावांना मराठींतील एक 'वेदांगकार' असें म्हणावयास हरकत नाहीं. वाङ्मयाच्या ह्या बाह्य स्वरूपाच्या विवेचनानंतर त्याच्या आंतर स्वरूपाचें विवेचन करण्याचा त्यांचा विचार होता. रसचर्चा व रसास्वादाची उपपत्ति करण्याचा त्यांचा इरादा होता व त्या दृष्टीनें लेख लिहिण्यास त्यांनीं सुरुवात केली होती.

प्रो. माधवराव पटवर्धन महाराष्ट्रांत प्रथमतः 'कवि' म्हणून उदयास आले आणि 'कवि' म्हणूनच लौकिकास चढले. **'माधव जूलियन'** हें नांव जितकें तरुण विद्यार्थी-विद्यार्थिनी किंवा ललितवाङ्मय-वाचक यांच्या निकट परिचयाचें आहे तितकें **'प्रो. माधवराव पटवर्धन'** हें नाहीं. काव्यविषयक भावनांचा जिव्हाळा हा परस्परांना वाटत होता. 'माधव जूलियन्' काव्य लिहीत तेव्हां आपण कांहीं तरी सनातन तारुण्याच्या भावनांचें प्रकटीकरण करीत आहोंत असें त्यांना स्वतःला वाटत असे, आणि 'माधव जूलियन्'चें एखादें काव्य तरुण वाचक वाचीत तेव्हां त्यांनाहि स्वकीय भावनांचें प्रकटीकरण वाचीत आहोंत अशी आत्मप्रतीति होई—इतकें त्यांचें भावनैक्य किंवा वृत्त्यैक्य झालें होतें. काव्यप्रांतांत निरनिराळे प्रकार रूढ करून त्यांत त्यांनीं चांगलें यश मिळविलें, आणि गद्यलेखनास त्यांनीं जो हात घातला तो या पद्यलेखनाच्या अनुषंगानें. कधीं एखाद्या कवितेस सूचक टीप किंवा एखाद्या कवितेचें रहस्योद्ग्रहण, कधीं एखाद्या कवीच्या काव्याचें परीक्षण किंवा एखाद्या काव्यसंग्रहास प्रस्तावना, तर कोठें काव्याचें शरीर जो छंद किंवा त्याचा आत्मा जो रस यासंबंधींची चर्चा, अशा निरनिराळ्या काव्यविषयांच्या अनुरोधानें त्यांनीं गद्यलेखन केलें आहे. हा त्यांच्या गद्यलेखनाचा एक प्रकार. विषयाच्या दृष्टीनें पाहिलें तर हा प्रकार किंचित् पराश्रयी आहे असें म्हणावें लागेल. विषयाची स्वतंत्रता त्यामध्यें तितकीशी दिसून येत नाहीं. काव्याची बांधणी व कल्पना या गोष्टीच त्यांना मुख्यत्वें अभिप्रेत असल्यामुळें त्यांस उपकारक असेच विषय घेऊन त्यांना आपलें मतप्रतिपादन करावें लागलें. त्यांच्या गद्यलेखनाचा दुसरा प्रकार म्हणजे शब्दशास्त्रासंबंधींचा. शब्दशास्त्राकडे त्यांचें लक्ष त्यांच्या व्यवसायामुळें लागलें. फार्शी भाषेचें अध्ययन-अध्यापन करीत असतांना मराठी व फार्शी शब्दांची येरझार त्यांच्या विशेष ध्यानांत आली, आणि तिच्याकडे त्यांचें लक्ष वेधून

'फार्शी-मराठी कोशा' चें कार्य निष्पन्न झालें. हें कार्य करीत असतांनाच दुसऱ्या एका कार्याचा पाया घातला गेला. तें म्हणजे भाषाशुद्धीसंबंधींच्या लेखनाचें होय. या गोष्टीला पुढें प्रचाराचें स्वरूप प्राप्त झालें, आणि त्यासाठीं त्यांनीं आलेली कोणतीहि संधि वायां म्हणून जाऊं दिली नाहीं.

गद्यलेखन हें रचनेच्या दृष्टीनें पद्यलेखनापेक्षां निराळें असतें हें उघड आहे; परंतु त्याची प्रेरणासुद्धां निराळी आहे. पद्याच्या मुळाशीं भावनोत्कटता असते, तर गद्याच्या मुळाशीं विचारोत्कटता असते. एकाचा उगम हृदयापासून होतो, तर दुसऱ्याचा उगम बुद्धीपासून होतो. एक वाचकाच्या अंतःकरणाला स्पर्श करून त्याच्या भावना जागृत करतें, तर दुसरें बुद्धीला स्पर्श करून विचाराला चालना देतें. एक हार्दिक प्रयत्न आहे, तर दुसरा बौद्धिक प्रयत्न आहे. अशा रीतीनें गद्य-पद्यलेखनाच्या प्रेरक शक्ति भिन्न आहेत; इतकेंच नाहीं, तर त्यामुळें त्यांच्या आविष्कारांतहि साहजिकच भेद आहे. गद्यांत प्रामुख्यानें विश्लेषणक्रिया करावी लागते, तर पद्यांत संश्लेषणक्रिया प्रामुख्यानें करावी लागते. तर्काची कसोटी लावून विषयाच्या निरनिराळ्या स्वरूपांचें कर्कश विच्छेदन करण्याची आवश्यकता गद्यांत विशेष असते; तर याच्या उलट, रसग्रहणाची कसोटी लावून मोठ्या हळुवार हातानें विषयाचीं विखुरलेलीं स्वरूपें एकत्रित करून त्यांचें रम्य असें संकलन करण्याची आवश्यकता पद्यांत विशेष असते. गद्यलेखन बुद्धि विकसित करून चौकसपणा व चोखंदळपणा उत्पन्न करितें, तर पद्यलेखन हृदयाला हाक देऊन उच्च भावना जागृत करितें. गद्य व पद्य यांच्या स्वरूपांत असा भेद असल्यामुळें साहजिकच कवि म्हणून जो यशस्वी ठरला तो गद्यलेखक म्हणूनहि यशस्वी ठरेलच असें नाहीं. दोन्ही प्रांतांत सारखेंच यश मिळविल्याचीं उदाहरणें वाङ्मयेतिहासांत विरळच आहेत.

माधवरावांच्या गद्यलेखनालाहि वरील विवेचन लागू आहे. त्यांच्यामध्यें दोन प्रकारच्या प्रतिभांचें द्वंद्व पाहावयास मिळतें. एक कवीची प्रतिभा व दुसरी संशोधकाची प्रतिभा. कवीलाच तेवढी प्रतिभा असते आणि संशोधकाला नसते, हा जो सर्वसामान्य समज आहे तो चुकीचा आहे. प्रतिभेवांचून संशोधकाच्या दृष्टीला पल्लेदारपणा येणार नाहीं आणि त्याला अगम्य क्षेत्रांतील संशोधनहि करतां येणार नाहीं. कवीच्या प्रतिभेला ज्याप्रमाणें काव्यविषयाच्या निरीक्षण-विकलन-संकलन या क्रिया कराव्या लागतात, त्याचप्रमाणें संशोधकाच्या प्रतिभेलाहि संशोध्य

विषयाचें निरीक्षण–विकलन–संकलन या क्रिया कराव्या लागतात. अर्थात् कवि हा चांगला संशोधक होऊं शकत नाहीं अथवा संशोधकाच्या हातून चांगली काव्य-निर्मिति होऊं शकत नाहीं हा समज तितकासा यथार्थ नाहीं. या दोन प्रतिभांचें द्वंद्व माधवरावांमध्यें दिसून येतें. अलीकडच्या काळांत त्यांच्या हातून सुरस काव्य निर्माण झालें नाहीं याचेंहि कारण हेंच कीं, त्यांचें लक्ष संशोधनाकडे विशेष लागलें. त्यांच्या संशोधनलेखनाला वाङ्मयीन 'लालित्य' लाभलें नाहीं, आणि तें कां लाभलें नाहीं याचें कारण वर सांगितलेंच आहे. या कारणाशिवाय दुसऱ्याहि एका कारणाचा निर्देश करणें अवश्य आहे.

सुमारें गेल्या दहा वर्षांमध्यें झालेल्या माधवरावांच्या लिखाणांत एक वैगुण्य प्रामुख्यानें दृष्टीस पडतें. तें त्यांच्या संशोधनपर लेखांतच आढळतें असें नाहीं, तर इतरहि प्रसंगोपात्त केलेल्या लिखाणांत आढळतें. पूर्वींच्या त्यांच्या गद्य-लेखनांत एक तऱ्हेची सफाई होती. एक तऱ्हेचा स्वाभाविकपणा होता. शब्द किंवा प्रयोग साहजिकपणें सुचित आणि लेखनांत उतरत. मेंदूला त्यासाठीं शीण द्यावा लागत नसे. परंतु फार्सी भाषेच्या अध्ययनानें म्हणा किंवा भाषा, वाङ्मय व संस्कृति या क्षेत्रांत झालेल्या आणि होणाऱ्या महमदी आक्रमणामुळें म्हणा, आपल्या 'मायबोली'च्या अभिमानामुळें म्हणा किंवा स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा या त्रयीसंबंधीं चाललेल्या चळवळीच्या भावनावशतेमुळें म्हणा, कोणत्या तरी कारणानें त्यांच्या गद्यलेखनांतील स्वाभाविकता जाऊन त्याऐवजीं कांहींशी कृत्रिमता आली. पूर्वींची सहजसुंदर लेखनसरणी नाहींशी झाली वा ती विसरण्याचा त्यांनीं बुध्द्या प्रयत्न केला असें म्हटल्यासहि वावगें होणार नाहीं. भाषाशुद्धीच्या आग्रहामुळें सहज, विनायास सुचणारे अर्थवाही शब्द परकीय म्हणून बाजूस सारून त्याऐवजीं दुसरे स्वकीय शब्द शोधून वा बनवून रूढ करावे लागले. या स्वकीय, परंतु नव्या व अपरिचित शब्दांच्या वापरामुळें माधवरावांच्या लेखनसरणींत कृत्रिमपणा व बोजडपणा आला. पूर्वींची त्यांची अस्खलित, प्रवाही भाषासरणी भाषाशुद्धीच्या प्रचारामुळें अडखळूं लागली आणि वाचकांनाहि अडखळवूं लागली !

माधवरावांच्या गद्यलेखनसरणीच्या स्वरूपाचाच केवळ विचार करावयाचा म्हटलें तर त्यांचें भाषाशुद्धीच्या चळवळीपूर्वींचें गद्यलेखन व त्यानंतरचें गद्यलेखन असे दोन प्रकार आपणांस करावे लागतील. 'फार्शी-मराठी-कोश' प्रस्तावना, 'वृत्त-मनोरमा', 'छन्दोरचना' (आवृत्ति १), 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवकां'तील

'केशवसुता'दि कवि-चरित्रें व 'विविधज्ञानविस्तार', 'प्रतिभा', 'प्रगति', इत्यादि नियतकाल्किांतील वाङ्मयचर्चात्मक लेखन हें प्रायः पहिल्या प्रकारांत मोडेल, तर 'लोकशिक्षण', 'महाराष्ट्र-साहित्यपत्रिका', 'सह्याद्रि' इत्यादि नियतकालिकांतील मराठी भाषेची लिपि, शुद्धलेखन, भाषाशुद्धि, छंद, रसचर्चा इत्यादि लेखन व 'छन्दोरचना' (आवृत्ति २), 'पद्यप्रकाश' ही ग्रंथरचना दुसऱ्या प्रकारांत पडेल. या उभय प्रकारांतील लेखनसरणीचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां पूर्वोक्त विधानांचा पडताळा तेव्हांच येईल. पहिल्या प्रकारांतील लेखनांत अंशतः आढळून येणारे प्रसादमाधुर्यादि गुण दुसऱ्या प्रकारांत तितकेसे आढळून येत नाहींत. पहिल्यांतील सौष्ठव व चापल्य दुसऱ्यांत नाहीं आणि तें कसें असणार ? जेथें सहज ओठावर येणारा अर्थवाही शब्द वा प्रयोग बाजूस सारून दुसरा स्वकीय नवा शब्द वा प्रयोग रूढ करण्याचा प्रयत्न चालवावयाचा तेथें कांहींशी कृत्रिमता व जडता येणारच. तथापि दुसऱ्या प्रकारच्या लिखाणांत भासणारी ही उणीव त्यांनीं इतर गुणांनीं भरून काढिली आहे. शब्दसौष्ठव व चापल्य कमी असलें तरी त्यांत विचाराचा रेखीवपणा व ओज आहे. हे गुण त्यांच्या दृढ व्यासंगामुळें व सामाजिक जिव्हाळ्यामुळें निर्माण झाले, आणि म्हणूनच विचारवंतांचीं मनें ते आपल्या लेखनाकडे आकर्षून घेऊं शकले.

येथवर स्फूर्ति व लेखनसरणी या दृष्टीनें माधवरावांच्या गद्यलेखनाचा सामान्यतः विचार केला. आतां त्यांच्या गद्यलेखनप्रपंचाचें विचारसरणीच्या दृष्टीनें अल्प निरीक्षण करूं. माधवरावांनीं मुख्यत्वें काव्य, टीका, भाषांतर, भाषाशुद्धि, लिपिशुद्धि, छन्दोविचार, रसचर्चा इत्यादि विषयांवर गद्यलेखन केलें आहे. स्थूलदृष्टीनें या विषयांचे तीनच वर्ग पडतात. (१) काव्यविचार, (२) छन्दोविचार–रसविचार, व (३) भाषाशुद्धिविचार. यांपैकीं त्यांचा काव्यविचार, त्यांनीं स्वतःच्या काव्यांना ज्या प्रस्तावना लिहिल्या त्यांत व प्रसंगोपात्त जीं परीक्षणें-समीक्षणें केलीं त्यांत व्यक्त झाला आहे. काव्यसमीक्षक म्हणून माधवरावांचीं मतें काय होतीं याचें विवेचन त्यांनीं स्वतः 'सुधारक' काव्याला जी प्रस्तावना जोडली आहे तींत केलें आहे; किंवा तींच मतें त्यांनीं 'अर्वाचीन साहित्यसेवकां'त लिहिलेल्या 'केशवसुता'वरील प्रबंधांत, 'काव्यचर्चा' या पुस्तकामध्यें लिहिलेल्या 'चन्द्रशेखरांची कविता' या निबंधांत, 'लोकशिक्षणां'तील 'कविवर्य ताम्बे', 'राजकवि चन्द्रशेखर', 'काव्यविहारीं'च्या 'स्फूर्तिलहरी' या व 'प्रगतीं'तील काव्य-

समीक्षणात्मक लेखांत आपणांस पाहावयास सांपडतात. 'सुधारका'च्या प्रस्तावनेंत टीकाकाराविषयीं त्यांनीं सहानुभूतीचे उद्‌गार काढिले आहेत याचें कारण, 'सुधारक' काव्य हीच एक 'संसृतिटीका' आहे. ग्रंथपरीक्षणशास्त्र या दृष्टीनें तींत ओझरताच उल्लेख आहे. पण लेखक व टीकाकार यांचा परस्परसंबंध विरोधी-भक्तीचा असतो; टीकाकार हा लेखकाचे दोष काढतो तर उलट लेखकहि टीका-काराचे दोष काढतो; टीकाकार हा निःपक्षपाती, सत्यान्वेषी, सहानुभवी असला पाहिजे; 'सोपाधिक सावधगिरीचीं विधानें' केल्यानें योग्य टीका होत नाहीं; टीकेंत हेत्वाभास व विपर्यास हे दोष असतां कामा नयेत; टीका ही रसोद्‌ग्राही व मूलग्रंथाविषयीं कुतूहल उत्पन्न करणारी असावी इत्यादि सिद्धान्त सांगून त्यांनीं टीकाकारांची भूमिका स्पष्ट केली आहे; आणि शेवटीं टीकेचे व टीकाकारांचे त्यांनीं दोन वर्ग केले आहेत: (१) तौलनिक टीका व (२) एकाच ग्रंथाची सांगोपांग टीका, हे टीकेचे दोन प्रकार; आणि (१) 'स्थितिनिष्ठ नवविद्वेषी' व (२) 'गति-निष्ठ नवाभिनिवेशी' हे टीकाकारांचे दोन प्रकार त्यांनीं सांगितले आहेत (सुधा० प्रस्तावना, पृ. ७). या सर्व विवेचनांत टीकाकाराची तात्त्विक भूमिका मांडिली असून हीच भूमिका माधवरावांनीं स्वतः केलेल्या काव्यपरीक्षणांत कितपत उतरली आहे अथवा त्यांच्या परीक्षणांवरून कांहीं निराळेच सिद्धान्त निघतात तें पाहूं.

माधवरावांनीं केलेलीं काव्यपरीक्षणें पाहिलीं तर त्यांमध्यें निःपक्षपातीपणा, सत्यान्वेषण व सहानुभूति हे महत्त्वाचे गुण आढळतात. टीका करतांना त्यांना कवीविषयीं व त्याच्या काव्याविषयीं आपुलकी व जवळीक वाटली तरी त्यांनीं निःपक्षपातीपणा सोडला नाहीं, हें 'चंद्रशेखर', 'केशवसुत', तांबे, 'काव्यविहारी' प्रभृति कवींच्या काव्यपरीक्षणांवरून दिसून येईल. टीका करतांना काव्य तेवढेंच त्यांच्या मनश्चक्षूपुढें उभें असे, आणि त्याचेंच ते परीक्षण करीत. शिवाय ते स्वतःच कवि असल्यामुळें सहानुभूतीचा प्रश्नच त्यांच्यासंबंधीं कधीं उद्‌भवत नसे. हेंहि बरें, तेंहि बरें, अशा तऱ्हेची द्वामुष्यायण-वृत्ति त्यांच्या परीक्षणांत नसे. कवीच्या मूळ उद्देशाचा बुध्द्या विपर्यास करणें हें तर त्यांच्या स्वभावांतच नव्हतें. या गुणांमुळें त्यांचीं परीक्षणें इतर रसिकांना आवडत इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष परीक्षणविषयक कवींनाहि तीं पटत असत. परंतु त्यांची रसास्वादाची पद्धति मात्र थोडीशी निराळी होती. काव्याकडे पाहण्याची त्यांची दृष्टि अत्यंत चिकित्सक स्वरू-होती, किंबहुना ती विच्छेदक स्वरूपाची होती. काव्य ही एक दैवी कला

आहे, तो सौंदर्याचा परिपाक आहे आणि तो सामग्र्यानेंच आस्वादिला पाहिजे, परीक्षिला पाहिजे. या रसास्वादांत प्रत्यग्रता उपयोगी नाहीं, सामग्र्यता–साकल्यता पाहिजे, हें तत्त्व माधवरावांना संमत नव्हतें, असें त्यांच्या परीक्षणांवरून दिसतें. परीक्ष्य काव्य ते विच्छेदीत असत, पिंजत असत, व असें पिंजतां पिंजतां जो रसास्वाद मिळेल तो ते चाखीत असत. त्यांचें म्हणणेंच असें कीं, "चांगला कापूस थोडा अधिक पिंजला तर त्याचे धागे निघत नाहींत असें थोडेंच आहे ! जों जो न्याहाळून पाहावें तों तों नवनवें सौंदर्य, नवनवें रहस्य गोचर होऊं लागतें." ( लो. शि. वर्ष ७, पृ. १४०). माधवरावांच्या परीक्षणांत जो 'प्रत्यग्रविच्छेदनवाद' आला त्याचें कारण आमच्या मतानें त्यांची संशोधनप्रवण बुद्धि हें असूं शकेल. परीक्षणकारांचे जे त्यांनीं दोन वर्ग 'स्थितिनिष्ठ नवविद्वेषी' व 'गतिनिष्ठ नवाभिनिवेशी' असे केले त्या दोहोंतहि ते स्वतः मोडत नाहींत. परंतु त्यांत थोडासा भेद करून 'स्थितिनिष्ठ नवाभिनिवेशी' असा एक प्रकार केला तर त्यांत ते बरोबर पडतील. त्यांच्या परीक्षणांत नवाभिनिवेश आहे आणि नवनवोन्मेष आहे. त्यांत दुसरी एक गोष्ट दिसून येते ती म्हणजे त्यांचा 'संस्करणवाद'. एकदां लिहिलें म्हणजे लिहिलें, तें अगदीं वज्रलेप, त्यांत फरक व्हावयाचा नाहीं, हें मत त्यांना मान्य नसे. काव्यावर सारखा हात फिरला पाहिजे असा त्यांचा आग्रह असे, आणि त्याप्रमाणें ते आपल्या काव्याचें सदा संस्करण करीत आणि इतर कवींनींहि तसें करावें असें अपेक्षीत. त्यांनीं केलेल्या परीक्षणांत संस्करणाची आवश्यकता—शब्दांचेंच संस्करण नव्हे, तर कधीं कधीं भावनांचेंहि संस्करण—ते प्रतिपादीत. प्रतिभेची पहिली ऊर्मि ही नदीच्या पुराच्या ऊर्मींसारखी असून तींत बराच कर्दम असतो, तो निवळूं दिला पाहिजे, असें त्यांस वाटे.

माधवरावांचें भाषांतरपद्धतीसंबंधीं मतहि त्यांच्या लेखांत स्पष्टपणें दिग्दर्शित झालें आहे. उमर खय्यामच्या रुबायांच्या भाषांतरामुळें या विषयाकडे त्यांचें लक्ष वेधलें. फिट्झजेराल्डच्या इंग्रजी भाषांतरानें जो लौकिक पाश्चात्य रसिकवर्गांत मिळविला तो मराठींत मिळविण्याच्या इच्छेनें किंवा उमर खय्यामच्या प्रेमानें त्यांनीं रुबायांचीं दोन भाषांतरें केलीं—एक मुळावरून व दुसरें फिट्झजेराल्डच्या भाषांतरावरून. भाषांतर मूलबद्ध असावें कीं स्वतंत्र असावें यासंबंधीं चर्चा करून मूलबद्धतेच्या बाजूनें त्यांनीं निर्णय दिला आहे, आणि आपल्या स्वतःच्या काव्यकृति तदनुसार निर्माण केल्या आहेत.

माधवरावांचें शब्दशास्त्रावरील लिखाण मुख्यतः त्यांच्या ‘फार्सी-मराठी कोशा’च्या प्रस्तावनेंत आलें आहे आणि तें वर्णप्रक्रियेच्या शास्त्राला धरून आहे. फार्सी व मराठी दोन्ही भाषा चांगल्या अवगत असल्यामुळें त्यांना हें शक्य झालें. उदाहरणांच्या विवेचनाबरोबर वर्णप्रक्रियेचे उत्सर्ग बांधण्याचा प्रयत्न जर त्यांत झाला असता तर त्याला पूर्णत्व आलें असतें. मराठी ऐतिहासिक कागदपत्रांत जेवढे फार्सी शब्द वापरांत आले तेवढेच त्यांनीं विचारांत घेतले आहेत. जे इतर फार्सी शब्द मराठींत आत्मसात् झाले आहेत ते विवेचनांतून सुटल्यामुळें त्यांत किंचित् उणेपणा राहून गेला आहे. त्यांचीं ‘ज्ञानप्रकाशांत’ प्रसिद्ध झालेलीं शब्द-टिपणें मूलगामी असलीं तरी तीं फार्सी भाषेच्या अध्ययनाचीं अधिक निदर्शक आहेत. त्यांची ‘छन्दोरचना’ हा स्वतंत्र विवेचनाचा विषय आहे. तसेंच त्यांचें भाषाशुद्धिविषयक लेखन ‘भाषा-शुद्धिविवेक’ या ग्रंथांत संगृहीत झालें असून त्याचाहि परामर्श स्वतंत्र रीतीनें घेतला जात आहे. जळगांव साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत माधवरावांनीं तोच विषय प्रतिपादिला आहे. तात्पर्य, माधवरावांच्या गद्यलेखनाची स्फूर्ति, लेखन-सरणी व मुख्य विषय यांचें सामान्य दिग्दर्शन वर केलें आहे. पद्यलेखक म्हणून त्यांचा थोर लौकिक आहेच; परंतु गद्यलेखक म्हणूनहि तो कांहीं कमी नाहीं. शास्त्रविवेचक म्हणून त्यांचा लौकिक विद्वज्जन मान्य केल्याशिवाय राहणार नाहींत.

अशा विविध स्वरूपांचें माधवरावांचें वाङ्मयीन कार्य आहे. त्यांत प्रतिभेचे नवनवे उन्मेष आहेत. त्यांत भावनांचे उद्रेक आहेत. त्यांत त्यांच्या बरोबरीनें श्रमसातत्याचे घर्मबिंदूही आहेत. माधवराव गेले; त्यांच्या जाण्यानें एक प्रेमळ स्नेही गेला, एक उमदा विरोधक गेला, एक निष्ठावंत अभ्यासक, एक प्रतिभावान् कवि, एक आदर्श विद्वान, एक आक्रमणशील प्रचारक, एक फार्सी भाषेचा जाणकार, एक उच्च दर्जाचा संशोधक नाहींसा झाला. प्रतिभा व प्रज्ञा ह्या दोहोंनीं शोभणारा मराठीचा हा जगन्नाथ पंडित नाहींसा झाला. मराठीचा एक वेदांगकार नाहींसा झाला. त्यांच्या बाराव्या दिवशीं ही तिलांजलि देण्याचा प्रसंग त्यांच्या स्नेह्यांवर इतक्या लवकर यावा ह्यापेक्षां अधिक दुर्दैव कोणतें! त्यांच्या आत्म्याला शेवटीं इतकेंच कोणी सांगेल कीं, “बा आत्म्या, तूं आपल्या हयातींत केलेल्या वाङ्मयीन कार्यानें तुझें स्वतःचें जरी समाधान झालें नसलें, तरी आम्हां मराठी भाषिकांचें पूर्ण समाधान झालें आहे व ह्या तुझ्या कार्याबद्दल आम्ही तुझे कायमचे ऋणी राहूं.”*

* डॉ. माधवराव पटवर्धन ता. २९ नोव्हेंबर १९३९ रोजीं दिवंगत झाले.

# १०. साने गुरुजी आणि साहित्य कला

सध्यांच्या वाङ्मयप्रांगणांत आज एक नवीनच वाद उत्पन्न झाला आहे किंवा उपस्थित केला गेला आहे. वादांतील दोन पक्षांपैकीं एक पक्ष प्रांगणांत उतरला आहे, दुसऱ्या विरोधी पक्षांतील मुख्य वीर अद्याप प्रत्यक्ष असे प्रांगणांत उतरले नसले, तरी त्यांच्या वतीनें वाङ्मयीन वातावरण दुमदुमविण्याचें काम इतर मंडळी करीत आहेत. आमचा असा पक्ष कोणताच नाहीं. आम्ही ह्या वादाकडे केवळ त्रयस्थाच्या भूमिकेवरून पाहणार आहोंत. आम्हांला दोन्ही पक्ष सारखेच; तितकेच दूरचे किंवा तितकेच जवळचे. दोन्ही पक्षांच्या वादांतील धुळीनें धूसर झालेलें सरस्वतीचें प्रांगण शुचि व निर्मल कसें होईल व तें तसें झाल्यानंतर तें कसें दिसेल, हें दाखविण्याच्या इराद्यानेंच आम्ही कांहीं थोडा प्रयत्न करणार आहोंत. वाद आहे साने-भागवत व फडके-क्षीरसागर ह्या दोन पक्षांत. तो वर वर दिसायला दिसतो व्यक्तिमूल्यांसंबंधीं. तसा तो असल्यासंबंधीं कांहीं शंकाहि लेखकांनीं प्रकट केल्या आहेत. कोणी म्हणतात, 'सानेवाङ्मयाचा खप फार वाढला; तेव्हां व्यवहारमत्सर ह्याच्या मुळाशीं असावा.' दुसरे कोणी म्हणतात, 'सानेवाङ्मय अतीव लोकप्रिय झालें तेव्हां लोकप्रियतेचा मत्सर ह्याच्या मुळाशीं असावा.' ह्या असल्या शंका वादाच्या बाबतींत अत्यंत गैरलागू आहेत. आतां हें मात्र खरें कीं, वादांतील एक पक्ष वाङ्मयसेवेनें मिळविलेल्या श्रेयाचा व प्रेयाचा मक्तेकरी आहे व दुसरा पक्ष लोकसेवेनें मिळविलेल्या श्रेयाचा व प्रेयाचा मक्तेकरी आहे. असें जरी असलें, तरी वरीलसारख्या हेतूंचा आरोप करणें म्हणजे मुख्य मुद्द्याला बगल देण्यासारखें आहे. वाद हा व्यक्तिमूल्यासंबंधीं नाहीं, विषयमूल्यासंबंधींहि तितकासा प्राधान्यानें नाहीं; वाद खरा आहे तो वाङ्मयमूल्यासंबंधीं आहे. त्याच एका दृष्टीनें प्रस्तुत वादाकडे पाहिलें पाहिजे. हें पाहतांना इतर आनुषंगिक उपाधींनीं आपली दृष्टि शबल होऊं देतां कामा नये.

वाद उकरून काढला साने-भागवतांनीं. प्रतिपक्षाचा अधिक्षेप प्रथम त्यांनीं केला. साने-भागवत ही मंडळी अत्यंत सालस, अत्यंत निरुपद्रवी, अत्यंत परमत-सहिष्णु व परकर्मसहिष्णु; परंतु त्यांच्या हातून ही आगळीक प्रथम झाली खरी; आणि ही होऊन दोन वर्षांच्या वर काळ गेला. ललितरम्य लेखकांना साने ह्यांनीं १९४३ सालीं प्रसिद्ध झालेल्या आपल्या 'कला म्हणजे काय?' ह्या भाषांतरी

ग्रंथांत टोमणा दिला—"तुमच्या रागिण्या व तुमच्या दौलती यांचें बहुजनसमाजाला काय होय? तुमचे उच्च काव्यशास्त्रविनोद, तुमचे सुसंस्कृत वैषयिक सुखविलास—त्यांना त्यांतील कांहीं समजत नाहीं." हा तो टोमणा होय! हा अर्थात् वामनराव जोशी व प्रो. फडके हे जे ललितरम्य लेखकांचे अग्रणी, त्यांना आहे हें उघड उघड दिसतें. म्हटला तर हा टोमणा आहे; म्हटला तर नाहीं. परंतु ह्याच्या पुढचा-मागचा संदर्भ जर पाहिला, तर तें वाचून कोमल वृत्तीचे वामनराव तर हुळहुळले असतेच, पण झुंझार-वृत्तीचे फडके हेहि हुळहुळून जातील इतका त्यांत अधिक्षेप आहे. दुसरी कुरापत भागवत यांनीं आपल्या 'जीवनसाहित्य' ह्या पुस्तकांत काढली. त्यालाहि वर्ष होऊन गेलें. हा अधिक्षेप तितकासा उत्तान नाहीं. बराचसा प्रच्छन्न आहे, व तो बऱ्याच वर्षांपूर्वी केला होता. त्याला पुनः उजाळा मात्र 'जीवनसाहित्य' ह्या पुस्तकाच्या प्रकाशनानें मिळाला. खरें पाहिलें तर, हा वाद पूर्वीच निघायचा. परंतु, ललितरम्य लेखकांनीं ह्याची फारशी दखलगिरी घेतली नाहीं. साने ह्यांच्या 'कला म्हणजे काय?' ह्या टॉलस्टॉय ग्रंथाच्या परीक्षणाच्या अनुषंगानें रा. क्षीरसागर ह्यांनीं त्या वादाला वाचा दिली. नंतर प्रो. फडके ह्यांनीं व्याख्यानानें आपला पक्ष जोरांत पुढें मांडला. आतां त्या वादाची उत्तर-प्रत्युत्तरी इतरांत चालली आहे.

वाद दिसायला दिसतो व्यक्तिमूल्यासंबंधीं; परंतु तो आहे वाङ्मयमूल्यासंबंधीं. तसाच तो असावा व आहे म्हणूनच व्यक्तिव्यक्तींमधील क्षेपअधिक्षेपांची फेक नाहींशी होऊन कांहीं वाङ्मयमूल्यासंबंधीं संपन्न असें तत्त्व हातीं लागण्याचा संभव आहे. ह्या वादांत वाङ्मयासंबंधीं पुष्कळच मुद्दे आले आहेत. ते संख्येनें व महत्त्वानें इतके प्रचुर आहेत कीं, केवळ त्यामुळेंच त्यांची एकजात गल्लत झाली आहे. त्यांत कला आहे व साहित्यकला आहे; त्यांत जीवन व मानवी जीवनाचें साफल्य आहे. त्यांत सत्यम्, शिवम्, सुंदरम् ही अधिष्ठानत्रयी आहे; त्यांत त्याग आहे व भोगहि आहे; त्यांत शुचिता व विरक्ति ह्यांचा हव्यास आहे; त्यांत देशोन्नतीला उपकारक अशा भावना-बंधाच्या तरुणांची निर्मिति आहे; त्यांत शृंगाररम्य वाङ्मयनिर्मिति व शान्तरम्य वाङ्मयनिर्मिति आहे; त्यांत कलेसाठीं कला विरुद्ध जीवनासाठीं कला ही बाब आहे; त्यांत कलकारांचें खाजगी वर्तन व त्यांची कलानिर्मिति ह्यांचा परस्परसंबंध आहे; त्यांत लेखकानें काय लिहावें व कसें लिहावें हाहि प्रश्न आहे; त्यांत कोणतें वाङ्मय समाजांतील खालच्या थरांवरील लोकांत गेलें आहे हा मुद्दा आहे. असे एक ना

दोन, किती तरी प्रश्न उद्‌भूत झाले आहेत. हे झाले सामान्य स्वरूपाचे मुद्दे. विशेष आणि वैयक्तिक स्वरूपाचे मुद्दे पुनः निराळेच आहेत. साने ह्यांचें वाङ्मय राष्ट्रीय आहे का रडवें आहे; फडके वगैरेंचें वाङ्मय कामिक आहे का कामुक आहे; हे सारे वैयक्तिक स्वरूपाचे प्रश्न होत. हे इतके प्रश्न वादांत उद्भवल्यामुळें त्यांची गल्लत झालेली दिसते, व शेवटीं इतकाच परिणाम उरतो कीं, फडके ह्यांनीं साने ह्यांच्यावर मोठ्या हिरिरीनें हल्ला चढविला आहे; हा सर्व वैयक्तिक मत्सराचा परिणाम आहे; त्यांना ह्या लोकप्रिय वाङ्मयाचा हेवा वाटतो आहे; इत्यादि.

एक मुख्य गोष्ट मात्र प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे; मराठी वाङ्मयांत पारंपरिक वाङ्मयनिर्मितीपेक्षां पुष्कळशी निराळी, आणि ती विषय, प्रतिपादन व शैली ह्या तिन्ही दृष्टींनीं निराळी, अशी वाङ्मयनिर्मिति गेल्या पंधरा वर्षांपासून होऊं लागली आहे. एक पारंपरिक प्रवाह व दुसरा हा अभिनव प्रवाह असे दोन परस्परभिन्न व स्पष्ट असे प्रवाह अलीकडील पंधरा वर्षांच्या मराठी वाङ्मय-वैचारिकेमध्यें वाहत असलेले दिसून येऊं लागले आहेत. पारंपरिक प्रवाह हा लगतच्या पूर्वीच्या मराठी वाङ्मयकारांशीं संबद्ध असा आहे. हा पारंपरिक वाङ्मय-प्रवाह केळकर ह्यांच्यापासून तों थेट वा. म. जोशी, फडके, अत्रे, खांडेकर, वरेरकर, माडखोलकर, यशवंत, गिरीश ह्यांच्या द्वारा आजकालच्या सामान्य ललितलेखकांपर्यंत पोहोंचतो. हे त्यांचे प्रतिनिधि होत. दुसरा जो अभिनव प्रवाह असा आम्हीं म्हटला त्याचे प्रतिनिधि कालेलकर, जावडेकर, विनोबा भावे, साने गुरुजी, प्रेमा कंटक, भागवत, कुसुमाग्रज हे होत. ह्यांना आपण गांधीवादी लेखक असें म्हणूं. डॉ. केतकर, पु. य. देशपांडे, वगैरे लेखक कोणत्या परंपरेंत बसवावेत हा एक मोठा प्रश्नच आहे. ह्या दोन्ही प्रकारांतील लेखक पुरोगामी, प्रगतविचारी असे आहेत. पारंपरिक प्रवाह ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, ते जुन्या, बुरसटलेल्या वैचारिक परंपरेला चिकटून आहेत. त्याचा अर्थ इतकाच कीं, जुन्या आपटे, केशवसुत वगैरे लेखकांच्या परंपरेंतून ह्यांचा जन्म झाला. ह्यांची वाङ्मयकृति आणि आपटे, केशवसुत कालांतील वाङ्मयकृति ह्यांत वैचारिक व प्रतिपादनी साम्य आहे, इतकाच त्याचा अर्थ.

ही गोष्ट गांधीवादी लेखकांची नाहीं. ह्यांची वैचारिक संपत्ति व प्रतिपादनपद्धति ही निराळी आहे. ही पूर्वीच्या लगतच्या काळांतील मराठी वाङ्मयकारांच्या विचारसंपत्ति व प्रतिपादनपद्धति ह्यांच्याशीं जुळती नाहीं. हिचा उगम बाहेरील आहे. गांधीवाद हा हिंदुस्थानबाबत सन १९२० सालापासून सुरू झाला असें

स्थूलमानानें म्हणावयास हरकत नाहीं. राजकारणांत जरी १९२० सालापासून गांधीवाद सुरू झाला असला, तरी मराठी वाङ्मयकारणांत त्याचा प्रवेश साधारणपणें १९३२ सालापासून सुरू झाला. मराठी वाङ्मयांत गांधीवादी तत्त्वज्ञानाचें प्रतिबिंब त्या सालापासून उमटूं लागलें. तेव्हांपासून गांधीवादी लेखन आणि तेंहि 'गांधीवादी ललित लेखन' दिसूं लागलें. राजकारणांत गांधीवादी तत्त्वज्ञानानें प्रचंड आंदोलनें उत्पन्न केलीं. तशीं त्यानें वाङ्मय-कारणांत लागलींच केलीं नाहींत. आंदोलनें तशीं उत्पन्न करण्यास दहा-पंधरा वर्षांचा काळ जावा लागला. तें तत्त्वज्ञान लेखकांच्या हाडींमासीं भिनण्यास इतका काळ कां लागला हें एक कोडेंच आहे. गांधी, कालेलकर, महादेव देसाई, मश्रुवाला ह्यांनीं गुजराती भाषेंत व वाङ्मयांत एक मोठी क्रांतीच केली. ही केवळ वाङ्मयीन क्रांतीच नव्हे, तर भाषिक क्रांतीहि आहे. वाङ्मयीन व भाषिक क्रांति ही जर ह्या लेखकांना गुजराती भाषेंत साधली व ती त्यांनीं आरंभापासून पद्धतशीर रीतीनें केली तर ती तशीच क्रांति मराठींत गांधीवादी लेखकांना कां साधली नाहीं? तिचा आरंभ करण्यास मराठींत ह्यांना इतका वेळ कां लागला? कालेलकर ह्यांनीं गुजराती भाषेंत व वाङ्मयांत क्रांति केली असें म्हणतात. कालेलकर हे महाराष्ट्रीय आहेत. मग त्यांना एका भाषेंत आणि तेंहि परक्या भाषेंत जें साधलें तें दुसऱ्या भाषेंत आणि तेंहि त्यांच्या स्वतःच्या भाषेंत कां साधलें नाहीं किंवा साधण्यास इतका वेळ कां लागावा हेंच मोठें आश्चर्य आहे.

अलिकडे अलिकडे मात्र मराठींत गांधीवादी लेखकपरंपरा गेल्या दहा-पंधरा वर्षांत दिसूं लागली आहे. ही लेखकपरंपरा अर्थात् राजकारणांतील गांधीवादी तत्त्वज्ञानावर आधारलेली आहे. ह्या तत्त्वज्ञानांत त्याग आहे, अन्यायप्रतिकार आहे, सोशिक वृत्ति आहे, संयम आहे, अकुतोभय आहे, आचारविचार व उच्चार ह्याबाबत शुचित्व आहे, त्यांत कमालीचा निष्ठावंतपणा आहे. ही झाली त्या तत्त्वज्ञानाची दैवी संपत्. ह्या तत्त्वज्ञानांत राजस संपत्हि आहे. प्राक्कालीन आर्य संस्कृति किंवा भारतीय संस्कृति हिचा जाज्वल्य अभिमान त्या तत्त्वज्ञानांत आहे, व तितकाच जाज्वल्य तिरस्कार आधुनिक यांत्रिक युगाचा किंवा यांत्रिक वैचारिकेचा आहे. आम्ही जें करतों तें सर्व राष्ट्रासाठीं आहे, तें सर्व जानपदांसाठीं आहे, किंबहुना तें सर्व मानव जातीसाठीं आहे, असा अभिमान ह्या तत्त्वज्ञानांत आहे. आमचाच संबंध समाजांतील सर्व थरांवरील लोकांशीं येतो, आम्हांलाच त्यांचीं सुखःदुःखें समजतात व आम्हीच तीं साधतों किंवा दूर करतों; ह्यामुळें

आम्हांलाच त्यांचें जीवन समजतें. किंबहुना, आम्हांलाच अखिल मानवी जीवन प्रतीत होतें व तत्परत्वें आम्हांलाच मानवी जीवनसाफल्य म्हणजे काय हें समजतें; असाहि अभिमान त्या तत्त्वज्ञानांत आहे. ही झाली राजस संपत्. ह्या दोन्ही दैवी व राजस संपत्च्या जोडीनें तिसरी तामस संपत्हि त्या तत्त्वज्ञानांत आहे. गांधीवादी तत्त्वज्ञानांत अहंभाव जसा आहे तसा अहंकारहि आहे. इतका त्याग, इतकी सहनशीलता, इतकी अन्यायांची व पापांची चीड, इतका संयम ह्या सात्त्विक गुणांमुळें एक असा विशिष्ट प्रकारचा मनःपिंड तयार होतो कीं, त्यामुळें आपणच तेवढे श्रेष्ठ, आपण करतों तेंच श्रेयस् आणि प्रेयस्, इतर सर्व तुच्छ, हलके, भ्रष्टमार्गी आहेत अशी मनाची भावना होते. इतरांसंबंधीं तुच्छतेची, तिरस्काराची भावना ह्या तत्त्वज्ञानांत दिसून येते. राजकारणांत तर असा देखावा नेहमीं दिसून येतो कीं, गांधीवादी राजकारण हें कधीं नम्रता दाखवितें, तर कधीं तुच्छता दाखवितें. परराष्ट्रें, ब्रिटिश सरकार व महमदी जमात ह्यांच्यापुढें गांधीवादी राजकारण हें नम्रता दाखवितें तर सरकारी नोकर, नेमस्त पक्ष, समाजसुधारक, अस्पृश्य पक्ष व हिंदुसभा पक्ष ह्यांच्यासंबंधीं गांधीवादी राजकारण हें तुच्छता दाखवितें. गांधीवादी तत्त्वज्ञानांतील दैवी, राजस व तामस अशी त्रिविधा संपत् अशा प्रकारची आहे.

राजकारणी तत्त्वज्ञानांतील ही त्रिविधा संपत् बरोबर तशीची तशी मराठी वाङ्मयकारणांत कांहीं ठिकाणीं उतरलेली आहे, व इतर कांहीं ठिकाणीं उतरूं पाहात आहे. गांधीवादी लेखकांच्या लेखनांतील जो चांगुलपणा आहे तो त्यांच्या दैवी संपत्मुळें आहे, जो प्रखरपणा आहे तो त्यांच्या राजस संपत्मुळें आहे, व जो हीनपणा आहे तो तामस संपत्मुळें आहे. एरव्हीं त्यांच्या दैवी संपत्मुळें पूज्यत्व, आदर व प्रेम ह्याच भावना त्यांच्या वाङ्मयवाचनानें उत्पन्न होतात. गांधीवादी मराठी लेखकांत मी प्रामुख्यानें कालेलकर, विनोबा भावे, जावडेकर, देवगिरीकर, काका गाडगीळ, गोरे, साने गुरुजी, आचार्य भागवत, प्रेमा कंटक ह्यांचा निर्देश करतों. ह्यांतील कांहीं ललित लेखक तर कांहीं ललितेतर लेखक आहेत. ह्या लेखकांचे माझ्या मतानें दोन वर्ग पडतात. हे दोन वर्ग मी लेखनशैलीच्या अनुरोधानें पाडतों. हे सर्वच लेखक गांधीवादी तत्त्वज्ञानावर आधारलेलें असें लेखन करतात. ह्यांतील जावडेकर, देवगिरीकर, गोरे, आचार्य भागवत हे विचार लिहितात गांधीवादाचे; पण ते लिहितात पारंपरिक लेखनशैलीनें (चिपळूणकरी लेखनशैली). दुसरे विनोबाजी भावे, साने गुरुजी, प्रेमा कंटक हे विचार लिहितात गांधीवादाचे; पण ते लिहितात

कालेल्करी लेखनशैलीनें. कालेल्कर हे अर्थात् ह्या दुसऱ्या वर्गातील लेखकांचे लेखनशैलीबाबत अग्रणी होत. गांधीवादी लेखकांवर मराठींतील टीकाकार कितीहि आग पाखडोत! त्यांनीं मराठी साहित्यांत बुवाबाजी माजविली असें म्हणोत, त्यांच्या वाङ्मयाला रडवें वाङ्मय म्हणून अवहेलोत! कालेल्करी वाङ्मय व कालेल्करी लेखनशैली ह्या गोष्टी मराठींत राहणार हें उघड दिसतें. 'हिमालयांतील प्रवास', 'लोकमाता' वगैरे पुस्तकें अद्वितीय आहेत. निसर्गाला वाचा फोडण्याची मुक्तेश्वरी करामत त्यांच्यांत आहे. त्यांच्या 'लोकमाता' ह्या भवभूतीच्या नद्यांप्रमाणें मानवी भाव व अनुभाव प्रकट करतात. निसर्गाचें वर्णन पुष्कळ लेखक करतात, परंतु निसर्गाचें मानवीकरण थोडेच लेखक करतात, व त्यांपैकीं कालेल्कर एक आहेत. मराठी गद्य पुष्कळ लेखक लिहितात. भावनात्मक गद्यहि लिहिणारे लेखक कांहीं कमी नाहींत; परंतु भावनामय गद्य फार थोड्यांनाच साधतें. अशा थोड्या लेखकांपैकीं कालेल्कर हे आहेत. हृत्प्रहेलन करणारी भावना व तितक्याच आवेगाची हृत्प्रहेलन करणारी भावनामय लेखनशैली ह्या दोहोंचा सुंदर मेळ काकासाहेब कालेल्करांच्या लेखनांत आढळून येतो; हें कालेलकरी वाङ्मयाचें वैशिष्ट्य होय.

कालेल्करांच्या वाङ्मयाचें माहात्म्य असें जरी आम्हीं सांगितलें, तरी कालेलकरांच्या वळणावर जें वाङ्मय निर्माण झालें आहे, त्या सर्वांत मात्र हें माहात्म्य उतरलें नाहीं. भावनांचा गाभा सर्वांच्याच लेखनांत आहे; परंतु त्या गाभ्याचें वर्णन करतांना कालेल्कर हे भावनामय होतात, तर इतर त्या वळणांतील लेखक भावनावश होतात. हाच कालेल्कर व त्यांचे अनुयायी ह्या दोहोंमधील मोठा फरक आहे. भावनामयत्व हा गुण आहे, तर भावनावशत्व हा दोष आहे. भावनामयत्व हें स्वाभाविक दिसतें पण हें योग्य प्रमाणाच्या बाहेर गेलें म्हणजे कृत्रिम व हास्यास्पद दिसतें. हा भावनामयत्वाचा दोष साने-वाङ्मयांत पदोपदीं आढळून येतो. एखादी भावना पिंजायची किती ह्याचा सान्यांना सुमार राहात नाहीं. पिंजून पिंजून या भावनेंत इतकी पातळाई येते कीं, तिचा परिणामच कांहीं मनावर होत नाहीं. त्या भावनेच्या भरांत ते स्वतः इतके वाहून जातात कीं, त्यांचें त्यांना भानच राहात नाहीं. त्यांच्याइतकी वाचकांची भावना प्रबल कशी असणार? कमी प्रबल भावना असलेला वाचक तें सर्व सानेवाङ्मय वाचून हसूं तरी लागतो, किंवा अधिक प्रबल भावना असलेला वाचक रडूं तरी लागतो. असा कांहीं तरी विचित्र असा परिणाम सान्यांच्या वाङ्मयाचा होतो.

ही कालेलकरी वळणाची लेखनशैली दोन्ही दृष्टींनीं विचार करण्यासारखी आहे. ही जोंपर्यंत यथायोग्य मर्यादेंत स्फुरलेली भावना वर्णन करते, तोंपर्यंत ती ठीक असते, तोंपर्यंत ती स्वाभाविक असते, तोंपर्यंत ती भावनिकहि असते. परंतु तीच वर्ण्य भावना मर्यादेच्या बाहेर गेली कीं ती कृत्रिम दिसूं लागते, ती 'मुद्दाम उबवलेली व ऊरबडवी' अशी दिसूं लागते. साने ह्यांची लेखनशैली ह्यामुळेंच कांहीं वाचकांना स्वाभाविक, साधी, शुद्ध व सुटसुटीत वाटते; तर कांहीं इतर वाचकांना त्याच्या अगदीं उलट कृत्रिम, प्रांतिक, पाल्हाळिक व बोजड वाटते. असे दोन्ही प्रकार त्या लेखनशैलींत आहेत, ह्यांत वाद नाहीं. त्यांतहि विशेषतः दुसऱ्याच प्रकारचें प्राचुर्य आहे. हा परिणाम केवळ कोणतीहि भावना मर्यादेबाहेर पिंजण्याचा होय. मराठींतील शैलीकारांच्यासंबंधीं 'समीक्षक' मासिकाच्या एका अंकांत लिहितांना मीं कालेलकर व साने गुरुजी ह्यांच्या लेखनशैलीविषयीं म्हटलेलें येथें पुनः उतरण्यासारखें आहे. "कालेलकरशैली म्हणजे भावनामयतेचा प्रकर्ष होय. ते आपलें अन्तःकरण आपल्या लेखनांत ओततात. निसर्ग हृदयांत मानवी हृदय ओतल्याचें दुसरें उदाहरण सांपडणें कठिण! ते भावनांच्या नादाला अनुरूप असा अर्थनाद साधतात. अर्थनादाला अनुरूप असा शब्दनाद साधतात; लेखक, वाचक व विषय ह्या त्रिपुटीच्या वृत्तींचा लय कालेलकरांच्या लेखनांत साधतो; असाच कांहींसा प्रकार साने गुरुजींच्या लेखनशैलींत आढळतो; परंतु कालेलकर हे भावनामय आहेत; तर साने गुरुजी हे भावनावश आहेत; व हाच फरक त्यांच्या लेखनशैलींत उतरला आहे. साने गुरुजी हे भावनांना ताण फार देतात. अव्वलहि भावना व अखेरहि भावना असा त्यांचा थाट आहे. कोणतीही गोष्ट अति झाली म्हणजे तींतील गोडी कमी होते, ती कृत्रिम भासते."

ही झाली साने ह्यांच्या लेखनशैलीची गोष्ट. लेखनशैली हें लेखनविचाराचें बाह्यांग आहे. ती त्याचें आवरण आहे. भावना किंवा विचार हा त्याचा आत्मा समजला तर लेखनशैली ही त्याची कृत्ति होय, आच्छादन होय. आच्छादनाचा विचार केला म्हणजे आंतील गाभ्याचा विचार केला असें होत नाहीं. त्याचा स्वतंत्र विचार करावा लागतो. लेखनशैलीमध्यें लेखकाच्या वृत्तींचें प्रतिबिंब उमटतें; त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार लेखनशैलींत होतो. असें जरी असलें तरी लेखकाच्या लेखनांतील आत्म्याचा विचार हा स्वतंत्रच ठरतो. त्यानें आपल्या कलाकृतींत जें मानवी जीवनाचें आपलें सारभूत तत्त्वज्ञान प्रकट केलें, त्याचा विचार हा स्वतंत्रच ठरतो.

लेखनशैली ही कलेच्या आविष्काराची एक पद्धत आहे. ती कलाकृतींत वापरलेलें च्चें द्रव्य नव्हे. ती एखादे वेळेस कलेचा आविष्कार समजून घेण्याचें माध्यम रेल; परंतु ती लेखनात्मा ठरणार नाहीं. लेखनशैली ही पद्धत असल्यामुळें किंवा माध्यम असल्यामुळें तिच्यांत कलात्व असतें. तिच्यामुळेंच कलाकृतीला कलात्व प्राप्त होतें. असें जरी असलें तरी कलात्व ज्या द्रव्यांत निर्माण होतें त्या द्रव्याचा म्हणजे केंद्रवर्ती आत्म्याचा विचार करावाच लागतो. साने-वाङ्मयांतील असा हा केंद्रवर्ती आत्मा कसा आहे, त्यांनीं आपल्या वाङ्मयद्वारा प्रकट केलेल्या मानवी जीवनाचें स्वरूप कशा प्रकारचें आहे हें पाहणें ओघानेंच प्राप्त होतें.

साने गुरुजी हे गांधीवादी लेखक आहेत. ते गांधीवादी तत्त्वज्ञानांत अगदीं मुरलेले आहेत. गांधीवादी तत्त्वज्ञान ज्या महाराष्ट्रीय मंडळीच्या अगदीं रोमरंध्रीं मुरलेलें आहे, अशा अप्पासाहेब पटवर्धन, विनोबा भावे वगैरे ह्या थोड्या मंडळी-पैकीं साने गुरुजी हे एक आहेत. गांधीवादी तत्त्वज्ञानाच्या अनुसरणांत एखादे वेळेस प्रत्यक्ष महात्मा गांधींची चूक होईल, परंतु ह्या वरील मंडळींची चूक होणार नाहीं; इतकें तें ह्यांनीं आत्मसात् केलें आहे. ह्यामुळें सानेगुरुजींच्या लेखनाचा आत्मा गांधीवादी तत्त्वज्ञान असणार हें उघड आहे. तोच त्यांच्या लेखनाचा गाभा होय. वर सांगितलेल्या गांधीवादी तत्त्वज्ञानांतील त्रिविधा संपत् साने-वाङ्मयांत आहे. सत्य, शिव, सुंदर ह्या त्रयीसंबंधीं गांधीवादी तत्त्वज्ञानांत जी कल्पना आहे तीच यांची कल्पना. ह्या त्रयीसंबंधीं निरनिराळ्या इतर तत्त्वज्ञान्यांच्या व्याख्या ह्यांच्या तोंडावर टाकून ह्यांच्या वाङ्मयांतील विचारसंभ्रम दाखविणें हें अन्याय्य आहे. "सत्य हें विज्ञानशास्त्रांतील शोधानें बदलतें, शास्त्रशोधानें प्रतीत झालेलें सत्य अशिव असतें, अंतिम सत्य हें श्रेष्ठ आहे, शिव हें नाहीं, शिवाच्या मागची सत्ता उच्च दर्जाची नाहीं; मानवी जीवनाचा अफाट विस्तार, प्रचंडपणा, वैपुल्य, ह्यालाच कवि, चित्रकार सौंदर्य असें म्हणतात." असे निरनिराळे सिद्धांत त्यांच्यावर फेकून त्यांना भेडसावण्यांत कांहीं अर्थ नाहीं. सत्यम्, शिवम्, सुंदरम् ह्या त्रिपुटीविषयीं मोठमोठ्या तत्त्व-ज्ञान्यांत एकवाक्यता नाहीं. जो तो तत्त्वज्ञानी आपल्या विशिष्ट तत्त्वज्ञानाच्या चौकटीमध्यें बसतील अशा आपणास सोयीस्कर त्यांच्या व्याख्या करतो. फडके, क्षीरसागर वगैरे शृंगारललित वाङ्मयाचे पुरस्कर्ते ह्यांच्या जीवन-तत्त्वज्ञानांत व वाङ्मयीन तत्त्वज्ञानांत ह्या त्रयीसंबंधींच्या कल्पना जितक्या ठाम आहेत, त्यांच्यापेक्षां कितीतरी पटीनें ठाम अशा कल्पना ह्या त्रयीसंबंधीं गांधी तत्त्वज्ञानांत व तत्परत्वें

साने-वाङ्मयांत ठाम आहेत हें नाकबूल करणें म्हणजे वेड पांघरणें होय. "सकल मानवजातीचें ऐक्य करूं पाहणारा तो महापुरुष, ह्या महापुरुषाला जें दिसलें तें सत्य, मानवजातीचे ऐक्याला जें उपकारी तें शिव, मानवजातीला जें सुखवितें तें सुंदर" अशा थोडक्यांत सत्यम्, शिवम्, सुंदरम् ह्या त्रयीसंबंधीं ह्यांची कल्पना आहे आणि ती साने ह्यांनीं आपल्या सर्व ललित वाङ्मयांत खिळविली आहे. "भावना सर्वस्पर्शी असावी, उत्कट असावी, स्वच्छ व स्पष्ट असावी, ती (वर उल्लेखिलेल्या) महापुरुषाला मान्य असावी. अशा भावनांचें चित्रण कलेनें जर केलें, तरच ती सत्कला होय. थोर पुरुषांनीं दाखविलेल्या मार्गानें सत्कलेनें जावें, अशी थोडक्यांत साने ह्यांची कलाकृतीसंबंधीं कल्पना आहे. ही कल्पना साने ह्यांच्या साहित्यकलेचें अधिष्ठान आहे. मानव जातीचें हितमांगल्य व तें साधणारा महापुरुष किंवा महात्मा ह्या दोन गोष्टी आल्या कीं, त्यासाठीं लागणारा स्वार्थत्याग, वृत्तीचें वैराग्य, शुचित्वाचा हव्यास, शृंगार वगैरे इंद्रियसुखांचा तिटकारा, किंबहुना सर्व भोगवृत्तींचाच होम ह्या गोष्टी येतातच. ह्या सर्व गोष्टी साने-वाङ्मयांत आहेत.

"ह्या सर्व गोष्टी चांगल्या खऱ्या, पण ह्या म्हणजे सर्व मानवी जीवन नव्हे; ही त्याची एक बाजू आहे; ह्याचें वर्णन करणारें वाङ्मय एकांगी होय. मानवी जीवनांत जसा त्याग आहे, तसा भोगहि आहे, जसें पुण्य आहे तसें किंवा त्याहून अधिक पापहि त्यांत आहे. तेव्हां खरें वाङ्मय म्हणजे अशा उभयविध किंवा सर्वविध मानवी-जीवनाचें चित्रण; तीच खरी साहित्यकला." असा प्रतिपक्ष करून त्यांना निरुत्तर करतां येणार नाहीं. सानेवाङ्मयाचें अधिष्ठानच जर त्याग व होम हें आहे, तर त्यांच्यापुढें भोगी वृत्तींचा व इंद्रियवैषयिक सुखांचा पुरस्कार करणारा कोटिक्रम काय कामाचा? सान्यांच्या स्वभावांत व जीवनांत मुरलेल्या ह्या त्यागाच्या स्वभावामुळेंच त्यांना भोगांचा पुरस्कार करणारें वाङ्मय अधम प्रकारचें दिसतें. साने ह्यांनीं अखिल जरी नाहीं, तरी हिंदुस्थानांतील मानवी जीवनांतील कल्याण साधण्याच्या इराद्यानें कारावासाचे शारीरिक कष्ट सोसल्यामुळें इतर लोकांची त्याबद्दलची अनास्था व बेफिकिरी पाहून त्यांना हळहळ वाटणें साहजिक आहे. देश पारतंत्र्यांत आज कित्येक वर्षें पिचत पडलेला पाहिल्यानंतर ह्या ललित लेखकांना "रागिण्या आणि दौलती"च फक्त कां सुचाव्यात? त्यांना "कॉलेजमधील पांखरांच्या लीला" तेवढ्याच कां दिसाव्यात व त्यांनीं कां वर्णाव्यात? ह्या प्रश्नानें साने व इतर तत्सम विचारांचे लेखक ह्यांना व्यग्र केलें असल्यास नवल नाहीं. राष्ट्रांत चांगल्या सद्भावनांसंबंधांच्या

तरुणांची परंपरा निर्माण करण्यांत ह्या ललित लेखकांनीं आपली प्रतिभा कां वेंचूं नये, असा रोखठोक प्रश्न जर त्यांनीं आपल्या देशसेवेच्या जोरावर सर्व ललित लेखकांना विचारला तर त्यांना फारशीं नांवें ठेवतां येणार नाहींत. त्यांनीं केलेल्या देशसेवेमुळें व भोगलेल्या कष्टांमुळें तसें विचारण्याचा त्यांना अधिकार पोहोंचतो, असें कोणीहि म्हणेल.

" मी देशसेवा करतों आहें, मी लोकसेवा करतों आहें, मीं कारावास भोगला आहे; तेव्हां मीं निर्माण केलेलें ललित वाङ्मय अद्वितीय आहे," असा दावा साने किंवा तत्सम विचारी मंडळी ह्यांनीं मांडला आहे का ? त्यांचें वाङ्मय कोणत्या प्रतीचें आहे हें काळ ठरवीलच. " आम्हाला श्रेष्ठ वाङ्मयकार म्हणा " असा आग्रह धरल्याचा आरोप त्यांच्यावर करणें व त्यांनीं मराठी वाङ्मयांत बुवाबाजी आरंभिली असें म्हणणें हा शुद्ध कांगावखोरपणा वाटण्याचा संभव आहे. त्यांनीं केलेला स्वार्थ-त्याग, त्यांनीं भोगलेला तुरुंगवास, त्यांना पडलेले कष्ट वगैरे गोष्टींचा नकळत उपयोग त्यांच्या वाङ्मयप्रसाराला होतो हें खरें आहे; परंतु त्यांत त्यांचा इलाज काय, त्यांनीं त्यास काय करावें ? त्याग, सत्य, यातना, शुचित्व, परहितसाधन वगैरे सामाजिक गुणांची प्रतिष्ठा समाज अद्याप मानतो. त्यांत त्यांचा काय दोष ? इतर लेखकांना नाहीं का वाङ्मयप्रसाराला कांहीं इतर गोष्टींचा कळत नकळत उपयोग होत ? कुणाला त्याच्या प्रोफेसरीचा, तर कुणाला त्याच्या संपादकत्वाचा, तर कुणाला त्याच्या संपत्तीचा—वाङ्मयप्रसाराला उपयोग नाहीं का होत ? उलट कांहीं ललित साहित्यिक व कवि हे आपल्याभोंवतीं आपल्या चहात्यांचा एक कंपू गोळा करतात. ह्या असल्या कंपूचें कामच हें कीं, त्यांचें ढोलकें वाजवायचें. तेव्हां लोकसेवा, तुरुंगवास वगैरे गोष्टी ह्या दुय्यम आहेत. वाङ्मयसमीक्षणांत ह्या गोष्टी येऊं नयेत.

साने-वाङ्मयांत आणखी एक मुख्य विशेष आढळतो तो म्हणजे आर्य किंवा विशेषतः भारतीय संस्कृति हा होय. साने-वाङ्मयांत भारतीय संस्कृतीचा अर्क आहे. त्यांत तिचें सर्व सार आहे. ती त्यांत ओतप्रोत भरली आहे. त्यांचा निबंध असो, लघुकथा असो, काव्य असो किंवा संवाद असो; भारतीय संस्कृतीचें अवगुंठन त्याला असायचेंच. साने हे भारतीय संस्कृतींत जगतात, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष भारतीय संस्कृतीच जगतात. वेदकालापासून तों तहत् आजकालच्या कालापर्यंत समुच्चित झालेली आर्य संस्कृति त्यांच्या जीवनांत व वाङ्मयांत आहे. ज्यांना भारतीय संस्कृतीच काय हें समजत नाहीं किंवा ज्यांना तिचें वावडें आहे, त्यांना साने ह्यांचें जीवन व

वाङ्मय बरोबर समजणार नाहीं. भारतीय-संस्कृति हा त्यांच्या वाङ्मयाचा मुख्य विशेष आहे. मी ह्याच्याहि पुढें जाऊन असें म्हणेन कीं, साने यांच्या वाङ्मयांत मानवी जीवनाचें चित्रण तितकेंसें नाहीं; विविध तर नाहींच नाहीं. जें कांहीं चित्रण त्यांत आहे तें भारतीय संस्कृतीचें चित्रण आहे. त्यांच्या कथा भारतीय संस्कृतीमधील, त्यांचे प्रसंग भारतीय संस्कृतीसंबंधीं व त्यांचीं पत्रेंहि भारतीय संस्कृतिसंरक्षक अशीं आहेत. मानवी जीवनाचें साफल्य, त्यांचा शुचित्वाचा हव्यास, त्यांच्या वैयक्तिक जीवनांतील अनुभववैपुल्य, त्यांचें जानपदीय लोकांशीं समरसत्व अशा किती जरी गोष्टी त्यांच्या पुरस्कारी लोकांनीं आग्रहानें सांगितल्या, तरी त्या दुय्यम होत. भारतीय-संस्कृति-दर्शन हें त्याच्या वाङ्मयाचें प्रधान ध्येय आहे.

असेंहि आणखी म्हणतां येईल कीं, त्यांच्या वाङ्मयांतील हें भारतीय-संस्कृति-दर्शनहि एकांगी आहे; सर्वांगी नाहीं. संस्कृतीमधील धार्मिक परंपरा, नीतिपरंपरा, तत्त्वज्ञानपरंपरा ह्याच गोष्टी त्यांच्या संस्कृतिदर्शनांत अभिप्रेत आहेत. त्यांतील जीवनपरंपरा विशेषशी अभिप्रेत नाहीं. त्यामुळें सानेवाङ्मयांत रसवैचित्र्य नाहीं, पात्रवैचित्र्य नाहीं व प्रसंगवैचित्र्यहि नाहीं. तीच ती भावना; भिन्न भिन्न नांवांचीं, परंतु त्याच त्या भावनेचीं पात्रें, भिन्न भिन्न काळांतील व भिन्न भिन्न स्थलांतील; परंतु तेच ते प्रसंग, तोच तो रस; अशा प्रकारचें साने-वाङ्मयाचें स्वरूप आहे. वात्सल्य, मातृप्रेम, सात्त्विक शृंगार, दया, अनुकंपा, भक्ति, सेवा, कारुण्य, शुचित्व इत्यादि सद्‌गुणांच्या व सत्प्रवृत्तींच्या मुळांशीं असलेल्या मृदु भावना ह्याच त्यांच्या वाङ्मयांतील स्थायी भावना असल्यामुळें, त्याला अनुरूप अशीच रसनिष्पत्ति सान्यांच्या वाङ्मयांत झाली आहे. सद्‌गुण, सत्प्रवृत्ति व सन्नीति ह्यांचा उपदेश एखादा मनुष्य करूं लागला, म्हणजे मग त्याला सुमार राहात नाहीं. त्याचा अतिरेक होतो. आणि असा अतिरेक झाला कीं, त्याचें हसूं होतें. त्याच्या विरुद्ध बंड करावेंसें वाटतें. भावनेचा अतिरेक, उपदेशाचा अतिरेक, मृदुरसांचा अतिरेक, जेथें जेथें साने वाङ्मयांत झाला आहे, तेथें तेथें तें ‘ रडवें, ऊरबडवें व उबवलेलें ’ असें झालें आहे. ही असली छाया कोठें दाट, तर कोठें विरळ, अशी सर्व साने-वाङ्मयावर आहे.

सद्‌गुण, सत्प्रवृत्ति व सन्नीति ह्यांसंबंधीं उपदेश ललित वाङ्मयाच्या द्वारा केल्यामुळें सानेवाङ्मयाचें स्वरूप शुद्ध, सुबोध, प्रामाणिक, निष्ठावंत असें झालें आहे. एक तऱ्हेचें कल्याणमय, शान्त, रमणीय, बालसुलभ असें वातावरण त्यांच्या कथा-

वाङ्मयांत दरवळलेलें आढळतें. नीतीचा उपदेश सांगायचा असल्यामुळें त्यांत 'बौद्धिक सचोटी आपोआपच उतरली आहे; तसेंच तो उपदेश ललित वाङ्मयाच्या द्वारा सांगायचा असल्यामुळें त्यांत भावनिक सचोटीहि आपोआप उतरली आहे. 'लेखनपूर्व व लेखनगर्भ आत्मनिष्ठा' म्हणून जी कांहीं म्हणतात, ती साने-वाङ्मयांत पुरेपूर आहे. ह्या असल्या त्याच्या स्वरूपामुळें साने-कथावाङ्मय वाचतांना आपण जुनें उपनिषदांतील किंवा आरण्यक ग्रंथांतील सरमा व तिचें पोर, उद्दालक व त्याचा पुत्र, जनक-अश्वपति व गार्गी-अत्रेयी-वाचक्नवी ह्यांचें कथावाङ्मय वाचतों आहों, असा भास होतो. इतकें तें वातावरण पवित्र, शुद्ध व मंगल वाटतें. ह्या त्या वाङ्मयाच्या स्वरूपामुळें साने-वाङ्मय हें 'मराठींतील आरण्यकें' आहेत असें म्हणण्याचा मोह होतो.

साने-वाङ्मय हें समाजांतील सर्व थरांवरील लोकांसंबंधीं आहे. तें बालांचें जसें आहे, तसें तें वृद्धांचें आहे; तें पुरुषांचें जसें आहे, तसें स्त्रियांचें आहे; तें ब्राह्मणांचें जसें आहे, तसें तें अंत्यजांचें आहे; तें श्रीमंतांचें जसें आहे, तसें तें किसान कामगारांचें आहे. त्याची हाक सर्वांना पोहोंचते; त्याचा स्पर्श सर्वांना होतो. त्यांतल्या त्यांत दुबळ्यांना, पीडितांना, दलितांना तर विशेषच पोहोंचतो. ह्या त्या वाङ्मयाच्या सार्वजनीन स्पर्शामुळें त्याला जानपदी ( Folk Literature ) स्वरूप प्राप्त झालें आहे. वाङ्मयाचा सार्वजनीन स्पर्श असणें किंवा सर्व थरांवरील लोकांना त्याची हाक पोहोंचणें हा गुणहि आहे, आणि दोषहि आहे. सार्वजनीनत्व हा वाङ्मयाचा गुण आहे. परंतु वाङ्मय सार्वजनीन झालें किंवा नीचजनीन झालें कीं तें अभिजात वाङ्मय होऊं शकत नाहीं. त्याला अभिजात वाङ्मय ( Classical Literature ) पदवी मिळण्याच्या आड तें सार्वजनीनत्व किंवा नीचजनीनत्व आल्याशिवाय राहात नाहीं. वाङ्मय जितकें अधिक समाजांतील खालच्या थरांवर पोहोंचेल, तितकें कमी अभिजात तें वाङ्मय असा सिद्धांत घालण्यांत कांहीं प्रत्यवाय नाहीं. जितकें तें कमी अभिजात, तितकें तें कमी उदात्त ( Sublime ) असेंहि पण ठरतें. सार्वजनीनत्व हें गुणाला आणि दोषाला दोहोंना कारणीभूत होतें. साने-वाङ्मय सार्वजनीन आहे, सर्वस्पर्शी आहे; परंतु तितकें तें अभिजात नाहीं, उदात्त नाहीं.

परंतु साने ह्यांचें वाङ्मय मुळांत वाङ्मयच नव्हे, असा दावा आक्षेपक करतात. ह्याला काय उत्तर द्यायचें? तुम्हांला वाटत असेल तर नका म्हणूं त्याला वाङ्मय; परंतु तुमचें हें म्हणणें वाङ्मयनिकषापुढें टिकेल का? नाहीं टिकायचें. साने ह्यांचें

वाङ्मय कमी दर्जाचें आहे; त्यांची साहित्यकला ही एक मोडकीतोडकी कला आहे हें म्हणणें एक वेळ चालेल; परंतु तें वाङ्मयच नव्हे, हें म्हणणें वाङ्मयसिद्धांताला धरून होणार नाहीं. कां म्हणून तें वाङ्मय नाहीं? त्यांत इतर वाङ्मयांत असलेली सुश्लिष्ट व रम्य रचना नाहीं? का त्यांत भावनिक लेखनशैली नाहीं? का त्यांत व्यक्तितत्त्व, कालतत्त्व व चिरंतनतत्त्व या तीन तत्त्वांचा आविष्कार नाहीं? का त्यांत मानवी जीवनावरील भाष्य नाहीं? का त्यांत निसर्गाशीं तन्मयत्व नाहीं? का त्यांत कला नाहीं? काय, नाहीं तरी काय त्यांत, कीं ज्यामुळें तुम्ही आक्षेपक त्याला वाङ्मयसुद्धां म्हणण्यास तयार नाहीं? तुम्हांला अभिप्रेत असलेलें व तुमच्या जीवनाला सोयीवार वाटणारें सत्य, शिव व सुंदर त्यांत नसलें तरी तें वाङ्मय कसें ठरत नाहीं? किंवा त्यांत कलात्व कसें नाहीं? सान्यांचें म्हणून कांहीं सत्य, शिव, सुंदर असें त्यांच्या वाङ्मयांत खास आहे. महात्म्याला किंवा महापुरुषाला जें दिसलें, तें त्यांचें सत्य, मानवी जीवनाला जें हितमय किंवा कल्याणमय तें त्यांचें शिव, व समाजांतील सर्व थरांतील लोकांना जें रिझवितें तें त्यांचें सुंदर, अशी त्यांची विचारसरणी आहेच कीं नाहीं? इतकें असून पुनः त्यांचें वाङ्मय हें वाङ्मयच नाहीं असें कां म्हणून? अभिजात व उदात्त (Sublime, Classical Literature) वाङ्मयाच्या खालीं त्याचा दर्जा लागेल, पण तुम्हांला त्याला वाङ्मय हें म्हटलेंच पाहिजे. अर्वाचीन मराठी वाङ्मयांत इतर लेखकांचें तरी अभिजात व उदात्त असें वाङ्मय आहे कुठें व आहे किती हा एक मोठा प्रश्नच आहे.

साने ह्यांचें ललित वाङ्मय भावनिक जरी असलें, तरी तें उपदेशात्मक व बोधात्मक आहे. संस्कृति, सत्कृति, सद्वृत्ति, सद्गुण, सन्नीति ह्यांसंबंधीं उपदेश आहे. त्यांनीं कल्पनेनें उभारलेले प्रसंग व निर्मिलेलीं पात्रें वास्तव स्वरूपाचीं आहेत. कांहीं कांहीं पात्रांच्या रूपानें स्वतः लेखकच आपल्या वाङ्मयांत वावरतो कीं काय असें वाटतें. ('श्याम' व 'श्यामची आई' पाहा.) कांहीं कांहीं प्रसंग लेखकाच्या स्वतःच्याच जीवनांतील आहेत कीं काय, असें वाटतें. इतकें आत्मनिष्ठत्व साने-वाङ्मयांत आहे. प्रतिभा जर सृजनात्मक, साहचर्यात्मक व उपदेशात्मक अशा तीन स्वरूपांची समजली तर हीं तिन्ही स्वरूपें थोडीं थोडीं साने-वाङ्मयांत सांपडतात. तरी उपदेशात्मक प्रतिभेचा विशेष प्रकर्ष साने-वाङ्मयांत दिसतो. थोडक्यांत म्हणजे साने हे भावनिक उपदेशवादी किंवा उपदेशात्मक भावनावादी (sentimental didacticist) आहेत. ह्या दृष्टीनें साने गुरुजी ह्यांना

अर्वाचीन ललित वाङ्मयकारांत एक विशिष्ट स्थान आहे. इतर ललित लेखकांनीं नाहीं का अर्वाचीन ललित वाङ्मयकारांत आपापलें एक विशिष्ट स्थान प्राप्त करून घेतलें ? प्रो. फडके हे रंजनवादी ललितलेखक, तर खांडेकर हे जीवनवादी ललितलेखक; अत्रे हे रंजनवादी वास्तवलेखक, तर वरेरकर हे प्रमेयवादी वास्तव-लेखक; माडखोल्कर हे शृंगारवादी वास्तवलेखक, तर पु. य. देशपांडे हे साम्यवादी ललितलेखक; वामनराव जोशी हे हेतुवादी ललितलेखक, तर केळकर व केतकर हे वास्तववादी ललितलेखक; असें ज्या त्या लेखकांनीं आपापलें स्थान अर्वाचीन मराठी ललित वाङ्मयांत कायम केलें आहे, तसें साने गुरुजींचेंहि तेथें स्थान आहे व तें त्यांना त्यांच्या वाङ्मयसेवेच्या सामर्थ्यानें मिळालें आहे, देशसेवेच्या सामर्थ्यानें मिळालें नाहीं. "आम्ही देशभक्त आहोंत, तेव्हां आमचें वाङ्मय श्रेष्ठ आहे," असें त्यांनीं म्हणूं नये हें जसें खरें, तसें "तुम्ही देशभक्त आहांत, तेव्हां तुमचें वाङ्मय कनिष्ठ आहे, तें तुमचें क्षेत्र नव्हे," असें इतर साहित्यिकांनीं म्हणूं नये हें तितकेंच खरें आहे. देशभक्ति हा त्यांनीं वाढावा समजूं नये हें जसें खरें, तसें इतरांनींहि पण ती कटमिति समजूं नये हें तितकेंच खरें.

आतां साने ह्यांचें वाङ्मय कला आहे कीं नाहीं, साने हे कलावान् आहेत कीं नाहींत, हा मुद्दा राहिला. कला ही दोन प्रकारची : एक उपयुक्त व दुसरी आनंददायी. साहित्यकला ही दुसऱ्या प्रकारांतील आहे. आनंददायी कलांचे पुन्हा दोन प्रकार आहेत; एक दृक्कला व दुसरी श्रुतिकला. वास्तुकला, मूर्तिकला, रेखाकला व नर्तन-कला ह्या दृक्कला होत. साहित्यकला व संगीतकला ह्या श्रुतिकला होत. या सर्व कला मानवजातीचा आंतर्विकास दाखवितात. ह्या कलांच्या निर्मितीसाठीं द्रव्य-साहित्य लागतें. ह्यांतील सौंदर्यप्रतीतीसाठीं इंद्रियज्ञानाचें माध्यम लागतें. कलावंताला आपल्या कलाकृतीचें मर्म श्रोत्याला सांगतां आलें पाहिजे; म्हणजे दोघांच्या मनांची बैठक एक झाली पाहिजे. मानवी जीवन किंवा त्याचें साफल्य हें साहित्य-कलेचें द्रव्य; भाषा हें तिचें साधन; श्रुति हें तिचें माध्यम; आनंदप्राप्ति हें तिचें फल; हे साहित्यकलेचे घटक होत. "आम्ही काय लिहितों हें पाहूं नका, कसें लिहितों हें पहा," असें जे कांहीं कलावान् साहित्यिक म्हणतात हें चूक आहे. कलेमध्यें जसें पद्धतीला, प्रत्यक्ष कृतीला महत्त्व आहे, तसें जें द्रव्य वापरायचें त्यालाहि महत्त्व आहे. वास्तुकलाकारानें जर माती, दगड हें साहित्य नीट निवडलें नाहीं, तर वास्तु-कलाकृतींत भेगा पडतील. मूर्तिकलाकारानें जर धातु नीट निवडली नाहीं, तर

मूर्तिकलाकृतींत तडे जातील. रेखाकलेची तीच गोष्ट. आणि ह्याचा परिणाम असा होईल कीं, त्या त्या कलाकृतीपासून अपेक्षिलेल्या आनंदप्रतीतींत कमीपणा येईल. साहित्यकलेंतहि चित्रणासाठीं जर मानवी जीवन हिणकस निवडलें किंवा जगांत पाप-अनीतीच फार आहे असें म्हणून नीच जीवनाचेंच जर चित्रण केलें, तर ती कलाकृति एखादे वेळेस कलेंतील कौशल्याच्या जोरावर कलाकृति होईल; परंतु ती अभिजात व उदात्त कलाकृति होणार नाहीं. महाभारत ही कलाकृति आहे व दशकुमारचरित् हीहि पण कलाकृति आहे; शाकुन्तल ही कलाकृति आहे व मालविकाग्निमित्र हीहि पण कलाकृतीच आहे; 'मुक्तेश्वरी भारत' ही कलाकृति आहे व लोलिंबराजाची 'रत्नकला' हीहि पण कलाकृतीच आहे; माधवराव पटवर्धनांचें 'विरहतरंग' ही कलाकृति आहे व 'नकुलालंकार' हीहि पण कलाकृतीच आहे. ह्या सर्व कलाकृतींत फार तफावत आहे आणि ती उदात्तता, अभिजातता ह्यांबाबत आहे. कलाकृतीला जें साहित्य निवडायचें तें मानवी व वैश्विक जीवनांतील सर्व विविध थरांवरील असावें; पण तें अभिजात व उदात्त स्वरूपाचें असावें.

'शिव' हें नीतीवर व धर्मावर आधारलेलें आहे. नीति व धर्म स्थलाप्रमाणें व कालाप्रमाणें बदलतात, म्हणून बदलत्या नीतीचें व बदलत्या धर्माचें, म्हणजे रूढ समजुतीप्रमाणें अनीतीचें व अधर्माचें चित्रण कलाकृतींत जर केलें तर ती कलाकृति त्या विशिष्ट कालापुरती कदाचित् चांगली ठरेल; परंतु ती चिरंतन चांगली कलाकृति ठरणार नाहीं. कारण अनीति व अधर्म ह्यांच्याच फक्त चित्रणानें चिरंतन नीतितत्त्वांना व चिरंतन धर्मतत्त्वांना बाधा येते. अशी नीतिबाह्य व धर्मबाह्य चित्रणाची कलाकृति जीवनाशीं पारखी होते. म्हणून चांगल्या कलाकारानें चिरंतन नीतिमूल्यें व धर्ममूल्यें सोडतां कामा नये.

ह्या वर सांगितलेल्या कलामूल्यानें साने ह्यांची साहित्यकला पारखण्यासारखी आहे. साने हे आपली कला सत्कला आहे असें म्हणतात. "सकल मानव जातीचें प्रेमानें ऐक्य करूं पाहणारा तो महापुरुष. सर्वांत मोठा कलावान् म्हणजे महापुरुष. महापुरुष जीवनाच्या कलेचा उपासक असतो, जीवनाची कला ही परमोच्च कला!" (कला म्हणजे काय? पृ. ११) ही त्यांची विचारसरणी आहे. हीच कलेची विचारसरणी त्यांच्या कलाकृतींच्या मुळाशीं आहे. ह्या विचारसरणींत सत्य, शिव, सुंदर ह्या तीन कलातत्त्वांपैकीं सत्य आणि शिव ह्या दोन तत्त्वांवरच विशेष भर आहे, तिसऱ्यावर नाहीं. साने ह्यांच्या साहित्यकलेनें 'सत्यम्' व 'शिवम्' ह्यांचीच प्रतीति अधिक

होतें; 'सुंदरम्'ची प्रतीति तितकीशी होत नाहीं. कलेंतील सौंदर्याची यथार्थ कल्पनाच साने ह्यांना नसावी. एऱ्हवीं 'डोळे हे जुल्मी गडे' किंवा 'मैतरणी बिगि बिगि चाल' ह्यांसारखीं उत्तम नागर व ग्रामीण भावगीतें त्यांनीं तुच्छ व कलाहीन ठरविलीं नसतीं (कला म्हणजे काय ? पृ. २०).

साने ह्यांची साहित्यकला ही अशा स्वरूपाची आहे. आतां ह्या साहित्यकलेचीं प्रतीकें कोणतीं हें पाहायचें राहिलें. त्यांचें आरंभींचें लिखाण मामुली आहे. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, राजवाडे, गोखले हीं चरित्रें सामान्य आहेत. विद्यार्थी मासिकांतील लिखाणहि तसेंच सामान्य आहे. ह्याच्यानंतरचें त्यांचें लिखाण हळु-हळू गणनीय होऊं लागलें. 'पत्री' मध्यें देशभक्तिपर काव्य आहे. त्याच संग्रहांत 'सत्याग्रही' हें खंडकाव्य आहे. 'स्त्रीजीवन' सारखे जानपद गीतांचे संग्रह आहेत. संग्रहिलेलीं सर्व गीतें फार प्रेमळ, सात्त्विक व भावनात्मक आहेत. भाषा साधी, घरगुती व सरणी ओघवती अशी त्यांत साधली आहे. महाराष्ट्रांतील साध्या कुटुंबांतील संस्कृतींतील प्रेमळपणा, वात्सल्य, पावित्र्य यथातथ्यानें त्यांत उतरलें आहे. हीं गीतें वाचतांना जनाबाईचे अभंग वाचल्यासारखें वाटतें. हीं सर्व जानपद स्त्री-गीतें त्यांनीं गोळा केलीं आहेत, हें त्यांचें काव्य. नाट्यसंवादांचेंहि एक पुस्तक 'सोन्या-मारुती' म्हणून आहे. 'भारतीय संस्कृति' हा त्यांचा एक प्रबंध आहे. त्यांत भारतीय संस्कृतीचे मुख्य घटक—चार वर्ण, चार आश्रम, चार पुरुषार्थ, अवतार, कर्म, ज्ञान, भक्ति, संयम, मृत्यु—ह्या सर्वांचा तात्त्विक विचार आहे व तो हिंदूंच्या सांस्कृतिक इतिहासाला धरून केला आहे. 'विश्राम' म्हणून एक त्यांच्या लघुकथांचा संग्रह आहे. त्यांतील विषय, प्रतिपादन वगैरे गोष्टी मामुलीच आहेत. विशेष उल्लेखनीय अशी अभिनवता त्यांत नाहीं. त्यांचें खरें वाङ्मय म्हणजे त्यांचें कथावाङ्मय हें होय. त्यांत कादंबऱ्या व गोड गोष्टी ह्यांचा समावेश होतो. गोड गोष्टींचे दहा भाग आहेत. मुलांच्या, सर्व उपदेशाच्या गोष्टी आहेत. त्यांच्या सर्व वाङ्मया-पैकीं त्यांच्या कादंबऱ्यांनींच त्यांना वाङ्मयीन नांवलौकिक मिळवून दिला. 'श्याम', 'श्यामची आई', 'क्रांति', 'आस्तिक', 'सती', 'गोड शेवट', 'तीन मुलें' ह्या त्यांच्या मुख्य कादंबऱ्या होत. ह्या सर्वांत 'तीन मुलें' हीच कादंबरी मला आवडते. हें टेनिसनच्या इनॉक आर्डनचें रूपांतर आहे. परंतु माझ्या दृष्टीनें तें फार बेमालूम साधलें आहे. भाषांतर आहे, एवढेंच वैगुण्य आहे. ही कादंबरी स्वतंत्र असती, तर तिच्या एकटीच्या जोरावर मीं साने गुरुजींना कलावान् ठरविलें असतें. मंगा, बुधा, माधुरी

हीं पात्रें उत्तम आहेतच; परंतु त्यांत एक मोठी प्रेमळ म्हातारी घालून सर्व कादंबरींत एक प्रकारचा उदात्त प्रेमळपणा त्यांनीं दरवळून सोडला आहे. 'श्याम' व 'श्यामची आई' ह्यांत प्रेमळपणा, वात्सल्य व उपदेश अतिशय भरला आहे. बराच भाग प्रौढ वाचकांना कृत्रिम व कंटाळवाणा वाटतो—अतिशयोक्त झाला आहे. 'गोड शेवट', 'क्रांति', 'सती' ह्या त्यांच्या आणखी कादंबऱ्या होत. प्रांतिक ग्रामीण वातावरण, सत्प्रवृत्ति, सदुपदेश, नीति, धर्म, देव, देश ह्यांसंबंधीं विचार व भावना ठिकठिकाणीं सूत्ररूपानें व व्याख्यानरूपानें पुष्कळ वेळां येतात. ह्या सर्व कलाकृतींत मानवी जीवनाचें चित्रण आहे, ध्येयवादित्व आहे, भावनावादित्व आहे; परंतु तें सर्व बोधवादांत गुरफटून गेलें आहे. प्रकर्षानें ह्यांतून जो दिसतो, तो बोधवाद; त्यानंतर दिसतो तो शिववाद; त्यानंतर दिसतो तो सत्यवाद. सौंदर्यवाद मात्र हुडकून काढावा लागतो.

# ११. महाराष्ट्राभिमानी प्रो. दत्तोपंत पोतदार

कांहीं तरी वीस वर्षांपूर्वीची गोष्ट असेल. तेव्हां माझी व दत्तोपंतांची प्रथम गांठ पडली. मी एम्. ए. च्या परीक्षेचा अभ्यास करीत होतों. दुसरा विषय मराठी भाषा हा घेतला होता. त्यांत नामदेवाच्या अभंगांच्या गाथ्यांतील विसोबा खेचराचा एक अभंग अडला. कांहीं केल्या समाधानकारक अर्थ लागेना. म्हणून इतिहासाचार्य राजवाडे ह्यांची मीं गांठ घेतली. अभंगांतील एक शब्द घेऊन त्यांनीं प्रवचनाला आरंभ केला. प्रवचनांत सर्व विषय येऊन गेले. परंतु अभंगाच्या अर्थनिश्चितीच्या दृष्टीनें आम्ही प्रथम जेथें होतों तेथेंच दोनतीन तासांच्या चर्चेनंतर होतों ! शेवटीं, "पोतदारांना जाऊन विचारा" असें सांगून माझी वासलात लावण्यांत आली. झालें; पोतदारांकडे आलों. त्या वेळेस ते शिक्षणप्रसारक मंडळीच्या मराठी प्राथमिक शाळेवर पर्यवेक्षक म्हणून काम करीत होते. त्यांच्या कचेरींतच त्यांची गाठ घेतली. जिकडेतिकडे फायली पडलेल्या. दर पांच मिनिटांनीं तेथें कोणी तरी येई आणि त्याच्या कामाचा लगेच निर्गम होई. पत्रव्यवहार वाच, उत्तरें लिही, नोटीस काढ, शिक्षकांना सूचना दे, माळ्याला काम सांग, लहान लहान अर्भकांच्या तक्रारी ऐक, त्यांचा निकाल कर, असा प्रकार एकसारखा चालला. मी आपला तास गेला, दोन तास गेले, बसलेला. माझी गाथा तेथेंच आणि अभंगहि तेथेंच ! मध्यम उंच अशी हडकुळी मूर्ति, लांबट दुभागी डोकें, त्यावर चंदनचर्चेचे पुसट पुसट पट्टे मधून मधून डोकावत आहेत, कपाळावर लांब आडवें गंध, गळ्याभोंवतीं पट्टीबंद उपरणें, लांब शेरवाणीवजा कोट इत्यादि बाह्य गोष्टी मी पाहात होतों. मध्येंच एकदां पैशाचा प्रश्न निघतांच दत्तोपंतांनीं आपल्या नेसत्या धोतराच्या पुढच्या निऱ्यांत चापून ठेविलेली कसावजा एक पिशवी काढून तिच्यांतून पैसे उचलून देतांना पाहिल्यावर तर मी विशेषच गार झालों ! बोलतांना किंवा लिहितांना अधिकाराचा तोरा नाहीं. सर्वांशीं वृत्ति सारखी. मुलांशीं मुलासारखे, शिक्षकांशीं शिक्षकासारखे, अशी त्यांची तऱ्हा. बोलण्यांत, लिहिण्यांत एक प्रकारचा ठामपणा व प्रांजळपणा. आंत एक बाहेर एक अशा वृत्तीचा पूर्ण अभाव. या सर्व गोष्टींचा माझ्या मनावर चांगलाच परिणाम झाला. परंतु आमचा अभंग आपला जेथल्या तेथेंच ! तेथून आम्ही त्यांच्या घरीं गेलों. तेथेंहि पुनः तेंच. दोनचार मंडळी घरीं अगोदरच वाट पाहात होती. त्यांचें काम होतें न होतें तोंच दुसरीं आपलीं तयार आहेत. कोणी विद्यार्थी मदत मागण्यास, तर

कोणी आपल्या नव्या पुस्तकावर मत-अभिप्राय घेण्यास, कोणी व्याख्यान ठरविण्यास, तर कोणी अध्यक्ष व्हा म्हणून विनंति करण्यास; कोणी सल्ला विचारण्यास, तर कोणी भांडण तोडण्यास; अशी निरनिराळ्या प्रकारची येरझार चालली होती. इतिहासमंडळांतील एक माणूस तर सारखा उभा! पण शेवटीं आमचा अभंग निघाला. त्यांतील शब्द नन्द भाषेंतील ठरले. कांहीं थोडासा अर्थहि लागला. मग इतर विषयांवर बोलणें निघालें. इतिहास, काव्य, मराठी वाङ्मय, जुनीं कागदपत्रें, पुराणवस्तु इत्यादि सर्व बोलून झालें. प्रत्यक्ष वस्तूहि पुष्कळ त्यांनीं दाखविल्या. या भेटीपासून जो त्यांचा माझा परिचय झाला तो अद्याप टिकून आहे, इतकेंच नव्हे, तर वाढता आहे. स्वभावाचा दिलदारपणा, प्रेमळपणा, प्रांजलपणा, आनंदी वृत्ति इत्यादि गुण त्यांच्याकडे ओढूनच घेतात. त्यांच्या घरांतील प्रत्येक वस्तूंत त्यांचा जातिवंत महाराष्ट्राभिमान दृग्गोचर होतो, त्यांची उच्च विद्येची आवड दिसते; प्राचीन अवशेषांविषयींची जागरूक वृत्ति प्रतीत होते; तसेंच सत्यसंशोधनाची किंमत त्यांना कळते; आणि त्यासंबंधीं प्रेमहि वाटतें.

या गोष्टी दत्तोपंतांना कै. राजवाडे यांच्याकडून लाभल्या. त्यांचा ध्यास व हव्यास राजवाडे यांनीं त्यांच्यांत उत्पन्न केला. राजवाडे हे त्यांच्या वडिलांचे समकालीन असल्यामुळें त्यांच्याकडे येत जात. पूर्वजांविषयींचा जाज्वल्य अभिमान, उच्च ज्ञान व सत्य यांच्या संशोधनाची ज्योत, हीं दत्तोपंतांच्यामध्यें राजवाड्यांनीं पेटविली. वैराग्याची निःस्पृह व सडेतोड वृत्ति हीसुद्धां राजवाडे यांची देणगी. इतिहास, वाङ्मयसंशोधन यांच्या द्वारें करावयाच्या लोकसेवेचें वाण त्यांना राजवाडे यांनींच दिलें आणि तें त्यांनीं मोठ्या तत्परतेनें आजवर चालविलें आहे. त्यांनीं शिक्षणप्रसारक मंडळाचें सदस्यत्व केलें, शाळांचें मुख्याध्यापकत्व पत्करलें, कॉलेजमधील प्राध्यापकत्व पार पाडलें, साहित्यपरिषदेचें काम रेटलें, शारदोपासक संमेलनें साजरीं केलीं, लोकांकडून महाराष्ट्रविद्यापीठाची वर्गणी जमविली, अर्वाचीन भारतेतिहासपरिषद् भरविली, भारतीय ऐतिहासिक दप्तरसमितीच्या कामांत चैतन्य उत्पन्न केलें, इत्यादि. पण या सर्व पसाऱ्यांत त्यांनीं राजवाड्यांनीं प्रथम दाखविलेला तारा आपल्या दृष्टीआड होऊं दिला नाहीं. किंबहुना त्या ताऱ्याकडे लक्ष देऊनच त्यांनीं हीं इतर कामें हाकलीं. तात्पर्य, दत्तोपंत हे राजवाड्यांचे पुरेपूर अंतेवासी आहेत. त्यांच्या बोलण्यांत, लिहिण्यांत, विचारांत, आचारांत, कधीं कधीं आवाजांतसुद्धां राजवाडे यांची आठवण होते. भेद एकच, आणि तो म्हणजे राजवाडे हे सुतराम्

लोकविग्राहक होते, तर पोतदार हे सुतराम् लोकसंग्राहक आहेत.

स्वतः राजवाड्यांनाहि दत्तोपंतांसंबंधीं आपुलकी वाटत होती. त्यांच्याविषयीं त्यांना फार अभिमान वाटत असे. त्यांच्या ठिकाणीं राजवाडे यांनीं अपेक्षाहि मोठी धरली होती. त्यांना त्यांच्या निष्ठेची खात्री वाटत असल्यामुळेंच भा. इ. संशोधक मंडळ काढल्याबरोबर त्यांनीं तें दत्तोपंतांच्या स्वाधीन केलें. हें इतिहास-संशोधक मंडळ त्यांनीं किती आस्थेनें चालविलें आहे, तें आजवर कोणत्या नांवारूपास आणिलें आहे, त्यानें इतिहासविषयक जागृति कशी व किती केली आहे, त्याचा एके काळीं जिकिरीचा व धाकधुगीचा झालेला जीवनक्रम सध्यां किती स्वास्थ्यानें चालला आहे, तें केवळ पुण्याचेंच नव्हे तर सर्व महाराष्ट्राचें व हिंदुस्थानचेंहि भूषण कसें बनलें आहे, या सर्व गोष्टी आपणा सर्वांच्या समोर आहेत. मंडळाच्या योगक्षेमाच्या प्रकरणीं राजवाडे यांनीं धरलेली दत्तोपंतांसंबंधींची अपेक्षा खरी ठरली हें निश्चित. यासंबंधीं राजवाडे यांचा आत्मा त्यांना खास शुभाशीर्वाद देत असेल !

प्रो. दत्तोपंत पोतदार म्हणजे महाराष्ट्राचा मूर्तिमंत अभिमान ! महाराष्ट्रदेश, महाराष्ट्रधर्म, महाराष्ट्रभाषा, महाराष्ट्रसंस्कृति व चालरीत यांचीं जीं कांहीं प्रधान लक्षणें आहेत त्या सर्वांचें ते जिवंत व जातिवंत प्रतीक होत. हा जागता व तळपता असा अभिमान आहे. यांत केव्हां ढिलाई नाहीं, कधीं कुचराई नाहीं, कधीं तोंड-देखलेपणा नाहीं. जें आहे तें निष्ठेनें आहे, आत्मीयतेनें आहे. बोलण्यांत मराठेपण, लिहिण्यांत मराठेपण, राहण्यावागण्यांत मराठेपण, भांडण्यांतहि मराठेपण, असें दत्तोपंतांच्या रोमरंध्रीं मराठेपण भिनलें आहे. वादविवाद चांगला रंगांत आला म्हणजे दत्तोपंतांना भाषण करतांना ऐकावें. अशा वेळीं त्यांच्या मराठेपणाचा पूर्ण प्रत्यय येतो. त्यांचे परप्रांतीय स्नेही त्यांच्या वादपटुत्वाविषयीं बोलतांना, "तुम्ही अगदीं खऱ्या मराठ्याप्रमाणें लढतां" असे वाखाणणीचे उद्गार काढतांना प्रस्तुत लेखकानें पुष्कळ वेळां ऐकिलें आहे.

हें मराठेपण ही चीज आहे तरी काय ? ताठरपणा हा एक त्याचा विशेष आहे. खडबडीतपणा हा एक त्याचा दुसरा विशेष आहे. स्वबुद्धीला अनुसरणें हा त्याचा आणखी एक विशेष आहे. पूर्वजांचा व त्यांनीं संपादन केलेल्या वतनवाडीचा अभिमान हा चौथा विशेष म्हणून सांगतां येईल. महाराष्ट्रांतील पांढरीचा व त्याबरोबर काळीचा अभिमान हेंहि त्याचें लक्षण आहे. या गुणांच्याबरोबर दुसऱ्याहि कांहीं गुणांचा निर्देश करणें अवश्य आहे. परंतु हे गुण अभावरूप आहेत, अवगुण

मात्र नव्हेत. मराठ्यांच्या ठायीं धाडस असलें तरी साहस नाहीं. मराठ्यांच्या ठायीं वतनवाडीचा अभिमान असला तरी तो मर्यादादूषित आहे. त्या मर्यादेबाहेर जाण्याची मराठ्यांची कधीं इच्छा होत नाहीं. घरकुलाच्या जरी नाहीं, तरीं देशकुलाच्या बाहेर तो सहसा जावयाचा नाहीं. मराठा हा अल्पसंतुष्ट आहे. तो स्वसंतुष्ट आहे. आणि त्याच्या या संतुष्ट वृत्तीमुळेंच त्याच्या ठिकाणीं महत्त्वाची आकांक्षा नाहीं. मग ती चांगली आकांक्षा नाहीं आणि वाईटहि नाहीं. या जातिवंत स्वसंतुष्ट वृत्तीमुळें तो दुसऱ्यापुढें तोंडहि पण वेंगाडत नाहीं. दुसऱ्याला तो आपलें दैन्य दाखवीत नाहीं. परिस्थितीच्या त्रासानें वैतागला, तर स्वतःच्या घरकुलांत भिंतीला टांचा घासून राहील, पण त्यांतून सुटण्याकरितां दुसऱ्याकडे याचना करणार नाहीं. मराठा हा बुद्धिवादी आहे, भावनावादी नाहीं. या बुद्धिवादामुळें त्याच्यामध्यें बुद्धिचापल्य आहे. परंतु बुद्धिचापल्याबरोबर त्याच्या ठिकाणीं शब्दचापल्यहि आहे; आणि यामुळें अन्यप्रांतीयांचा मराठ्यांसंबंधीं पुष्कळ वेळां बराच गैरसमज होतो. या बुद्धिवादामुळें स्वमताविषयीं आग्रह उत्पन्न होतो; आणि आग्रहाबरोबर भांडखोर वृत्तीहि येते. सह्याद्रीचा कणखरपणा व खडबडीतपणा मराठ्याच्या वृत्तींत पुरेपूर उतरला आहे. त्याच्यामध्यें कलेची कुसराई नाहीं व नरमाई पण नाहीं. तो सौंदर्ययुक्त कलांचा उपभोक्ता आहे, पण जातिवंत भोक्ता नाहीं. अशा रीतीनें मराठा हा सोळा आणे व्यवहारी मनुष्य आहे; आणि तोहि सारासारविवेचक व्यवहारी आहे; निव्वळ मोजमाप्या व्यवहारी नाहीं.

एवंगुणविशिष्ट जें मराठेपण तें पोतदारांच्या अंगीं आहे. ज्यांचा ज्यांचा म्हणून त्यांच्याशीं परिचय झालेला आहे त्यांना त्यांना आमच्या म्हणण्याचा पडताळा आल्याशिवाय राहिला नसेल. दत्तोपंतांना भावना नाहीं असें नाहीं. भावना आहे, परंतु तिच्यावर ते बुद्धीचा पगडा बसवितात आणि तिच्या आहारीं जात नाहींत. असहकारितेच्या पहिल्या धुमश्चक्रींत कित्येकांनी आपल्या नोकऱ्यांचे राजीनामे दिले. कित्येकांनीं शाळा सोडल्या. कांहीं थोड्यांनीं आपलीं शाळाकॉलेजें ‘राष्ट्रीय’ केलीं. परंतु दत्तोपंत त्या सर्व वावटळींत अविचल राहिले, आणि त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांस विद्येचीं मंदिरें तींतून अबाधित व अलिप्त ठेवण्याचा सल्ला देऊन पुण्यांतील संप्रदाय व परंपरा निर्माण केलेल्या शिक्षणसंस्था सुरक्षित ठेवण्यास साह्य केलें. तेच दत्तोपंत पोतदार अलीकडे पुनः वर्धा-शिक्षणयोजना निर्माण होतांच त्यांतील सुप्रतिष्ठित शैक्षणिक तत्त्व ओळखून परकीय शिक्षणानें विसकटलेली

संस्कृतीची घडी त्या योजनेच्या द्वारें योग्य रीतीनें बसविणें शक्य आहे असें जाणून तिचा आतां जोरानें पुरस्कार करीत आहेत. तात्पर्य ते प्रगतिप्रिय आहेत; परंतु ती प्रगति शिस्तीनें प्राप्त करून घेणारे आहेत. त्यांच्या भाषणांतील सडेतोडपणा व विचारांतील कणखरपणा तर सर्वांच्या परिचयाचा आहे. पोतदारांच्या व्याख्यानांत त्यांचें बुद्धिचापल्य व त्याबरोबर शब्दचापल्यहि प्रतीत होतें. प्रतिपक्षाचे मुद्दे ते मोठ्या सफाईनें खोडून काढतात. संतोष व समाधान हे गुण खरे; परंतु ते मर्यादेच्या बाहेर गेल्यामुळें त्यांच्या कित्येक स्नेह्यांना ते दोषच वाटतात. त्यांच्यावर बरेवाईट प्रसंग आजवर पुष्कळ आले; परंतु त्यांमध्यें त्यांनीं केव्हांहि आपलें दैन्य आपल्या जवळच्या मित्रालाहि दिसूं दिलें नाहीं. सौंदर्ययुक्त कलांचे मात्र ते भोक्ते आहेत. त्यांच्या घरीं किती तरी चित्रविचित्र वस्तूंचें एक संग्रहालयच आहे. कोठें कांहीं वस्तु जरा चमत्कारिक दिसली कीं त्यांनीं ती विकत घेतलीच. मग ती इंदूरची काठी असो कीं फरगोल असो; ब्रह्मदेशाचा पंचा असो कीं हैदराबादी शेरवानी असो; आग्र्याचा स्फटिकमय ताजमहाल असो कीं दिल्लीकडील तपकिरीचा तुंबा असो! त्यांचा स्वतःचा पुस्तकसंग्रह तर फार महत्त्वाचा आहे. अतिशय जुनीं, दुर्मिळ, महत्त्वाचीं व प्रमाणभूत अशीं पुस्तकें त्यांच्या संग्रहीं आहेत. तशाच कांहीं जुन्या वर्तमानपत्रांच्या फाइली पण आहेत. शिवाय हा संग्रह एकांगी नाहीं, पुरातत्त्वशास्त्राच्या सर्व शाखांचा हा संग्रह आहे.

अशा प्रकारचा संस्कृतीसंबंधीं जातिवंत व जाज्वल्य अभिमान दत्तो वामनांच्यामध्यें कसा आला? हा कांहीं यदृच्छया आलेला नाहीं. याच्या पाठीमागें तपश्चर्या आहे. कांहीं नाहीं म्हटलें तरी दोनअडीच तपांची ती दीर्घकालीन तपश्चर्या आहे. मराठ्यांच्या इतिहासाच्या व वाङ्मयाच्या परिशीलनानें त्याच्या संस्कृतीविषयींची निष्ठा दत्तोपंतांत उतरली आहे. गेलें पाव शतकभर त्यांचा पुण्याच्या भारतेतिहास-संशोधक मंडळाशीं सतत संबंध आहे. या संबंधाची घनता इतकी आहे कीं, त्या दोघांमध्यें अभेदभाव उत्पन्न झाला आहे. मंडळ म्हणजे दत्तोपंत आणि दत्तोपंत म्हणजे मंडळ, अशी वस्तुस्थिति आहे. एका इतिहासभक्त सरदाराच्या माडीवर चार इतिहासभक्त जमतात काय आणि ते इतिहाससंशोधनाची चर्चा करतात काय, एक लहानसें अभ्यासमंडळ काढतात काय आणि पाव शतकाच्या अवधींत अखिल भारतांत त्याचा बोलबाला इतका होतो काय! हें सर्व पाहिलें म्हणजे आश्चर्य व अभिमान वाटल्याशिवाय राहात नाहीं. इतिहासलेखनांत तत्कालीन अस्सल

कागदपत्रांचें महत्त्व महाराष्ट्राच्याच काय परंतु महाराष्ट्राबाहेरच्याहि विद्वानांना पटविण्याचें श्रेय भा. इ. सं. मंडळाला आहे. इतिहास-तत्त्वज्ञानांतील ही जागृति हिंदुस्थानापुरती तरी निदान मंडळानें केली, ही महाराष्ट्राला एक मोठ्या अभिमानाची गोष्ट असून या अभिमानाचें बरेंच श्रेय दत्तोपंतांना आहे यांत शंका नाहीं. कै. राजवाडे, मेहेंदळे, साने प्रभृतींनीं मंडळ स्थापिलें हें खरें. कै. खरे-पारसनीस, पटवर्धन-भावे, आणि देव-भट-चांदोरकर प्रभृतींनीं त्याची जोपासना केली हेंहि खरें. परंतु त्याच्या थेट जन्मापासून त्याची चिंता वाहून त्याला वाढविलें एवढेंच नव्हे तर त्याला मोठ्या नांवलौकिकास आणिलें तें दत्तोपंतांनीं. त्यांनीं कांहीं ऐतिहासिक साधनांचे खंड एकामागून एक काढले नाहींत, थक्क करणारे शोध लाविले नाहींत, अथवा परिणामकारक असें इतिहासतत्त्वज्ञानाचें साग्र प्रतिपादन केलें नाहीं. नाहीं म्हटलें तर शोधनिबंध व संशोधनाचीं टिपणें त्यांनीं बरींच वाचलीं आहेत. परंतु त्यांत त्यांचें रहस्य नाहीं. त्यांनीं आपल्या आयुष्यांतील ऐन उमेदीचीं व कर्तबगारीचीं जीं दोनअडीच तपें संस्थेच्या जोपासनेंत घालविलीं त्याचें उत्कृष्ट फल म्हणजे हें मंडळ. हें करतांना पुष्कळांचा त्यांना रोष पत्करावा लागला. आदरणीय अशा विद्वानांचा व त्यांचा मतभेद होऊन त्यांच्या सहकार्याला त्यांना मुकावें लागलें. अद्यापि तसले प्रसंग संपले आणि त्यांचा मार्ग निष्कंटक झाला आहे असेंहि नाहीं. परंतु त्यांनीं आपली तत्त्वनिष्ठा सोडली नाहीं. विनाकारण 'हाराकिरी' (आमहत्या) करणारे गृहस्थहि ते नव्हत; आणि तशी मी कधीं करणार नाहीं असें जें ते नित्य ठासून सांगतात तें सर्व या तत्त्वनिष्ठेच्या बळावरच. तत्त्वनिष्ठेच्या पुढें ते कोणाचीहि तमा बाळगीत नाहींत. या निष्ठेमुळें व सतत ध्यासामुळें कर्जानें कपाळ छिनून जाण्याची मंडळाची आपत्ति दूर होऊन त्याला स्वास्थ्य लाभलें. ही संस्था म्हणजे पुण्याचें, महाराष्ट्राचें व भारताचेंहि एक भूषण आहे. या संस्थेला त्यांनीं मोठेपण आणून दिलें खरें; परंतु त्यांत त्यांचा सर्व जोम, बुद्धि व वेळ खर्ची पडली. या संस्थेच्या मासिकाचे आरंभापासून ते एक संपादक आहेत. हें कामहि ते मोठ्या आस्थेनें पार पाडीत आहेत.

भा. इ. सं. मंडळाच्या विद्यमानें पुणें येथें अलीकडेच पहिली अर्वाचीन भारतेतिहास-परिषद् जी भरली तिचें मुख्य श्रेय दत्तोपंतांचें आहे. मूळ कल्पना, कामाची योजना, निरनिराळा पत्रव्यवहार, प्रदर्शन, आणि शेवटची यशस्वी तड हें सर्व त्यांच्या श्रमाचें फल आहे. या परिषदेचें दुसरें अधिवेशन नुकतेंच प्रयागास भरलें आणि त्यांत 'मराठ्यांचा इतिहास' या विभागाचें अध्यक्षपद त्यांना देऊन

चाल्कांनीं त्यांचा गौरव केला. इतिहासजागृतीचें जें बीज त्यांनीं आजवर महाराष्ट्रांत रुजविलें तें या परिषदेच्या द्वारा इतर प्रांतांत गेलें.

पोतदारांची इतिहासविषयक आणखी एक कामगिरी उल्लेखनीय आहे; ती म्हणजे इंडियन् हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनचे सदस्य म्हणून. या संस्थेवर लोकप्रतिनिधि म्हणून ते आजवर बरेच दिवस काम करीत आहेत. ऐतिहासिक अस्सल कागदपत्रांच्या महत्त्वाची जाणीव त्यांनीं भाषणें, ठराव, सूचना, उपसूचना, वादविवाद यांपैकीं जें मिळेल त्या साधनानें करून दिली आहे. सरकारी किंवा संस्थानी दप्तरखाने आजवर जे कड्याकुलपांत बंद होते, ते अभ्यासकांना उघडून देण्याचें बरेंच श्रेय दत्तोपंतांच्या प्रयत्नाला द्यावें लागेल, असें सरकारी इतिवृत्तावरून स्पष्ट आहे. ना सरकारचा पाठिंबा, ना विद्वानांचा म्हणण्यासारखा आधार, ना स्वकीयांचा सहकार. अशा प्रतिकूल परिस्थितींतसुद्धां केवळ इतिहासनिष्ठेच्या बळावर एकाकी राहून त्यांनीं त्याचा पिच्छा पुरविला आणि यश मिळविलें. पेशवेदप्तराच्या प्रकाशनयोजनेसंबंधींहि थोडाफार यशाचा वांटा त्यांच्याकडे जातो. मात्र फेरिस्तें किंवा हातयाद्या करण्याची त्यांची मूळ योजना पार फिरविली गेली.

इतिहास हा जसा दत्तोपंतांच्या आवडीचा विषय आहे तसा मराठी काव्य हाहि तितकाच त्यांच्या आवडीचा विषय आहे. इतिहासांत ज्याप्रमाणें लहान लहान, परंतु ठसकेदार अशीं संशोधनटिपणें ते सहज लिहूं शकतात, त्याप्रमाणें काव्याचींहि लहानसर पण ठसकेदार टिपणें ते लिहितात. एखाद्या जुन्या पोथीचा त्रुटित भाग अथवा कांहीं पानें सांपडलीं तर त्यावर नमुनेदार संशोधनटिपण लिहावें असें दत्तोपंतांनींच. संशोधनांतील मर्मस्थल त्यांना तेव्हांच दिसतें. रद्दीच्या ढिगाऱ्यांतून ऐतिहासिक महत्त्वाचा कागद जसा राजवाड्यांच्या हातांत नेमका येई, तसेंच मोठ्या संभारांतून संशोधनमर्म दत्तोपंतांच्या दृष्टीस तेव्हांच येतें, आणि त्यावर लगेच ते आपल्या कलाकुसरीनें सौंदर्य निर्माण करतात. त्यांचीं हीं लहान लहान टिपणें वाचण्यासारखीं आहेत. हीं टिपणें कांहीं विशिष्ट कालांतीलच आहेत असें नाहीं. त्यांचीं आद्य इंग्रजींतील मराठी वाङ्मयाचीं टिपणें तर फारच मौजेचीं आहेत. या सर्वांचा एकत्रित संग्रह आपणांस त्यांच्या एका लहानशा पुस्तकांत पाहावयास सांपडतो.

हें पुस्तक म्हणजे 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' हें होय. पुस्तक किरकोळ आहे, परंतु मोठ्या तोलाचें आहे. या कालांतील वाङ्मयावर तें पहिलें पुस्तक आहे. त्याची प्रस्तावना तर नमुनेदार विवेचनाचें उदाहरण आहे. अलीकडे या

कालखंडावर कांहीं पुस्तकें झालीं आहेत, परंतु त्यांना त्याची सर आली नाहीं. कॉलेजमधील विद्यार्थ्यांना हें फार उपयोगीं पडतें. भाषा व विवेचन चटकदार असल्या-मुळें पुस्तक तेव्हांच खपलें. प्रस्तुत लघुग्रंथाचा सुधारून वाढविलेला बृहद्ग्रंथ ते कधीं लिहितील ते लिहोत !

महाराष्ट्राचा अभिमान, महाराष्ट्राच्या काव्येतिहासाचा अभिमान व महाराष्ट्राच्या संस्कृतीचा अभिमान, पोतदारांच्या प्रत्येक कृतींत प्रतीत होतो. या अभिमानानें प्रेरित होऊन त्यांनीं महाराष्ट्र विद्यापीठाची योजना हातीं घेतली, आणि कॉलेज-मधून सेवानिवृत्त झाल्यानंतर तिचा कांहीं काळ जोमानें पुरस्कार केला. त्यासाठीं स्वतः मोटर बाळगून प्रवास केला. मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांच्या, संस्था-निकांच्या, धनवंतांच्या व विद्यावंतांच्या भेटी घेतल्या. व्याख्यानें दिलीं. पोटमंडळें काढलीं. कांहीं सहस्रांचा निधि जमविला आणि कांहींचीं अधिक आश्वासनें मिळविलीं. अशा रीतीनें ही योजना थोडीफार नांवारूपास आणिली आहे. अद्यापि फलनिष्पत्ति मात्र व्हावयाची आहे. ती लवकरच होईल अशी अपेक्षा आहे. हें कार्य फार प्रचंड असून एकट्यादुकट्याच्यां आवांक्याबाहेरचें आहे. महाराष्ट्राची चमत्कारिक परिस्थिति त्याला विशेष नडते. अवश्य तेवढा महानिधि सहज उपलब्ध होणें शक्य नाहीं. वर्गण्या गोळा करणें हें काम आधींच मोठ्या जिकिरीचें; त्यांतून दत्तोपंतांसारख्या माणसाला तर तें विशेषच.

महाराष्ट्र साहित्यपरिषद् व साहित्यसंमेलन या संस्थांमध्यें दत्तोपंतांनीं केलेलें कार्यहि असेंच तोलाचें आहे. या साहित्यपरिषदेची अथपासून इतिपर्यंत माहिती असलेला दत्तोपंतांशिवाय दुसरा मनुष्य विरळा. ते परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे कित्येक वर्षें सभासद होते, आणि गतवर्षी उपाध्यक्षत्व प्राप्त होतें न होतें तोंच यंदा अध्यक्षत्वाची माळहि त्यांच्या गळ्यांत पडली आहे. ते नांवाचे सभासद नाहींत. प्रत्येक सभेच्या वेळीं घटनेच्या कामांत लक्ष घालून त्यासंबंधीं लांबलांब पत्रें लिहून त्याचा ते पिच्छा पुरवीत. संमेलनांतहि त्यांचें लक्ष तसेंच निष्ठावंत रीतीनें असे. परिषद् व संमेलन यांच्या बैठकींच्या वेळीं दत्तोपंतांचें भाषण म्हणजे एक महत्त्वाचा भाग असून सर्व लोक त्याविषयीं आतुर असत. ही गोष्ट अद्यापि चालत आहे. परिषदेच्या मुखपत्राच्या संपादकाचें कामहि त्यांनीं मध्यंतरीं केलें. श्री. नानासाहेब चाफेकर यांनीं त्याला दिलेलें संशोधनी वळण त्यांनीं प्रचाराची जोड देऊन पुढें चालविलें. त्यांचीं ‘ रद्दींतील रत्नें ’ पाहून कांहींजण असंतुष्ट झाले. परंतु सध्याचें

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचें स्वरूप पाहून त्या रद्दींतील रत्नांची किंमत कळते.

वक्तृत्व हा दत्तोपंतांचा मोठा गुण. चढता व मैदानी आवाज, जोरकस शब्द, छोटींमोठीं वाक्यें, सडेतोड विचार, स्पष्ट व सुगम मांडणी, भावनेनुसार आवाजाचे चढउतार, नर्मविनोद, प्रसंगोचित गांभीर्य, प्रतिपाद्य विषयांच्या पार्श्वभूमीचें सम्यक् ज्ञान इत्याहि गुणांनीं त्यांचें भाषण फार परिणामकारक होतें. वादविवाद करण्यांत तर ते विशेष कुशल आहेत. प्रतिपक्षाचें यश ते हातोहात पळवितात आणि सभा जिंकतात. वादविवादांत पोतदारांना डिवचलें म्हणजे त्यांचें भाषण अधिकच परिणामकारक होतें. आभारप्रदर्शक भाषणें करण्यांत तर दत्तोपंतांचा हातखंडा आहे.

हाच चटकदारपणाचा गुण त्यांच्या त्रुटित लेखांतहि आढळतो. त्यांचे लेख वाचकांच्या मनाची तेव्हांच पकड घेतात. त्यांच्या वक्तृत्वाचे गुण त्यांच्या लेखांत दिसतात. क्वचित् क्वचित् पेरलेल्या जुन्यापुराण्या, परंतु अत्यंत समर्पक अशा शब्दांनीं त्यांत विशेष चटकदारपणा येतो. या दृष्टीनें त्यांचे संमेलनविषक लेखसुद्धां वाचनीय आहेत. त्यांनीं इतिहासमंडळाच्या पुरस्कृत ग्रंथांना लिहिलेले 'पुरस्कार' हे छोटे पण चटकदार असे लेख आहेत. श्री. न. चिं. केळकर यांच्या 'मराठे व इंग्रज' या प्रबंधावरील दत्तोपंतांचा परीक्षणलेख नमुनेदार आहे.

'अर्वाचीन मराठी साहित्य' या ग्रंथांत मराठी संशोधनाविषयीं लिहिलेला लेखहि त्या दृष्टीनें उल्लेखनीय आहे.

महाराष्ट्राचा इतिहास, त्याचें वाङ्मय, त्याची भाषा यासंबंधीं अभिमानाचा व निष्ठेचा गौरव करावयाचा नाहीं तर मग करावयाचा तरी कशाचा? देशी भाषांचा बोलबाला उत्तरोत्तर अधिक होणार. भाषाजागृतीचा हा समय आहे. अशा समयीं दत्तोपंतांसारख्या भाषाभिमानी विद्वानांचीच राष्ट्राला जरूरी अधिक आहे.